# यूनोची कार्यपद्धति

लेखक -- टॉम गॉल्ट

चित्रकार -- नॉर्मन टेट



# यूनोची कार्यपद्धति

---

**टॉम गाल्ट**

चित्रकार – **नॉर्मन टेट**

हें पुस्तक यूनोच्या सबंध संघटनेच्या सर्व कचेऱ्यांची ओळख करून देतें. भाषा साधी व सरळ असून स्पष्ट माहिती देणारी उदाहरणेंही दिलेलीं आहेत. त्यामुळें आमसभा, सुरक्षा-मंडळ, आर्थिक आणि सामाजिक मंडळ, विश्वस्त मंडळ, न्यायालय, सेक्रेटरिएट वगैरे विभागांची वाचकांना माहिती मिळणें सोपें होतें. वाचकांच्या दैनंदिन जीवनाबाबत यूनो काय कार्य करते व यूनोच्या या कार्याचा सर्वांवर कसा परिणाम होतो हें ग्रंथकर्त्यानें विशद केलें आहे.

या पुस्तकाचे चार विभाग करण्यांत आले आहेत :

या पुस्तकांत यूनोचा सध्यांचाच आराखडा दिला आहे असें नाही, तर त्यांत दुरुस्ती करण्याच्या पद्धतीबाबतहि एक प्रकरण आहे. यूनोच्या सभासद राष्ट्रांच्या सामान्य नागरिकांना यूनोमध्यें कसा बदल घडवून आणणें शक्य आहे किंवा बदल घडवून आणण्यापासून कसें संरक्षण करणें शक्य आहे याचा तपशीलवार खुलासाहि करण्यांत आला आहे.

या पुस्तकाचा विषय तांत्रिक आहे, आणि हें पुस्तक बरेंच तपशीलांत गेलें आहे. पण लेखकानें विषयाची स्पष्ट मांडणी केली आहे. नॉर्मन टेट यांनी काढलेलीं गमतीदार व व्यंगचित्रासारखी चित्रें विषयाला पोषक ठरलीं आहेत. परिणामी, या संघटनेच्या जोरदारपणाची व जिवंतपणाची वाचकाला स्पष्ट व खरीखुरी कल्पना येते आणि कुठेंहि तो असेना, यूनोच्या सर्व विभागांशीं त्याचा कसा संबंध येतो याचीहि त्याला जाणीव होते.

# ग्रंथकर्त्याविषयीं

क्रांतियुद्धापूर्वी या देशांत कमीत कमी शंभर वर्षे स्थायिक झालेल्या घराण्यांतून टॉम गाल्ट हे आले आहेत. त्यांचा मिचिगान येथें जन्म झाला. त्यांचें बाळपण सेंट लुई येथें गेले. तेथेंच कंट्री डे स्कूलमध्यें त्याचें शिक्षण झाले. नंतर ते हार्वर्ड येथें गेले व १९३२ साली त्यांनी पदवी घेतली. न्यू यॉर्कमधील फिल्डस्टन येथील अेथिकल कल्चर स्कूलमध्यें त्यांनी आठ वर्षे शिक्षकाचें आणि ग्रंथपालाचें काम केले. अर्थशास्त्र आणि आंतरराष्ट्रीय संबंध या विषयांवर ते लेखन करीत असतात.

त्यांनी युरोप व मेक्सिको येथें प्रवास केला आहे. मेक्सिकोमध्यें काही वर्षे राहिल्यामुळेच त्यांनी अमेरिकेच्या एकीकरणावर कित्येक पुस्तिका लिहिल्या आणि व्होल्कॅनो नांवाचें मुलांसाठी पुस्तक लिहिलें.

यूनोची कार्यपद्धति या ग्रंथांतील चित्रकार नॉर्मन टेट वेस्टपोर्ट, कानेक्टिकट येथें राहातात. हॉलिवुडच्या डिसने स्टुडियोमध्यें कित्येक वर्षे ते काम करीत होते. सध्यां ते न्यू यॉर्क येथील एका जाहिरात कंपनीच्या कला विभागांत काम करतात.

# अनुक्रमणिका

पृष्ठ

## भाग ४. वस्तुस्थिति निदर्शक गोष्टी व कागदपत्रें

## प्रकरण १

# यूनोची स्थापना कां करण्यांत आली

सर्व संस्थांपेक्षां यूनो ही जगामध्यें सर्वात मोठी संस्था आहे. तुमचा देश यूनोचा सभासद आहे, आणि तुम्हीं तिचे अविभाज्य घटक आहांत.

म्हणून ही नवीन संस्था कां स्थापन झाली, या संस्थेच्या विविध शाखा कोणत्या, त्यांचें कार्य कसें चालतें, ती तुमच्यासाठीं काय करूं शकते आणि तुम्ही तिच्यासाठीं काय करूं शकतां या गोष्टी जाणून घेणें तुम्हांला जरूर वाटेल.

जगांतील भयानक प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करण्यासाठीं, भीति आणि धोका यांपासून तुम्हां-आम्हांस मुक्त करण्यासाठीं तिची स्थापना करण्यांत आली.

या संस्थेचे कार्य द्विविध आहे. आणि हें द्विविध कार्य कां केलें पाहिजे हें खालील कथेवरून कळून येईल.

एकदां हरकिसन खांद्यावर एक भला मोठा हातोडा टाकून स्वत:वरच आग पाखडत आला. घराचा जिना चढतांनाहि तो संतापानें स्वत:वरच गुरगुरत होता. कारण त्याचें घर दोन खोल्यांचें होतें, आणि त्यामध्यें तो, त्याची पत्नी आणि चार मुलें इतक्या जणांना रहावें लागत असे.

"छे, हें मुळींच रास्त नाहीं" रागारागानें तो आपल्या पत्नीला म्हणाला, "दोन खणांच्या खुराड्यांत आम्हां सहा जणांना दाटीवाटीनें रहावें लागतें. नाहींतर आमचा शेजारी—तो, त्याची पत्नी आणि एक मुलगी एवढ्यांना तीन मोठ्या खोल्या ! आम्हांला मोठी जागा पाहिजेच, आणि त्यासाठीं मी प्रयत्न करणारच ! "

यासाठीं जरूर असलेल्या गोष्टी—विटा, सीमेंट, थापी—त्यानें एका खोलींत आणून ठेवल्या.

त्यानंतर त्यानें हातांतला भलामोठा हातोडा वर उचलला आणि भितीवर हाणला. त्या जबरदस्त धक्क्यानें भीतीचा चुना खाली कोसळला! त्यानें पुन्हां हातोड्याचे घाव घातले . . .

आणि अवघ्या अर्ध्या तासांत त्या भिंतीला मोठें भगदाड पडलें. त्या भगदाडांतून तो आपल्या शेजाऱ्याच्या शय्यागृहांत सहज जाऊं शकला. मग त्यानें विटा व चुना बाजुला करून त्या भगदाडाला चांगला आकार दिला.

शेजाऱ्याच्या खोल्यांत जाऊन त्यानें सगळीकडे पाहिलें. पण घरांत कुणीच नव्हतें. शेजाऱ्याची सर्व माणसें दुपारींच प्राणी संग्रहालय पाहाण्यासाठीं गेलीं होतीं.

तें पाहून हरकिसननें दरवाजावर घाव घालून चौकटीसह सबंध दरवाजा हालविला आणि त्या जागी विटा आणि सीमेंट भरून प्रवेशद्वार बंद केलें.



नंतर तो दरवाजा त्यानें स्वत: जेथें भोंक पाडलें होतें तेथें बसविला. यामुळें दोनऐवजी तीन खोल्या त्याच्या मालकीच्या झाल्या.

रात्रीं जेव्हां त्याचा शेजारी सहकुटुंब सहपरिवार परत आला, तेव्हां त्यांना आपल्या शय्यागृहाचा दरवाजा विटा रचून बंद केला असल्याचें आढळून आलें.

हें आश्चर्यजनक दृश्य पहातांच त्यांनीं पळत जाऊन पोलिसांकडे वर्दी दिली. "कोणी तरी आमची एक खोली बळकावली आहे" असें त्यांनीं सांगितलें. प्रथम पोलिसाचा त्यांच्यावर विश्वास बसेना. पण त्यानें स्वत: येऊन पाहिलें आणि पोलिसपार्टी बोलावून आणली. नंतर हरकिसनला त्यांनीं अटक करून न्यायमूर्तीपुढें उभा केला.

हरकिसननें तावातावानें न्यायमूर्तींनां ओरडून सांगितलें, "हें मुळींच रास्त नाहीं ! माझ्या कुटुंबाला अधिक जागा पाहिजे म्हणून आम्हांला दुसऱ्याची जागा घेणें भाग आहे !"

तेव्हां न्यायमूर्ती शांतपणें म्हणाले, "तुमच्या भावना मी जाणतो. सरकार या बाबतींत तुम्हांला मदत करूं शकेल. सरकारनें चांगलीं घरें बांधण्यास सुरवात केली आहे. त्यामुळें प्रत्येकाला चांगलें घर मिळूं शकेल. पण चोरी करणें हें आपल्या कायदेमंडळानें केलेल्या कायद्याविरुद्ध आहे आणि आम्हीं न्यायमूर्ती आणि पोलीस यांना त्या कायद्याचा योग्य अंमल केलाच पाहिजे."

हरकिसन डोकें खाजवून म्हणाला, "कां बरं ? जेव्हां जपानला विस्तार करावयाचा होता तेव्हां जपाननें चीनचा मांचुरिया बळकावला. इटालीला जेव्हां जास्त प्रदेशाची हांव सुटली तेव्हां तिनें एथिओपिया चोरला. जेव्हां जर्मनीला अधिक जागा पाहिजे असें वाटलें तेव्हां तिनें झेकोस्लोव्हाकियाचा सुदेटनलँड लांबवला. पण त्यांना मात्र कुणी हटकलें नाहीं किंवा मनाई करण्यासाठीं कांहीं केलें नाहीं." "हें खरें आहे," न्यायमूर्तींनी त्याचें म्हणणें मान्य केलें, "परंतु जपान, इटाली व जर्मनी यांचेवर सत्ता असलेलें असें जागतिक सरकार नव्हतें. कायदे करण्यासाठीं जगाचें एक कायदेमंडळ नव्हतें, आणि जगाचे पोलीसहि नव्हते. आणि म्हणूनच तीं राष्ट्रें सर्वांना आपल्या घशाखालीं घालण्याला प्रारंभ करीपर्यंत कांहीं करतां आलें नाहीं. आणि जगांतील इतर राष्ट्रांनीं हा धोका पाहिला आणि या आक्रमक राष्ट्रांविरुद्ध युद्ध पुकारलें. पण येथें आमच्या देशांत सरकार आहे, कायदे आहेत, न्यायमूर्ती आहेत आणि पोलीसहि आहेत. म्हणून तुम्हांला दुसऱ्याची खोली बळकावतां येणार नाहीं."

आपण सरकारें बनवतों तीं दोन कारणांसाठीं. सरकारनें रस्ते, पूल, घरें, शाळा वगैरे आमच्या गरजेच्या गोष्टी बांधाव्या, सर्वांना आपलें जीवन सुखासमाधानानें कंठितां यावें म्हणून गोरगरिबांची काळजी घ्यावी हें एक कारण असतें. आणि सरकारनें शांतता राखावी, लुटालूट, खून किंवा मारहाण करण्यास लोकांना प्रतिबंध करावा हें दुसरें कारण असतें.

हरकिसनच्या कुटुंबासारख्या गरीब राष्ट्राला मदत देऊं शकेल किंवा दुसऱ्याशीं लढणाऱ्या किंवा दुसऱ्याचें कांहीं बळकावणाऱ्या राष्ट्रांना प्रतिबंध करणारी अशी जागतिक संघटना किंवा सरकार १९४५ च्या आधीं नव्हतें.

सबंध जगांत ही द्विविध कामगिरी बजावण्यासाठीं यूनोची स्थापना करण्यांत आली. ही संस्था जर यशस्वी झाली तर तुम्हां-आम्हांला युद्धाचा धोका अगर भीति उरणार नाहीं.

ही संघटना यापूर्वीं स्थापन झाली नाहीं याचें कारण ती यापूर्वीं स्थापन करणें शक्य नव्हतें. पण नव्या संशोधनामुळें तें आतां शक्य झालें आहे.

तुम्ही तुमच्या वर्तमानपत्रांत येणाऱ्या छायाचित्रांच्या खालीं पाहिलें तर, अॅसोसिएटेड प्रेसचा 'वायरफोटो,' किंवा ब्रिटिश अधिकाऱ्याचा 'रेडिओ फोटो' अगर अमेरिकन सिग्नल पथकाचा 'रेडिओ टेलीफोटो' असे शब्द आढळतील. याचा अर्थ असा की तारेनें पाठविलेलें किंवा रेडिओवरून पाठविलेलें अगर सुमारें दहा मिनिटांत सहा हजार मैल अंतरापर्यंत चित्र पाठविणाऱ्या यंत्रावरून पाठविलेलें तें चित्र असतें.

तुमचे आजोबा जेव्हां पोरसवदा वयाचे होते, तेव्हां ते एखाद्या खेडयांत रहात. त्यावेळीं जगाच्या इतर भागांत अन्य राष्ट्रें आहेत याचें त्यांना स्मरण रहात नसे. दर दिवशी बहुतेक लोक आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना पहात, पण सुमारें १०० मैलांवरच्या माणसाचें छायाचित्रहि कोणी कधीं क्वचितच पाहिलें असेल.

यंत्रानें सारें दृश्य पालटून टाकलें आहे. जर्मन, रशियन, चिनी आणि इतर राष्ट्रांतील लोक जिवंत आणि जागृत आहेत.

हें फार महत्वाचें आहे. याचाच अर्थ असा की, आपल्याबरोबर दुसरीहि राष्ट्रें जगत आहेत हें विसरण्याची, आणि युद्ध सुरू होईपर्यंत त्या राष्ट्रांत काय चाललें आहे याची पर्वा न करण्याची चूक आमच्या पूर्वजांप्रमाणें आपण करता कामा नये.

दुसऱ्या जागतिक युद्धापूर्वी कांहीं वर्षे एकदां जपानमधल्या रेशमी कपडयाच्या प्रचंड दुकानाला आग लागली. रेशीम फार महाग होतें आणि त्या दुकानांतील रेशमी माल जळून खाक झाला. पण याचा परिणाम असा झाला की, आग लागल्यापासून अवघ्या वीस मिनिटांच्या आंत न्यू यॉर्कमधल्या रेशीम बाजारांत रेशमाचे भाव वाढूं लागले. रेडिओ आणि तारा यावरून आगीचें वृत्त आलें, अमेरिकेचा रेशीम बाजार जपानच्या पुरवठ्यावर अवलंबून होता.

रेडिओ, तारायंत्रें, आणि व्यापार यामुळें एका देशांतील लोकांना दुसऱ्या देशांतील लोकांवर अवलंबून रहाणें भाग पडत आहे.

जगाला झपाट्यानें बदलणारा जर कोणता शोध असेल, तर तो म्हणजे विमानाचा.

सध्यां अटलांटिक महासागरावर दर दिवशी अनेक विमानें भराऱ्या मारीत असतात. पॅसिफिकवरसुद्धां नियमित रहदारी असते. शंभर वर्षांपूर्वी जगाच्या एका भागांतून दुसऱ्या भागाकडे जाण्यास जेवढा काल लागत असे, त्याच्यापेक्षां किती तरी कमी कालांत लोक आतां जाऊं शकतात. फुलें, घडयाळें, स्त्रियांचे पोषाख, महत्वाचीं यंत्रें वगैरे अनेक खरेदीविक्रीच्या

वस्तू लवकरच अमेरिकेंत खरीदून एक दोन दिवसांनीं आफ्रिका किंवा चीन येथें विकतां येतील. विमानामुळें राष्ट्रांचें जीवन निकटवर्ती बनलें आहे.

तथापि विमानांचा धोकाहि आहे. बॉंब फेंकणाऱ्या विमानामुळें कोणतेंहि राष्ट्र सुरक्षित नाहीं हें आम्हांला कळून चुकलें आहे. म्हणून जेथें बॉंब फेंकणाऱ्या विमानांवर किंवा भयानक अणुबॉंबवर नियंत्रण ठेवतां येईल आणि जगाच्या सर्व भागांत असें नियंत्रण ठेवण्याच्या कामीं जेथें आमचें राष्ट्र साहाय्य करूं शकेल अशा तऱ्हेची जगाची घडी आम्हांला बसवावयाची आहे.

निरनिराळ्या शास्त्रीय शोधांनींच जागतिक संघटना स्थापन करणें शक्य व आवश्यक केलें आहे.

दुसऱ्यावर अविश्वास ठेवणें ही आमच्या मार्गातील सर्वात मोठी धोंड आहे. मी जेव्हां लहान होतों तेव्हां मला मास्तर सांगत असत, आणि पुस्तकांत मी वाचीत असे, "अमेरिका हा देश नेहमीं चांगला आणि उदार आहे. स्वतःच्या संरक्षणाशिवाय आम्हीं कधींहि युद्धांत भाग घेतला नाहीं. आम्हीं दुसऱ्या राष्ट्रांशीं ममतेनें आणि सहिष्णुतेनें वागत आलों आहों. परंतु दुसऱ्या राष्ट्रांचे लोक मात्र अप्रामाणिक आणि हीन मनोवृत्तीचे आहेत. ते तुम्हांला नेहमीं फसवतील."

आणखी येथील अनेक माणसें म्हणत असत, "कोणत्याहि जागतिक संघटनेंत इतर राष्ट्रांबरोबर आम्हांला भाग घेतां येणार नाहीं. कारण त्यांच्यावर विश्वास ठेवणें आम्हांला शक्य नाहीं. आमचा देश प्रामाणिक आणि उदार आहे. पण परदेशी लोक नेहमींच आम्हांला फसवण्याचा प्रयत्न करीत असतात."

मेक्सिकोमध्यें प्रवास केलेल्या एका माणसानें कांहीं वर्षांपूर्वी मला सांगितलें, "सर्व मेक्सिकन लोक कांहीं अप्रामाणिक नाहींत. कांही मेक्सिकन लोक खरोखर चांगले आहेत." आमच्याच शेजारी असलेल्या या देशासंबंधीं हा माणूस कांहीं अधिक चांगला विचार करूं शकला नाहीं.

मी जेव्हां मोठा झालों तेव्हां मी स्पॅनिश भाषा शिकलों आणि कांहीं महिने रहाण्यासाठीं मेक्सिकोमध्यें गेलों. तेथें मी मेक्सिकन वीरांचें स्मारक पाहिलें. १८४७ मध्यें आपल्या मातृभूमीच्या रक्षणार्थ अमेरिकेशीं लढतांना हे वीर धारातीर्थी पडले होते. मेक्सिकन शाळेंतील पुस्तकांत मी वाचलें कीं, मेक्सिको देश चांगला आणि उदार आहे. आपल्या संरक्षणाशिवाय त्यानें कधींहि युद्ध केलें नाहीं. मेक्सिकन लोक आपल्या शत्रूशींहि दयाशीलतेनें

व औदार्यानें वागत आले आहेत. पण अंकल सॅम अप्रामाणिक आणि स्वार्थी होता. अमेरिकन लष्करानें १९१४ मध्यें मेक्सिकोवर आक्रमण



केलें, आणि व्हिला नांवाच्या लोकप्रिय मेक्सिकन क्रांतिकारकाचा पाठलाग केला.

एकदां मी वृद्ध मेक्सिकन गृहस्थाशीं बोलत होतो. मी अमेरिकेंतून आलों आहे हें त्याला कळतांच त्यानें थोड्या नम्रतेनें बोलण्याचा प्रयत्न केला. तो मला म्हणाला, "अमेरिकेंतून येथें येणारे सगळेच लोक कांहीं आम्हांला फसवण्यासाठीं येतात हें कांहीं खरें नाहीं. त्यांच्यापैकीं कांहीं खरोखरच चांगले असतात." आमच्याबद्दल तो यापेक्षां कांहीं चांगलें मत देऊं शकला नाहीं.

दुसऱ्या राष्ट्रांनीं आम्हां बहुतेक जणांना अप्रामाणिक समजणें हें मूर्खपणाचें आहे. त्याचप्रमाणें त्या राष्ट्रांतील बहुतेक लोक फसवे आहेत असें आम्हीं मानणें हेंहि मूर्खपणाचेंच आहे.

यूनोकडून शांतता प्रस्थापित केली जाण्यापूर्वी अशा प्रकारचे गैरसमज नष्ट करण्याचे प्रयत्न आम्हाला करावयाचे आहेत.

आतां या महान् जागतिक संघटनेंत भारतानें आपलें स्थान घेतलें आहे, आणि ही संघटना यशस्वी करण्यासाठीं तुमचा हिस्सा उचलणें तुम्हाला शक्य आहे.

एकाच वेळीं एकापेक्षां अधिक सरकारांच्या आधिपत्याखालीं तुम्हांला नागरिक म्हणून राहणें शक्य आहे. तुम्हीं एकाद्या शहरांत किंवा खेड्यांत रहात असाल, तेथें स्थानिक सरकार असतें. तुम्हीं जेथील नागरिक असतां तें शहर अगर खेडें एका प्रांतांत असतें. त्या प्रांताचेंहि सरकार असतें, आणि त्या प्रांतिक सरकारचेहि तुम्ही नागरिक असतां. हा प्रांत देशाचा भाग असतो, आणि या देशाचें एक सरकार असतें, म्हणून तुम्हीं या देशाचेहि नागरिक बनतां. तुमचा देश यूनोचा सभासद आहे, आणि म्हणूनच यूनोमध्यें असलेल्या राष्ट्रांतील लोकांपैकींच तुम्हीं एक आहांत.

"सर्व राष्ट्रें एकत्र राहूं शकतील असा कोणता मार्ग आहे?" असा प्रश्न विचारला जात असे. ही जागतिक संघटना म्हणजे या प्रश्नाला चोख असें व्यावहारिक उत्तर आहे.

सॅन फ्रान्सिस्को येथील परिषदेनंतर अध्यक्ष ट्रूमन म्हणाले, "अमेरिकेच्या लोकसत्ताकामध्यें तुम्हाला सामील होणें जितकें सोपें आहे, तितकेंच जागतिक लोकसत्ताकांत सामील होणें कोणत्याहि राष्ट्राला सोपें आहे. आतां, जेव्हां आरकान्सास नदीच्या पाण्यासंबंधीं कान्सास आणि कोलोरॅडो या दोन राज्यांत तंटा उपस्थित होतो, तेव्हां ते लष्कर बाहेर काढून या प्रश्नावर युद्ध करीत नाहींत. ते अमेरिकेच्या सुप्रीम कोर्टापुढें फिर्याद मांडतात आणि कोर्टाचा निकाल वंद्य मानतात. हीच पद्धत आंतरराष्ट्रीय प्रश्नांत सुरू करण्यास कोणतीच हरकत नाहीं."

# प्रकरण २

# राष्ट्रें एकत्र कशीं आलीं

शांततेच्या समान उद्दिष्टासाठीं ज्या संघटनेतर्फे सर्व राष्ट्रांना एकजुटीनें कार्य करतां येईल अशा आंतरराष्ट्रीय संघटनेसाठीं कच्चा खर्डा तयार करण्यासाठी ता. २५ एप्रिल १९४५ रोजी ४६ राष्ट्रांचे प्रतिनिधी सॅन फ्रान्सिस्को येथें जमले, आणि त्यांनी बराच कालपर्यंत ज्यांच्यावर चर्चा झाली होती अशा कल्पनांच्या आधारें काम सुरू केलें.

या प्रतिनिधींनी यूनोची सनद तयार केली, आणि आश्चर्य हें की, या सनदेसारख्याच कांही कल्पना श्रद्धाळु आणि आशावादी विचारवंतांनी गेल्या सात शतकांत मांडल्या होत्या. विल्यम पेन यांनी अशी एक योजना लिहिली होती.

पण या योजना अंमलात आणण्याचा प्रयत्न का झाला नाही याला एक साधें कारण आहे, आणि तें म्हणजे त्या काळीं आधुनिक शोध लागले नव्हते.

जेव्हां यूनोच्या सुरक्षा-मंडळांतील ब्रिटिश प्रतिनिधीला एखाद्या महत्वाच्या प्रश्नावर मतदान करावयाचें असतें, तेव्हां तो लंडन येथें असलेल्या पंतप्रधानाशी टेलिफोनवरून विचारविनिमय करतो. त्यांच्यांत कांही मतभेद दिसले तर तो प्रतिनिधी विमानानें दुसऱ्या दिवशीं लंडनला जाऊन पंतप्रधान व इतर महत्वाचे अधिकारी यांच्याशीं त्या प्रश्नावर विचारविनिमय करीत असतो, आणि पुन्हां कांहीं तासांत विमानानें परत येऊं शकतो.

दोन तीनशें वर्षांपूर्वी ही गोष्ट अशक्य होती. अशा प्रकारच्या राष्ट्रसंघांतील प्रतिनिधींना आपल्या सरकारांशीं सल्लामसलत करण्याची जर गरज भासली असती, तर त्याना मधून मधून मुक्काम ठोकत गाडीनें, घोड्यावरून अगर बोटीनें यावें लागलें असतें आणि सल्ला घेऊन ते परत एकत्र येईपर्यंत कित्येक महिने लोटले असते. म्हणून त्या काळीं जागतिक संघटना सुरू करणें व्यवहार्य नव्हतें.

याशिवाय अनेक राष्ट्रांतील बहुतेक लोकांना आंतरराष्ट्रीय संघटनेच्या कल्पनेमध्यें स्वारस्य वाटत नसे. कारण त्यांच्या वृत्तपत्रांत टेलिफोटो

नव्हते. इतर देशांतील घडामोडी दाखविणारे चित्रपट त्यांच्यापाशीं नव्हते. जगाचें वृत्त पुरवणारे रेडिओ किंवा टेलिव्हिजन यंत्रें त्यांच्या काळीं अस्तित्वांत नव्हती. त्यांच्या काळांत मोटारी, आगगाड्या किंवा आगबोटी नव्हत्या, त्यामुळें इतर भागांत प्रवासहि फारसा होत नसे.

त्यांना इतर देशांची फारशी माहिती नव्हतीच आणि त्या देशाशीं कांहीं कर्तव्यहि नव्हतें.

जेव्हां अमेरिकन सरकारची पहिली कॉंग्रेस १७८९ मध्यें भरली, तेव्हां कॉंग्रेसचे सभासद गाडीतून किंवा घोड्यावर बसून येत असत. जॉर्जिया किंवा न्यू हॅम्पशायर येथून कॉंग्रेससाठीं न्यू यॉर्क शहरांत येण्यास त्यांना दोन आठवड्यांपेक्षां अधिक काळ लागत असे. पण यूनोच्या आमसभेला, जगाच्या सर्वात लांबच्या पल्लयावरील देशाहून येणारे प्रतिनिधीहि विमानानें दोन तीन दिवसांत येऊं शकतात.

तेरा अमेरिकन वसाहतीनी जेव्हां एकत्र येऊन एक सरकार बनविलें त्यावेळच्या अमेरिकन वसाहतीपेक्षां कांहीं बाबतींत आजचें जग लहान बनलें आहे.

त्यानंतर राष्ट्रसंघ स्थापण्याचे प्रयत्न अगोदर झाले आहेत. प्राचीन ग्रीसमध्यें एक लहानसा राष्ट्रसंघ 'डेलफीक ॲम्फीक्टिओनी' असें याचें नांव होतें, त्यानंतर सहा राष्ट्रांची 'इरोक्विअस' इंडियन्स लीग अस्तित्वांत आली आणि शेवटीं १९१९ मध्यें 'लीग ऑफ नेशन्स'चा जन्म झाला.

त्यानंतर यूनोची संस्थापना झाली. भीति आणि आशा यांच्या वातावरणांत अग्नीचा वर्षाव, गोळ्यांचा भडिमार आणि बाँबचा धूमधडाका चालू असतांना यूनोचा जन्म झाला. दुसऱ्या जागतिक युद्धाच्या सुरवातीला अगदीं निकराच्या काळांत अमेरिका युद्धांत उतरण्यापूर्वीं ही नाट्यपूर्ण कथा सुरू झाली.

१९४१ मध्यें एकामागून एक विजय मिळविणाऱ्या जर्मन नाझींशीं ब्रिटिश साम्राज्याचा जीवनमरणाचा लढा चालू होता. अशावेळी ब्रिटिश साम्राज्याचे पंतप्रधान चर्चिल यांनीं ऑगस्ट १९४१ मध्यें अमेरिकेचे अध्यक्ष फ्रॅंकलीन डी. रूझवेल्ट यांची भेट घेतली. ही भेट अटलांटिक महासागरांत 'एका अज्ञात स्थळी' युद्धनौकेवर झाली. जर्मन सैन्यानें नुकतीच रशियावर चढाई केली होती, आणि जर्मन सैन्याची इतक्या जोरानें प्रगति होत होती कीं लवकरच रशियाचा संपूर्ण पराभव होऊन सारा यूरोप जर्मनीच्या सत्तेखालीं जातो कीं काय असें वाटूं लागलें. तसें झालें असतें तर नाझींच्या प्रचंड शक्तिविरुद्ध एकट्या इंग्लंडलाच लढावें लागलें असतें.




यू. एस्. एन्. एच्. एम्. एस्.

अशा प्रसंगीं अध्यक्ष रूझवेल्ट आणि पंतप्रधान चर्चिल यांनी अटलांटिक सनद तयार केली.

अमेरिकेची इंग्लंडला सहानुभूति आहे असें त्यांत म्हटलें होतें. जरी अमेरिका प्रत्यक्ष युद्धांत उतरली नव्हती तरी ती इंग्लंडच्याच बाजूनें उभी होती.

पण सर्वात महत्वाचें म्हणजे, "सर्वसाधारण सुरक्षेसाठीं मोठ्या प्रमाणावर व कायम स्वरूपाची अशी एक संघटना स्थापन व्हावी अशी अपेक्षा या दोन राष्ट्रांनीं या सनदेमध्यें व्यक्त केली होती." याचा अर्थ एक जागतिक संघटना निर्माण व्हावी असा अधिकृत खुलासा करण्यांत आला होता.

त्यानंतर पांच महिन्यांनीं, ७ डिसेंबर १९४१ रोजीं जपानी विमानांनीं पर्ल हार्बर येथें अमेरिकन सैनिकदलावर प्रचंड हल्ला केला; आणि अनेक बोटी बुडवून टाकल्या. त्यानंतर ताबडतोब जर्मनीनें अमेरिकेविरुद्ध युद्ध घोषित केलें.

पुढील कांहीं दिवसांतच लॅटिन अमेरिकन राष्ट्रांनीं जर्मनीच्या या कृतीला चोख उत्तर दिलें. त्यांनीं जर्मनी व जपान यांच्या विरुद्ध युद्ध पुकारलें.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं सव्वीस राष्ट्रांच्या प्रतिनिधींची वॉशिंग्टन येथें बैठक भरली. यामध्यें अमेरिकेचेहि प्रतिनिधी होते. त्यांनीं स्वतःच "संयुक्त राष्ट्रें" असा अभिमानानें उल्लेख केला, आणि अटलांटिक सनदेला पाठिंबा देणाऱ्या जाहीरनाम्यावर सह्या केल्या.

१७७६ मध्यें अमेरिकेच्या सुरुवातीच्या तेरा राज्यांनीं स्वतःला "संयुक्त अमेरिकन राज्यें" असें म्हटलें होतें. पण त्यानंतर सुमारें तेरा वर्षांनीं तीं राज्यें खरीखुरीं संयुक्त बनलीं. आणि १ जानेवारी १९४२ रोजीं त्या पहिल्या सव्वीस राष्ट्रांनीं स्वतःचा "संयुक्त राष्ट्रें" असा उल्लेख केला. पण हीं राष्ट्रें खरीखुरी संयुक्त होण्यापूर्वीच हें नामाभिधान झालें होतें. अद्यापि हीं राष्ट्रें खरीखुरीं संयुक्त झालेलीं नाहींत – पण कधीं तरी तीं संयुक्त होतील.

आपल्या शत्रूशीं एकजुटीनें कसें लढावें हें हीं राष्ट्रें शिकत असतांनाच, "आम्हीं युद्धानंतर शांतता कशी काय राखणार?" असा प्रश्न विचारला जाऊं लागला. जागतिक संघटना स्थापन व्हावी असें आपलें मत असल्याचा अमेरिकन कॉंग्रेसच्या दोन्हीं सभागृहांनीं कौल दिला. इतर कांहीं राष्ट्रांनींहि तसाच कौल दिला. अमेरिका, इंग्लंड, चीन व रशिया यांच्या परराष्ट्र-मंत्र्यांनीं मॉस्को येथें ऑक्टोबर १९४३ मध्यें या कल्पनेवर विचार केला.

अध्यक्ष रूझवेल्ट यांनीं अमेरिकन कॉंग्रेसच्या दोन्हीं सभागृहांतील प्रतिनिधी व परराष्ट्र खात्यांतील कांहीं तज्ज्ञ माणसें यांची एक समिति नेमली, आणि जागतिक संघटनेची योजना तयार करण्याचें काम या समितीकडे सोंपविलें. कांहीं महिन्यानंतर या योजनेच्या प्रती इंग्लंड, चीन व रशिया यांच्याकडे पाठविण्यांत आल्या. याचवेळीं ह्याहि राष्ट्रांच्या समित्या अशाच योजना करीत होत्या. त्यांनींहि आपल्या योजना एकमेकांकडे पाठविल्या.

त्यानंतर या चार योजना एकत्रित करून एक योजना तयार करण्याचा प्रश्न आला. त्यासाठीं दोन महत्वाच्या परिषदा भरल्या.

२१ ऑगस्ट १९४४ रोजीं डंबर्टन ओक्स परिषद सुरू झाली. यावेळीं दोस्त राष्ट्रांच्या सैन्यांनीं पॅरिस आणि फ्रान्सचा वायव्येकडील भाग परत जिंकला होता. अमेरिकन सैन्यानेहि प्रगति करून दक्षिण फ्रान्सवर पाऊल टाकलें होतें. रशियन सैन्यें वॉरसॉवर येऊन थडकलीं होतीं. सर्व अघाडीवर जर्मन सैनिकांचा लढा मंदावला होता आणि त्यांना माघार घ्यावी लागत होती. दक्षिण पॅसिफिकमध्यें जनरल मॅक्‌आर्थरच्या फौजा जपान्यांशीं लढत धडाक्यानें पुढें चालल्या होत्या.

डंबर्टन ओक्स हें वॉशिंग्टन डी. सी. च्या सीमेवर असलेलें एक शेत आहे. तेथील वाडा राजेशाही थाटाचा आहे. तो एका शतकापूर्वीं बांधलेला होता. तो हिरव्यागार लतानीं सुशोभित करण्यांत आला होता. श्रीमंत धनिकांनीं भरमसाट पैसा खर्चून त्या वाड्याची इतकी जय्यत व सुंदर व्यवस्था ठेवली होती की, १९४० मध्यें हार्वर्ड विद्यापीठानें तेथें सार्वजनिक म्युझियम उघडलें.

या परिषदेला अमेरिकेच्या सतरा जणांचे प्रतिनिधी मंडळ आलें होतें. स्टेटिनियस हे या मंडळाचे नेते होते. सर अलेक्झांडर कॅडोगन हे ब्रिटिश प्रतिनिधी-मंडळाचे नेते होते. ग्रोमिको यांच्या नेतृत्वाखाली रशियन प्रतिनिधी आले---पुढें हेच तीन प्रतिनिधि आपल्या



देशाचे सुरक्षा-मंडळाचे सभासद झाले---चीनचे प्रतिनिधीहि या परिषदेसाठीं आले होते.

जागतिक संघटनेसाठी चौघाहि बड्या राष्ट्रांना मान्य होईल अशी एक योजना तयार करणें हा या परिषदेपुढें प्रश्न होता.

पहिल्या जागतिक युद्धानंतर पॅरिसमध्यें 'राष्ट्रसंघा'साठीं योजना तयार करण्यांत आली. त्यावेळी ती योजना अमेरिकेच्या सीनेटला मान्य

आहे की नाही हें पाहण्यांत आलें नाहीं. ती योजना तयार झाली तेव्हां अमेरिकन सीनेटनें त्या योजनेचा धिक्कार केला, आणि अमेरिका त्या 'राष्ट्रसंघां'त कधींच सामील झाली नाहीं.

सर्वात मोठचा राष्ट्रांपैकीं एक राष्ट्र जरी बाहेर राहिलें तरी जागतिक संघटना पुरेशी मजबूत होत नाही हा प्रत्यय राष्ट्रसंघानें आणून दिला.

पुढें अस्तित्वांत येणाऱ्या जागतिक संघटनेमध्यें सामील होण्याची आपली इच्छा आहे हें चौघा बडचा राष्ट्रांनीं या डंबर्टन ओक्सच्या परिषदेंत निश्चित केलें.

या परिषदेंत त्यांनी एक योजना तयार केली. 'डंबर्टन ओक्स योजना' असें या योजनेचें नांव होतें. लोकांना त्याचा अभ्यास करतां यावा म्हणून या योजनेच्या लाखों प्रती काढून वांटण्यांत आल्या.

लोकानीं त्या योजनेचा खरोखर अभ्यासहि केला.

आणि हजारों लोकानी त्या चारहि सरकारांना पत्रें लिहून त्या योजनेच्या सुधारणेसाठी मार्ग सुचविले.

डंबर्टन ओक्स येथें जमलेल्या मुत्सद्यांपुढें मात्र बरेच प्रश्न उपस्थित झाले. विशेषत: सुरक्षा मंडळांत प्रत्येक बडचा राष्ट्राला किती जागा द्याव्यात याबाबत त्यांच्यामध्यें मतैक्य होईना.

परंतु त्यानंतरच्या फेब्रुवारीमध्यें अध्यक्ष रूझवेल्ट, पंतप्रधान चर्चिल व रशियाचे मार्शल स्टॅलिन यांची याल्टा येथें बैठक झाली. – याल्टा हें रशियाच्या दक्षिण विभागांत आहे. याल्टा हा क्रिमियाकडील समुद्रानजीकचा भाग आहे. हा भाग नुकताच जर्मनीच्या हातांतून सोडवून घेतला होता. – या तिघां प्रमुखांनीं आपापल्या सल्लागारांच्या मदतीनें परिषदेपुढें आलेल्या प्रश्नांवर विचार करून सर्वमान्य अशी उत्तरें तयार केली. ही उत्तरें बाकीचें सर्व जग मान्य करील अशी त्यांना आशा होती. डंबर्टन ओक्स योजनेमध्यें हीं उत्तरें घालण्यांत आलीं आहेत.

शेवटी या कामकाजानंतर सर्व तयारी झाली. ज्या राष्ट्रांनीं संयुक्त राष्ट्रांच्या जाहीरनाम्यावर सह्या केल्या होत्या त्या राष्ट्रांनी आपले प्रतिनिधि सॅन फ्रान्सिस्कोच्या परिषदेसाठीं पाठवावेत असें आमंत्रण बडचा राष्ट्रांनीं दिलें. जगांत शांतता राखण्यासाठीं अस्तित्वांत येणाऱ्या जागतिक संघटनेची योजना सॅन फ्रान्सिस्कोच्या परिषदेंत पूर्ण करण्यांत येणार होती.

ज्या राष्ट्रांनी जर्मनी व जपान विरुद्ध युद्ध पुकारलें आहे, त्याच राष्ट्रांना या परिषदेसाठीं बोलाविण्यांत येणार आहे हें वृत्त कळतांच दक्षिण अमेरिकेंतील व नजिकच्या पूर्वेकडील राष्ट्रांनी ताबडतोब हालचाल

केली. ही परिषद फार महत्वाची होणार होती. तेव्हां संयुक्त राष्ट्रांच्या जाहीरनाम्यावर मही करतां यावी व या परिषदेचें आमंत्रण मिळावें म्हणून वेळीच आणखी दहा राष्ट्रांनीं जर्मन––जपान विरुद्ध युद्ध पुकारलें. अखेरीस पन्नास राष्ट्रांनी या परिषदेंत भाग घेतला आणि ५१ राष्ट्रांनीं या परिषदेंत तयार झालेल्या सनदेवर सह्या केल्या.

ज्या दिवशीं निरनिराळया राष्ट्रांचे ४०० प्रतिनिधी सॅन फ्रान्सिस्कोच्या ऑपेरा हाऊसमध्यें जमले, त्याच दिवशीं रशियन फौजांनीं बर्लिनला वेढा घातला. आणखी दोनच दिवसांनीं विजयी अमेरिकन सैनिक व रशियन सैनिक यांनीं जर्मनीच्या मध्यावर हस्तांदोलन केलें. याशिवाय जवळ असलेल्या ओकिनावा बेटांत अमेरिकन सैन्यांची हळूहळू आगेकूच चालू होती.

खद्द सॅन फ्रान्सिको सुरक्षित नव्हतें. ऑपेरा हाऊसमधल्या लाल रंगाच्या मऊमऊ खुर्च्यावर युद्धांत गुंतलेल्या राष्ट्रांचे प्रतिनिधी बसले होते. व्यासपीठावर चार सोनेरी स्तंभ उभारून तें आकर्षक रीतीनें सुशोभित केले होतें. हे चार स्तंभ चार स्वातंत्र्यांचे प्रतीक होते. या स्तंभांच्या मध्यें निळ्या पार्श्वभूमीवर सर्व राष्ट्रांचे ध्वज फडकत होते. आणि सॅन फ्रान्सिस्को मध्यें आकाशांत जपानी विमानें भ्रमण करीत होतीं. पण तीं बलूनच्या साहाय्यानें पिटाळून लावलीं आणि सुदैवानें कांहीं मैल दूर असलेल्या डोंगरांत स्फोट झाले.

या परिषदेंतील नजरेंत भरण्यासारखें दृश्य म्हणजे भारतीय प्रतिनिधींच्या डोक्यांवरील फेटा आणि सौदी अरेबियन प्रतिनिधींच्या डोक्यांवरील सफेद वस्त्रें हें होतें. या परिषदेसाठीं जमलेले प्रतिनिधी अगदीं शांत होते. त्यांच्यावर युद्धाची भीषण छाया पडली होती. ऑपेरा हाऊसमध्यें चार हजार लोकांची नुसती गर्दी उडाली होती. यांत अधिकृत प्रतिनिधी, त्यांचे अनेक मदतनीस आणि वार्ताहर हे होते, पण या परिषदेंत हर्षोन्माद नव्हता किंवा खळबळजनक भाषणेंहि नव्हतीं. कारण हीं माणसें कांहीं कार्य करण्यासाठीं आलीं होतीं.

अनेकांनीं आपलें जीवित युद्धाच्या धोक्यांत घातलें होतें. आपल्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठीं कांहींजण गनिमी काव्यानें आक्रमकांशीं लढत होते. म्हणून एकमेकांचे मतभेद संपुष्टांत आणले पाहिजेत हें त्यांनीं ओळखलें. त्यांनीं वृत्तपत्रांतून युद्धाची वाढती भयानकता वाचली होती. कधींकाळीं तिसरें महायुद्ध झालेंच तर रॉकेट बॉंब टाकून जगांतील प्रत्येक शहर उध्वस्त केलें जाईल हें त्यांनीं ओळखलें होतें. आणि नेमकी तीच गोष्ट टाळण्यासाठीं ते सॅन फ्रान्सिस्को येथें जमले होते.



एका मजबूत आंतरराष्ट्रीय संघटनेची सनद तयार करण्यासाठीं ते जमले होते, आणि सर्व स्वातंत्र्यप्रेमी राष्ट्रांची या संघटनेंत येण्याची इच्छा होती.

इतरांपेक्षां स्वतःला अधिक हुशार समजणाऱ्या दोघातिघांनीं एका खोलींत बसून व दरवाजा बंद करून स्वतःच्याच बुध्दीनें अशी सनद लिहिणें हा सर्वांत सोपा मार्ग. अशी सनद ते तीन चार दिवसांत पूर्ण करूं शकले असते.

पण या मार्गांत अडचण अशी झाली असती कीं, बऱ्याच लोकांना ग्राह्य न वाटणाऱ्या गोष्टी त्यांनीं या सनदेंत समाविष्ट केल्या असत्या, आणि इतर लोकांना चांगल्या वाटणाऱ्या कित्यक गोष्टींचा त्यांनीं अंतर्भाव केला नसता.

पण जास्तीत जास्त लोकांच्या विचारांचा समावेश करणें हा खरा लोकशाही मार्ग आहे.

या सॅन फ्रान्सिस्को परिषदेविषयीं लोकांमध्यें इतकी जिज्ञासा होती कीं, ही परिषद सुरू होण्यापूर्वीं एकट्या अमेरिकेंतील लोकांची अमेरिकेच्या परराष्ट्र खात्याकडे दर आठवड्याला वीस हजार पत्रें येत असत. हीं सर्व पत्रें वाचून वर्गवारी करण्यांत येत असे. त्यामुळें लोकांना या सनदेंत काय

पाहिजे होतें व कोणत्या कल्पना किती लोकांना पाहिजेत हें अधिकाऱ्यांना कळून आलें.

या परिषदेसाठीं ५० राष्ट्रांचीं प्रतिनिधी-मंडळें आलीं होतीं. यापैकीं प्रत्येक प्रतिनिधी-मंडळ पूर्ण तयारीनिशीं आलें होतें. त्यांच्याकडे कागदपत्रें होती, टिपणें होतीं, नवीन कल्पना होत्या आणि साहाय्यक सल्लागार व भाषांतरकारहि होते. अमेरिकेच्या प्रतिनिधीमंडळांत ७ अधिकृत प्रतिनिधी होते. ७ कॉंग्रेसचे सभासद होते. १०७ साहाय्यक अधिकारी होते. ४७ प्रसिद्धी अधिकारी, कार्यकारी चिटणीस, ग्रंथपाल, या सनदेमध्यें खास लक्ष घालणाऱ्या ४२ सार्वजनिक संस्थांचे पदाधिकारीहि होते.—यांत अमेरिकन व्यापारी मंडळांतील धनिक व्यापारी, शिक्षक, कामगार नेते, धार्मिक पुढारी वगैरे होते.—याशिवाय स्वत: होऊन कांही सल्लागारहि आले होते. असे एकूण दोन हजार लोक या परिषदेंत होते. त्यांनीं या सनदेसाठीं दोन महिने आणि एक दिवस विचारविनिमय केला.

या परिषदेंतील प्रतिनिधीच्या निरनिराळ्या समित्या करण्यांत आल्या होत्या. एका कमिटीनें या सनदेच्या उपोद्घातावर कांहीं आठवडे विचार केला. दुसऱ्या समितीनें सुरक्षा-मंडळाविषयीच्या प्रकरणावर विचार केला, आणि तिसऱ्या समितीनें विश्वस्त मंडळासंबंधीं चर्चा केली. या सनदेच्या प्रत्येक भागासाठीं एक निराळी समिति होती.

चार बड्या राष्ट्रांनीं जी डंबर्टन ओक्स योजना तयार केली होती त्या योजनेच्या प्रती लोकांच्या माहितीसाठीं छापल्या होत्या. त्या प्रती प्रत्येक राष्ट्रांतील प्रत्येक प्रतिनिधीकडे होत्या.

या शिवाय या डंबर्टन ओक्स योजनेंत दुरुस्ती सुचविणाऱ्या अगर भर घालणाऱ्या नवीन कल्पना प्रत्येक राष्ट्रांतील प्रतिनिधीकडे होत्या. उदाहरणार्थ ऑस्ट्रेलियाच्या प्रतिनिधी-मंडळानें या योजनेंत घालण्यासाठीं ३८ नवीन कल्पना सादर केल्या. यांपैकीं २६ कल्पनांचा त्यांत अंतर्भाव करण्यांत आला.

प्रत्येक समितीनें आपल्याकडे सोंपविलेल्या भागांत शक्य त्या सर्व सुधारणा केल्या. त्यानंतर सर्व समित्यांनीं सुधारलेले भाग एकत्र करून एक खर्डा तयार करण्यांत आला. यालाच 'संयुक्त राष्ट्रांची सनद' असें म्हणतात.

शेवटीं संपूर्ण दोन महिने चर्चा करून, वादविवाद करून व मतभेद मिटवून जगाच्या प्रत्येक खंडांतील ते प्रतिनिधी ऑपेरा हाऊसमध्यें अखेरच्या बैठकीसाठीं जमले. तयार झालेल्या सनदेच्या पांच अधिकृत प्रती

व्यासपीठावरील गोलमेजावर ठेवण्यांत आल्या. इंग्रजी, चिनी, रशियन, फ्रेंच आणि स्पॅनिश अशा पांच भाषांतील या पांच प्रती होत्या. अध्यक्षांनी या सनदेवर मतें घतलीं. प्रत्येक प्रतिनिधीनें मत देऊन सनदेचा स्वीकार केला. कुणीहि विरोधी मत मांडलें नाही.

चीनचे आठ प्रतिनिधी उठून व्यासपीठावर गेले. तेथें त्यांच्या नेत्यानें लहानसें भाषण केलें. त्यावेळी हे प्रतिनिधी निर्धारानें उभे होते. मग त्यांनीं त्या भव्य गोलमेजाशी बसून सनदेच्या पांचहि प्रतीवर सह्या केल्या. त्या नंतर एकामागून एक याप्रमाणें सर्व प्रतिनिधीनीं सह्या केल्या. या सनदेवर एकूण १४८ प्रतिनिधीच्या सह्या झाल्या.

अशा रीतीनें ही सनद मुद्रणासाठी तयार झाली. या सनदेच्या छापील प्रती संयुक्त राष्ट्रांच्या सर्व सरकारांकडे पाठवावयाच्या होत्या.

त्यानंतर एक महिन्यानें अमेरिकन सीनेटनें या सनदेवर कडाक्याची चर्चा करून अनुकूल मत दिलें व सनदेचा स्वीकार केला. त्या मागोमाग इतर राष्ट्रांच्या सरकारांनींहि या सनदेस आपली मान्यता दिली.

आंतरराष्ट्रीय कायद्याचा एक भाग म्हणून ही सनद अंमलांत आणण्यासाठी २४ ऑक्टोबरपर्यंत पुरेशा राष्ट्रांनी या सनदेस आपली मान्यता दिली. हा आंतरराष्ट्रीय कायदा सर्व राष्ट्रांना बंधनकारक होता.

त्यानंतरच्या तीन महिन्यांत सर्व तयारी झाली. दरम्यान सर्व ५१ राष्ट्रांनी या सनदेस मान्यता दिली होती. आणि एके दिवशी १० जानेवारी १९४६ रोजी दुपारीं जागतिक संघटना अस्तित्वांत आली. या संघटनेची पहिली आमसभा लंडन येथें भरली. त्याचबरोबर ताबडतोब सुरक्षा-मंडळ, सचिवालय आणि यूनोच्या इतर शाखा अस्तित्वांत आल्या, आणि त्यांचें कार्य सुरू झालें. आतां ही सनद म्हणजे केवळ योजना नव्हती, जिवंत आणि कामास लागलेल्या संघटनेचा तो मसूदा होता.

## प्रकरण ३

# यूनोची आमसभा--जागतिक नगरसभेची बैठक

यूनोच्या आमसभेचे–जनरल ॲसेम्ब्ली–अध्यक्ष आपल्या टेबलावरच्या हातोड्याचे तीन ठोके वाजवून सभागृहांत शांतता प्रस्थापित करतात आणि बैठकीचें कामकाज सुरू झाल्याचें जाहीर करतात. निळ्या आणि सोनेरी रंगांनीं हे सभागृह सुशोभित केलेलें आहे. त्यांतील कलाकुसर आकर्षक पण साधी आहे. सभागृहाच्या छतावरून प्रकाशाचे झोत खाली सोडलेले असून या जागतिक नागरिक सभेच्या बैठकींतील हजारो लोकांवर शांततेचें आवरण पसरतें.

व्यासपीठावर एका लांबट मोठ्या टेबलावर अध्यक्ष, सरचिटणीस आणि त्यांचे साहाय्यक बसतात. व्यासपीठासमोर दुभाषी व स्टेनोग्राफर्स यांचीं टेबलें आहेत व सभागृहाचा बाकीचा बराचसा भाग निरनिराळ्या राष्ट्रांच्या टेबलांनी भरलेला असतो. कारण या सभागृहांत सुमारें ५० राष्ट्रांचे प्रतिनिधी बसतात. एका टेबलावर दहा माणसें बसूं शकतील असें टेबल प्रत्येक राष्ट्रासाठी ठेवलेलें असतें. बऱ्याचशा राष्ट्रांनीं वीस ते तीस सल्लागार पाठविलेले असतात. त्यांच्यासाठीं खोलीच्या बाजूला जागा राखून ठेवलेल्या असतात.

ज्या संस्थेवर सबंध जगाचें सुख आणि शांतता अवलंबून आहे, अशा या संस्थेचें कामकाज पहाण्यासाठीं सुमारें एक हजार प्रेक्षक जमतात.

यूनोच्या या आमसभेंत जेव्हां प्रतिनिधी बोलतात, तेव्हां त्यांनीं उच्चारलेले शद्ब जगाच्या कानावर पडतात. या सभागृहाची एक मोठी बाल्कनी आहे. तीत सुमारें चारशें वार्ताहर बसलेले असतात. सभागृहांतील प्रतिनिधींची भाषणें रेडिओ, टेलिव्हिजन आणि बोलपट यांच्यामार्फत जगांतील सर्व लोकांपर्यंत पोंचतात. म्हणूनच या सभागृहांत इतर राष्ट्रांचे प्रतिनिधी आपल्या राष्ट्रांबद्दल काय बोलतील याबाबत कांहीं सरकारें भीति बाळगून असतात.

जेव्हां इंग्रजींत कांहीं सांगितलें जातें अगर भाषण केलें जातें, तेव्हां त्याचें फ्रेंच भाषेंत भाषांतर करून सांगावें लागतें. त्याचप्रमाणें फ्रेंच भाषेंतील भाषणाचें इंग्रजींत भाषान्तर करावें लागतें. पहिले अध्यक्ष बेल्जियमचे

मंगळवारीं या बैठकीस प्रारंभ होतो. ही बैठक पांच किंवा सहा आठवडे चालते. दरवर्षी आमसभेचे अध्यक्ष व सात उपाध्यक्ष निवडले जातात. हे सर्वजण निरनिराळ्या राष्ट्रांचे असतात. बैठकीची वेळ, वक्त्याच्या भाषणाची कालमर्यादा, प्रत्येक समितीचें कार्य काय हें ठरविणें वगैरे बाबत आमसभेचे स्वतंत्र नियम आहेत.

आणीबाणीची परिस्थिति उद्‌भवली तर सुरक्षा मंडळाच्या किंवा बहुसंख्य सभासद राष्ट्रांच्या विनंतीवरून आमसभेची खास बैठक बोलावतां येते.

आमसभेंतील प्रतिनिधी महत्वाच्या प्रश्नांवर चर्चा करतात आणि कांहीं विशिष्ट गोष्टी करण्यासाठी मत देतात, त्यानंतर ते आपापल्या घरी जातात, आणि यूनोच्या अन्य शाखा त्यांनीं घेतलेले निर्णय पार पाडतात.

प्रत्येक सभासद राष्ट्र आमसभेसाठी पांच प्रतिनिधी पाठवितें. त्याचप्रमाणें प्रत्येक सभासद राष्ट्राला त्यांच्याबरोबर बसण्यासाठीं 'बदली' प्रतिनिधीहि पाठवितां येतात. या प्रतिनिधींच्या बरोबर जेवढे जरूर वाटतील तेवढे सल्लागार व तज्ज्ञहि पाठविण्याची मुभा असते. या सर्वांना त्यांचे राष्ट्र पगार देतें.

आपले प्रतिनिधी आणि 'बदली' प्रतिनिधी कसे निवडावेत हें प्रत्येक राष्ट्र ठरवतें. अमेरिकेच्या प्रतिनिधींची नेमणूक अमेरिकेचे अध्यक्ष करतात. अध्यक्ष त्यांची नांवें सीनेटच्या मान्यतेसाठी पाठवितात. सीनेटनें जर मान्यता दिली तर ते आमसभेंतील अमेरिकेचे प्रतिनिधी म्हणून जातात. एखाद्याच्या विरुद्ध जर सीनेटनें मत दिलें तर अध्यक्ष त्या नांवाच्या ऐवजीं सीनेट पसंत करील असें दुसरें नांव सुचवितात.

यापैकी एकाला 'वरिष्ठ प्रतिनिधी' म्हणतात. याचा अर्थ इतकाच कीं तो प्रतिनिधी, प्रतिनिधी-मंडळाचा अध्यक्ष असतो, आणि आमसभेच्या निरनिराळ्या समित्यांवर काम करण्यासाठीं आपल्या प्रतिनिधींच्या नेमणुका करतो.

सुमारें एक डझन किंवा त्यापेक्षां अधिक समित्यांतर्फे यूनोचें कार्य चालतें. कांही समित्या मोठ्या असतात. अशा समित्यांवर प्रत्येक राष्ट्रांतील प्रतिनिधी असतो. बहुतेक कडाक्याची चर्चा आणि भाषणें अशा समित्यांच्याच बैठकांमध्यें होतात. काम अधिक सोपें व्हावें म्हणून प्रत्येक समितीनें खास कामें वाटून घेतलीं आहेत. एक समिती अर्थविषयक प्रश्न पहाते, दुसरी समिती एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध आलेल्या तक्रारींवर विचार करते, तर तिसरी समिती शाळांची सुधारणा आणि गरीब लोकांची काळजी

ह्याबाबतचे काम पहाते. यूनोच्या महान् कार्याच्या प्रत्येक विभागासाठीं एक एक समिती आहे.

प्रत्येक प्रश्नामध्यें, बारीकसारीक गोष्टीमध्यें आमसभा लक्ष घालीत नाहीं. आपापल्या प्रश्नावर आमसभेच्या समित्या तपशीलवार विचार करतात आणि लेखी शिफारशी करतात. या शिफारशीवर आमसभा चर्चा करते आणि होकारार्थी अगर नकारार्थी मत देते.

मतदान करण्याची पद्धत अशी आहे :

अध्यक्ष म्हणतात, "सुरक्षा मंडळाचे सभासद निवडण्यासाठीं चर्चा सुरू होत आहे."

तेवढ्यांत रशियन प्रतिनिधी-मंडळाचे प्रमुख आपला हात वर करतात. "आतां रशियानें बोलावें" अध्यक्ष फर्मावितात.

ग्रोमिको व्यासपीठावरील मायक्रोफोनकडे जातात, आणि ही निवडणूक पुढील सोमवारपर्यंत पुढें ढकलावी, म्हणजे प्रतिनिधींना त्यावर अधिक विचार करतां येईल असें सुचवितात.

इतर कांहीं वक्ते या सूचनेला विरोध करतात.

मग अध्यक्ष जाहीर करतात. "जर या प्रश्नावर आणखी कांही सांगावयाचें नसेल तर मी या प्रश्नावर मतें घेतो."

यावेळी सभेपुढें एक साधा सभेच्या कामकाजाविषयीचा प्रश्न असतो. प्रतिनिधींनी सोमवारपर्यंत थांबावें की नाहीं ? जे या बाजूचे असतात ते उभे राहून या प्रश्नाच्या बाजूनें मत देतात.

लागलीच निरनिराळ्या दहा भाषांत कुजबुज चालू होते. प्रत्येक राष्ट्राला एक मत असतें, आणि आपलें मत या प्रश्नाच्या बाजूनें का विरोधी द्यावें याबाबत प्रत्येक राष्ट्राच्या प्रतिनिधि-मंडळाचे प्रमुख आपल्या मंडळांतील इतर प्रतिनिधींचा सल्ला घेतात.

तेवढ्यांत नऊ राष्ट्रांचे प्रमुख प्रतिनिधी उभे राहातात. अनुकूलच्या बाजूनें त्यांची मोजणी होते. "ज्यांचा विरोध आहे त्यांनी कृपया उभें रहावें." असें एक कारकून सांगतो. चौतीस प्रमुख प्रतिनिधी उभे राहातात.

नऊ अधिक चौतीस—त्रेचाळीस. म्हणजे कांहीं राष्ट्रांनी आपलीं मतें दिलेलीं नाहींत. सामान्यतः, एखाद्या बड्या राष्ट्रानें केलेल्या सूचनेवर सर्वांसमोर उभें राहून विरोधी मत देण्यास छोटीं राष्ट्रें घाबरतात.

तथापि याबाबतींत ही सूचना नामंजूर होते.

शेवटीं अध्यक्ष जाहीर करतात, "मी आतां मतदान घेण्यास सुरुवात करतो. प्रतिनिधींनीं आपलीं मतें मतपेटींत टाकावींत."

पुन्हां प्रतिनिधीची कुजबूज सुरू होते, कारण प्रत्येक राष्ट्राचें प्रतिनिधी-मंडळ उमेदवार राष्ट्रांवर विचार करते. यावेळीं ज्या राष्ट्रांना निवडणुकीस उभें रहाण्याचा अधिकार आहे त्या राष्ट्रांच्या नांवाची यादी सर्वांकडे दिलेली असते. त्यांवर सर्व प्रतिनिधी विचार करतात, हें मतदान सभेच्या कामकाजाविषयीचें नसतें. ही निवडणूक असते आणि म्हणून मतदान गुप्त पद्धतीनेंच होणें जरूर असते.

गुप्त मतदानाचें महत्व फार असतें, कारण सर्वांत लहान असणारें राष्ट्रसुद्धा भीति न बाळगतां आपल्या इच्छेप्रमाणें मत देऊं शकतें.

नंतर एक कारकून एकेका राष्ट्राचें नांव घेतो. त्याप्रमाणें त्या त्या राष्ट्राचे प्रमुख प्रतिनिधी मताची आपली चिठी मतपेटीत टाकतात.

आमसभेच्या बैठकीपुढें कधीं कधीं साधे प्रश्न येतात. आमसभेची बैठक शनिवारी भरवावी काय, यासारखे दैनंदिन कामकाजाचे प्रश्न बैठकीपुढें येतात. त्यावर मतदान होतें, पण बहुसंख्य प्रतिनिधींनीं त्या बाजूनें मत दिलें की, त्याप्रमाणें नियम करण्यांत येतो. पण जेव्हां एखाद्या महत्वाच्या प्रश्नावर मतदान होतें तेव्हां केवळ बहुमत पुरेसें होत नाही. सर्व राष्ट्रांनीं बंदुका आणि बॉंब तयार करण्याच्या योजनेवर होणारा खर्च कमी करावा, अशा तऱ्हेची शिफारस आमसभेपुढें आली तर ती शिफारस दोन-तृतियांश राष्ट्रांच्या मतांशिवाय मंजूर होत नाही.

तरीहि, अठरा मतें विरोधी पडली तर सर्वांत महत्वाच्या अशा सूचनाहि मंजूर करतां येतात. याचा अर्थ असा कीं, कांहीं राष्ट्रांना न आवडणारी चर्चाहि आमसभेत होत असते.

यूनोच्या आमसभेला कायदा करतां येत नाही. आमसभा एखाद्या प्रश्नावर चर्चा करते आणि शिफारस करते.

जगांतील कोणत्याहि राष्ट्रांशीं संबंध येणाऱ्या प्रश्नावर आमसभेंत चर्चा केली जाते. कोणत्याहि राष्ट्रांच्या "घरगुती बाबी" सोडून कोणत्याहि प्रश्नावर चर्चा केली जाते. स्थानिक बाबींवर विचार केला जात नाही. पण जर कोणी कांही माल एका राष्ट्रांतून नेऊन दुसऱ्या राष्ट्रांत विकत असेल, किंवा पेरूमधून दुसऱ्या राष्ट्रांतील शाळांमध्यें शिकविण्यासाठी शिक्षक नेण्याची कोणाची योजना असेल, तर त्या प्रश्नावर अगर योजनेवर आमसभेंत चर्चा करतां येते. कारण ते प्रश्न आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे असतात.

सबंध जगाचे नागरिक मानतील अशा प्रकारचे कायदे आमसभेला करतां येत नाहींत. तुम्हीं काय करावें याबाबत तुमचें सरकार जसें सांगतें त्याप्रमाणें आमसभा सांगू शकत नाहीं. सर्व सरकारांनीं तशी सत्ता अद्यापि

आमसभेला दिलेली नाहीं. कोणत्याहि राष्ट्रांत अफू आणण्यास प्रत्येक राष्ट्रानें मनाई करावी, अशा प्रकारची शिफारस आमसभा करूं शकते. अशा शिफारशीची छापील प्रत प्रत्येक राष्ट्राकडे पाठविण्यांत येते. मग कांहीं राष्ट्रें तशी मनाई करतात आणि कांहीं राष्ट्रें करीत नाहींत.

आमसभेच्या शिफारशीप्रमाणें कृति करण्याचें जर एखाद्या राष्ट्रानें नाकारलें तर—समजा एखाद्या राष्ट्रानें अफू विकण्यास मुभा ठेवली, किंवा शिक्षकांची देवघेव करण्याच्या योजनेला एखाद्या राष्ट्रानें नकार दिला,—इतर सभासद राष्ट्रांचे प्रतिनिधी आमसभेपुढें त्याबाबत भाषणें करूं शकतात, आणि त्यांची मनें वळविण्याचे प्रयत्नहि करूं शकतात.

प्रत्यक्षांत अशा मार्गानें बरेच प्रश्न सोडवितां येनात, आणि आमसभेच्या शिफारशीप्रमाणें राष्ट्रें बऱ्याच गोष्टी करतात.



आमसभेचें कार्य मुख्यत्वें त्रिविध आहे. पहिलें कार्य—प्रत्येकाचें जीवन अधिक सुखी व समाधानी करणें, दुसरें कार्य—जगांत शांतता नांदवणें, तिसरें कार्य—संघटनेची व्यवस्था ठेवणें.

यापैकीं, प्रत्येकाचें जीवन अधिक सुखी व समाधानी करण्याच्या कार्यात यूनोच्या आर्थिक व सामाजिक मंडळाचें आमसभेला सहाय्य मिळतें. या मंडळासंबंधींच्या प्रकरणांत खालील कार्य करण्यासाठीं हें मंडळ काय करतें याची अधिक माहिती मिळेल.

चांगलें अन्न, वस्त्र व चांगली घरें मिळविण्यासाठीं लोकांस सहाय्य करणें.
नोकऱ्या मिळवितां याव्यात म्हणून सर्वास संधि देणें.
दुसऱ्या राष्ट्रांतील खरेदी सुलभ करण्यास प्रत्येक राष्ट्रास मदत करणें.
चित्रें, पुस्तकें, चित्रपट, रेडिओ, शाळा व कॉलेजें यांच्या मार्फत सर्व राष्ट्रांचा परस्पर परिचय वाढविणें.
लोकांस निरोगी व सुदृढ करणें.
लोकांस अधिक स्वातंत्र्य देणें.

दुसरे कार्य राष्ट्रा-राष्ट्रांतील लढे थांबविण्याबाबतचें. हें कार्य वास्तविक सुरक्षा-मंडळाचें आहे. या सुरक्षा-मंडळाची माहिती पुढें करून घेऊं. परंतु या कामी आमसभा सहाय्य करते. जेव्हां दोन राष्ट्रें भांडणास उठतात, किंवा दोन राष्ट्रांत भांडण निर्माण करणारा एखादा तंटा उपस्थित होतो तेव्हां सुरक्षा-मंडळानें त्यावर त्वरित विचार करावयाचा असतो. पण जर सुरक्षा-मंडळानें त्याबाबत काहीं केलें नाहीं, तर आमसभा त्यांत लक्ष घालते, त्याबाबत चर्चा करते, आणि आपल्याला योग्य वाटेल अशी शिफारस करते.

यूनोच्या सनदेंतील १२ व्या कलमानुसार एखाद्या प्रश्नावर जेव्हां सुरक्षा-मंडळ चर्चा करीत असेल तेव्हां त्यावर आमसभेला चर्चा करतां येत नाही. हें योग्यच आहे. समजा, फॉकलंड बेटें आर्जिण्टाइनपाशीं रहावीत असा आमसभेनें निर्णय दिला आणि तीं बेटें इंग्लंडपाशीं रहावीं असें सुरक्षा-मंडळानें मत दिलें, तर त्यामुळें कांहीं तंटा मिटणार नाही. उलट त्यामुळें तंटा मात्र सुरू होईल. जे तंटे सुरक्षा-मंडळाकडून मिटविले गेलेले नाहीत त्या तंटयांवरच आमसभेला विचार करतां येतो.

प्रत्यक्ष तंटे मिटविण्यांत भाग घेण्यापेक्षा जगांत शांतता नांदविण्याच्या सर्वसाधारण योजनेचाच आमसभा विचार करते. मित्रत्वाला विघातक असे देशान्तराचे कायदे किंवा दुसऱ्या राष्ट्रांतून स्वार्थी मार्गानें अन्न, तेल, रबर यांची आयात अगर युद्धाला निमंत्रण देणारे अन्याय्य तह हे बदलून घेण्यासाठी आमसभेचे प्रतिनिधी प्रयत्न करतात.

सबंध जगांत बंदुका, रणगाडे, युद्धनौका व इतर भयानक अस्त्रें निर्माण करण्यासाठी किती पैसा खर्च होतो व तो कमी कसा करतां येईल याचा आमसभेंतील प्रतिनिधींनी विचार केला पाहिजे.

त्यांनीं आंतरराष्ट्रीय कायदे निर्माण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सबंध जगाला समजेल अशा तऱ्हेची कायदापद्धति तयार करण्यासाठीं आणि शक्य तर ती लिहून काढण्यासाठी त्यांनीं चर्चा केली पाहिजे.

(आंतरराष्ट्रीय कायद्याबाबत आंतरराष्ट्रीय न्यायालयावरील प्रकरणांत जास्त माहिती दिली आहे.)

आमसभा ही यूनोची अशी एकच शाखा आहे, की जेथें सर्व सभासद राष्ट्रांचे प्रतिनिधी जमतात. म्हणूनच सबध यूनोची व्यवस्था पहाण्याची जबाबदारी आमसभेवर येऊन पडते. याबाबतीत चर्चा किंवा शिफारशी करण्यापलीकडे जाऊन आमसभेला प्रत्यक्ष निर्णय घेतां येतात.

कोणत्याहि राष्ट्राला यूनोचे सभासदत्व देण्यापूर्वी किंवा एखाद्या राष्ट्राचें सभासदत्व रद्द करण्यापूर्वी आमसभेचें मत घ्यावें लागतें. तीन मंडळे आणि न्यायालय यांसाठी लागणारे सभासद आमसभाच निवडते. (या बाबतींत तो विषय आला कीं अधिक माहिती दिली जाईल.) विश्वस्त कराराचा स्वीकार करावा कीं नाही हें आमसभेच्या मतावरून ठरविता येतें. त्याचप्रमाणें सचिवालयाला मार्गदर्शन करणारे नियम आमसभाच करते.

दर वर्षी यूनोच्या प्रत्येक शाखेला आपल्या कार्याचा अहवाल आमसभेला सादर करावा लागतो. आमसभा या अहवालावर काळजीपूर्वक विचार करते. त्यानंतर पुढें काय करणें आवश्यक आहे याबाबत आमसभा प्रत्येक शाखेकडे



आपल्या शिफारशी पाठविते, आणि बहुतेक वेळीं आमसभेच्या शिफारशी प्रमाणें सुरक्षा-मंडळाला पाऊल उचलावें लागतें.

सबंध यूनोची संघटना कशी सुधारतां येईल यावरहि आमसभेचे सभासद चर्चा करतात. त्याचप्रमाणें यूनोच्या सनदेंत कांहीं दुरुस्ती करावयाची असेल तर ती आमसभेच्या मतानेंच करतां येते.

यूनोच्या अर्थव्यवस्थेकडेहि आमसभेलाच लक्ष पुरवावें लागतें. यूनोच्या खर्चासाठीं पुरेसा पैसा जमविणें केव्हां केव्हां जड जातें. कारण यूनो म्हणजे कांही कॉंग्रेस किंवा पार्लमेंट नव्हे. तिला कर लादतां येत नाहींत. यूनोला किती पैसे दिले पाहिजेत याबाबत राष्ट्रांना कांहीं फर्मावितां येत नाहीं किंवा पैसे न दिल्यास मतदानाचा हक्क हिरावून घेतां येत नाहीं.

यूनोच्या प्रत्येक शाखेनें दरवर्षी किती खर्च करावा व तो कशासाठीं करावा हें आमसभा ठरवितें.

हें फार महत्वाचें आहे. कारण प्रत्येक शाखेला जी कृति करावयाची असेल त्यासाठी खर्च येतोच. एखादी कृति आमसभेला थांबवावयाची असेल तर पैसा न देऊन ती थांबवितां येते. या हक्कामुळें यूनोच्या सर्व कारभारावर आमसभेचें नियंत्रण रहातें.

# प्रकरण ४

## सुरक्षा-मंडळ
## जें शांतता रक्षणाचें कार्य करतें

आमसभेचे प्रतिनिधी चर्चा करतात, वादविवाद करतात आणि अमुक अमुक गोष्टी कराव्यात अशा शिफारशी करून ते आपापल्या घरीं परततात. त्यानंतरचें कार्य लहानशाच पण सामर्थ्यवान सुरक्षा-मंडळाकडून पार पाडलें जातें. जगाच्या कोणत्याहि भागांत अशांतता सुरू होतांच त्याची दखल घेण्यास सुरक्षा-मंडळ तत्पर असतें.

सुरक्षा-मंडळाची भूमिका शाळेंतल्या पंतोजीसारखी असते. शाळेंतल्या मुलांचें जेव्हां भांडण होतें, तेव्हां तें चांगले पंतोजी जसे चाणाक्षपणानें मिटवितात, त्याप्रमाणेंच सुरक्षा-मंडळ आपली भूमिका पार पाडील. भांडण करणाऱ्या राष्ट्रांना दटावून त्यांनीं आपलें भांडण शांततेनें मिटवावें अशी सुरक्षा-मंडळाला शिफारस करतां येते.

पण जर एखादें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करण्यास सज्ज झालें तर सुरक्षा-मंडळ म्हणजे पोलीस प्रमुख आहे हेंहि त्या आक्रमक राष्ट्राला कळून येईल. यूनोचें सारें सामर्थ्य शांतताभंग करणाऱ्या राष्ट्राच्या विरुद्ध घालण्याची ताकद सुरक्षा-मंडळाला आहे. तथापि सर्व आंतरराष्ट्रीय भांडणें सुरक्षा-मंडळाला चाणाक्ष पंतोजीप्रमाणें सोडवितां येतील व त्या मंडळाला पोलीस प्रमुखाचा पोषाख चढवावा लागणार नाहीं अशी आशा आहे.

"आमच्या शेजारचें सामर्थ्यवान राष्ट्र आमच्या राष्ट्राच्या कारभारांत ढवळाढवळ करीत आहे." अशा प्रकारची तक्रार सुरक्षा-मंडळांतील एका प्रतिनिधीनें केली. त्याबरोबर हिरव्या गाद्यागिरद्यांनीं सजवलेल्या अकरा खुर्च्यांत थोडी खळबळ झाली आणि हा प्रतिनिधी कोणत्या प्रकारची मदत मागणार हें ऐकण्यासाठीं सर्व प्रतिनिधी पुढें सरसावले.

"हा प्रश्न मी सुरक्षा-मंडळापुढें मांडू इच्छितो. म्हणजे त्याबाबत मंडळानें चौकशी करावी," असें हा प्रतिनिधी म्हणाला.

सुरक्षा-मंडळाच्या अध्यक्षांच्या एका बाजूला सरचिटणीस बसतात आणि दुसऱ्या बाजूला सहाय्यक सरचिटणीस बसतात. वरील तक्रार ऐकून

अध्यक्षांनी कांही क्षण सरचिटणीसांशी हळुहळू बोलणीं केलीं. तेवढ्यांत सहाय्यक सरचिटणीसांनी थोडक्यांत टांचण केलें.

सुरक्षा-मंडळाच्या अकरा प्रतिनिधींच्या मागच्या दोन रांगांत त्यांचे सहाय्यक बमतात. त्यासमोर इंग्रजी 'टी' T या अक्षराच्या आकाराचें टेबल अमते. त्यावर चार दुभाषी बसलेले असतात . त्यापैकी एक दुभाषी लहानसे तें भाषण पुन्हां फ्रेंच भाषेंत ऐकवितो. त्यांच्यामागें स्टेनोग्राफर्स बसलेले असतात. ते लघुलिपीनें चार भाषेंत लिहितात. या मंडळांत इंग्रजी, फ्रेंच, स्पॅनिश आणि रशियन या चार भाषा वापरल्या जातात.

मग अध्यक्ष विचारतात, "या विषयावर कोणा प्रतिनिधीला कांही बोलावयाचें आहे काय ?"

त्यावर एखादा प्रतिनिधी भाषणासाठी आपली पिवळी पेन्सिल वर करतो. ताबडतोब दिव्यांचा प्रकाश थोडा प्रखर होतो. त्या आधुनिक आणि सुंदर सभागृहांत शांतता पसरते. सुरक्षा-मंडळाच्या या सभागृहाची रचना वैशिष्ठ्यपूर्ण आहे. त्यांत प्रतिध्वनी उमटत नाहीं. आणि गंभीर शांतता टिकूं शकते. प्रतिनिधींच्या खुर्च्यांमागें ध्वनी दबवणाऱ्या पातळ लांकडाची भिंत आहे. पलीकडच्या भिंतीवर जडूं न शकणारें गुलाबी व बदामी रंगाचे कापड आहे. पायाखालीं जाड व मऊ असा हिरव्या रंगाचा गालिचा आहे. यामुळें कडाक्याच्या चर्चेशीं विरोधाभास निर्माण करणारें असें प्रशांत वातावरण निर्माण होतें.

सुरक्षा-मंडळांतील प्रतिनिधीनें आपलें भाषण आटोपलें कीं दुभाषी त्या भाषणाचें भाषान्तर करतो. या सभागृहांत दूरध्वनिक्षेपक यंत्रांची व्यवस्था आहे. त्यामुळें प्रतिनिधींची भाषणें सभागृहांतील सर्व प्रतिनिधी व गॅलरीतील वार्ताहर यांना नीट ऐकूं जातात.

या खोलीत सुमारें सातशें लोक मावतात. तरीहि एकाद्या प्रतिनिधीच्या भाषणानंतर हास्यलकेरी, टाळ्या किंवा अन्य ध्वनि निघत नाहीत. येथील कामकाज फार गंभीरपणें चाललेलें असतें. सुरक्षा-मंडळाच्या सभागृहांतील बरीचशी जागा वार्ताहर व अधिकृत निरीक्षक व्यापतात. हे अधिकृत निरीक्षक आमसभेचे सभासद असलेल्या पण सुरक्षा-मंडळाचे सभासद नसलेल्या अशा ४० राष्ट्रांचे असतात. त्यांतील कांही थोड्या जागा तुमच्या आमच्या सारख्यांसाठीं ठेवलेल्या असतात. ज्यांना सुरक्षा-मंडळाचें कामकाज पहावयाचें असतें त्यांना आंत जाऊन बसतां येतें.

सुरक्षा-मंडळांतील हे प्रतिनिधी साध्याच वेषांत असतात खरे, पण त्यांच्या मताप्रमाणें जगांतील सर्वांत सामर्थ्यवान अशी लष्करी शक्ति असते.

जरूर पडली तर युद्ध सुरूं करूं पहाणाऱ्या, इच्छिणाऱ्या सरकारचा अग्नि-वर्षाव व रक्तपात यामध्यें नायनाट करण्याची ताकद त्या मतामागें असते.

या सभागृहांतील लांबट आणि बांकदार मेजाच्या एका टोंकाला कांही जादा खुर्च्या ठेवलेल्या असतात. कांहीं राष्ट्रें सुरक्षा-मंडळाचे सभासद नसतात. अशा राष्ट्रांवर जर कोणा मोठ्या राष्ट्रांनीं बंदुका रोखल्या तर या राष्ट्रांचे प्रतिनिधी चिंताग्रस्त होऊन संरक्षण मागण्यास येतात. त्यांच्यासाठीं या जादा खुर्च्या असतात. या प्रतिनिधीच्या माथ्यावर मायलेकांच्या अशा जबाबदाऱ्या असतात. पित्यांच्या चिंता आणि महत्वाकांक्षा असतात. ते प्रतिनिधी या सभागृहांत आशेनें येतात. आणि ज्याप्रमाणें मंडळानें निर्णय घेतला असेल त्याप्रमाणें नवें धैर्य व उत्साह घेऊन अगर निराश होऊन बाहेर पडतात.

एका राष्ट्राचा एक या प्रमाणें सुरक्षा-मंडळांत एकूण अकरा प्रतिनिधी असतात.

चीन, फ्रान्स, रशिया, ब्रिटन आणि अमेरिका ही जगांतील सर्वांत सामर्थ्यशाली राष्ट्रें, हीं राष्ट्रें नेहमीच सुरक्षा-मंडळाचे सभासद असतात.

इतर सहा सभासद राष्ट्रें आमसभा निवडते. आमसभेंत एखाद्या इसमाची निवड होत नाहीं. त्यासाठीं राष्ट्राची निवड केली जाते.

दर वर्षीं दोन वर्षाच्या मुदतीसाठीं तीन सभासद राष्ट्रांना निवडण्यांत येतें. एखाद्या सभासद राष्ट्राची मुदत संपली की ताबडतोब त्याच राष्ट्राला पुन्हां निवडून देतां येत नाहीं. दुसऱ्या देशाला संधि देण्यासाठी त्या राष्ट्राला कमीत कमी एक वर्षभर सुरक्षा-मंडळाबाहेर रहावें लागतें.

सुरक्षा-मंडळाच्या सभासदांसाठीं ज्या सहा राष्ट्रांना निवडण्यांत येतें तीं राष्ट्रें छोटीं असतात. किंवा नेहमींच सभासद असलेल्या पांच बड्या राष्ट्रांइतकी तरी ती मोठीं नसतात. म्हणून सहा छोटीं राष्ट्रें आणि पांच मोठीं राष्ट्रें असें त्यांचें प्रमाण असतें.

पांच बड्या राष्ट्रांची एकूण लोकसंख्या यूनोच्या इतर सर्व सभासद-राष्ट्रांच्या एकूण लोकसंख्येपेक्षां अधिक आहे. तथापि ही बडीं राष्ट्रें सुरक्षा-मंडळांत निम्म्यापेक्षांहि कमी जागा स्वीकारतात हा त्यांचा चांगुलपणा आहे.

सभागृहांत प्रत्येक भाषणाचें भाषांतर होतें. त्यामुळें बरेच श्रोते त्या पुनरावृत्तीला कंटाळलेले असतात. सुरक्षा-मंडळांतील अकरा सभासदांपैकीं बहुतेकांना दोन किंवा अधिक भाषा समजतात. ते एकदम दुभाषीला सांगतात. "माझ्या भाषणाचें तुम्ही बरोबर भाषांतर केलें नाहीं." आणि मग त्याला पुन्हां भाषांतर करून सांगावें लागतें.

मंडळाची बैठक चालू असतांनाच एखादा प्रतिनिधी वृत्तपत्र वाचतांनाचें छायाचित्र आपण पाहिलें असेल. पण त्यावरून त्याचें बैठकीच्या कामकाजाकडे दुर्लक्ष आहे असें समजण्याची गरज नाहीं. प्रतिनिधींना लांबलचक भाषण समजलें की त्यांपैकी एखादा दुसरा भाषातर चालू असतांना उठून बाहेर जातो, किंवा आजुबाजूला फिरून हातपाय मोकळे करतो.

प्रत्येकवेळी प्रतिनिधीचें भाषण जेव्हां चालू होतें तेव्हां त्याच्यावर प्रखर असे प्रकाशझोत छतावरून खाली फेंकले जातात. त्यामुळें चित्रपटाचे, टेलिव्हिजनचे अगर वृत्तपत्राचे कॅमेरे वक्त्याच्या चेहऱ्यावरील विकारांचें यथायोग्य चित्रण करूं शकतात. प्रत्येक प्रतिनिधीच्या पुढें त्याच्या टेबलावर स्वतंत्र मायक्रोफोन असतो. त्यामुळें त्यांचे आवाज जगांतील लाखो श्रोत्याच्या कानी पडू शकतात. गॅलरींत शेकडों वार्ताहर गर्दी करतात.



त्यांच्यासाठी खास शेजारी खोली आहे. तेथें ते वार्ताहर बाहेरगांवीं पाठवायचें वृत्त लिहून तयार करतात. तेथून प्रत्येक शहराला तारायंत्रांचें दळणवळण जोडलेलें असतें.

या अकरा प्रतिनिधींच्या अकरा सहाय्यकांची एक तज्ज्ञ समिती असते. मंडळाची बैठक कशी चालवावी याबाबतचे प्रश्न व नियम यावर ही समिती

विचार करते. पण या समितीला कोणताही निर्णय घेतां येणार नाहीं. ही समिती फक्त आपल्या शिफारशी मंडळाला सादर करते.

सुरक्षा-मंडळाचे अधिकृत प्रतिनिधी आपल्या बांकदार लांबट मेजाशी बसून चर्चा करतात. पण ते जें बोलतात त्यामुळें इतर लोकांच्या अंगावर कांटा उभा राहील. जगांतील मुत्सद्दी इतके स्पष्ट रोखठोक बोलतांना कधीं कुणी ऐकलें नसेल. तरीहि जेवढी अधिक कडाक्याची चर्चा होईल तेवढे हे प्रतिनिधी स्वस्थ असलेले दिसतात.

आपल्या मेजापाशी बसून हे प्रतिनिधी मोठमोठ्या चर्चा करीत असतात असें नाही. बहुतेक वेळां ते आपापल्या कचेरीत बसून मंडळासमोरील प्रश्नांचा अभ्यास करतात, आणि जागतिक प्रश्न सोडवण्यासाठी हजारों लोक ज्या सूचना करतात त्यांची तपासणी करतात.

मंडळाच्या दोन बैठकांमध्यें जो काळ सांपडतो त्या काळात हे प्रतिनिधी मंडळापुढील तंट्यावर आपापसांत चर्चा करतात. या चर्चेचा परिपाक तेवढा मंडळाच्या बैठकीतील भाषणांत व्यक्त होत असतो.

उदाहरणार्थ—फ्रांको स्पेन बाबत यूनोने चौकशी करावी अशा आशयाची सूचना ऑस्ट्रेलियन प्रतिनिधीनें आणली. इतरांनी आपलें कांही मत दिलें नाही. बैठक सुरू होतांच मात्र दोघां-दोघात, तिघा-तिघात याबाबत चर्चा सुरू झाली. शेवटी स्पेनबाबत चौकशी व्हावी असा ह्या चर्चेतून निष्कर्ष निघाला. परंतु जर ऑस्ट्रेलियन सूचनेवर बैठकीत ताबडतोब मतें घेतली असतीं, तर ती सूचना फेटाळली गेली असती. कारण त्या ठरावाच्या भाषेवर, कित्येक प्रतिनिधींचा आक्षेप होता. पण पांच दिवसांच्या या खाजगी चर्चेत एक नवीनच ठराव तयार करण्यांत आला. शेवटच्या दिवशीं तिघांनी सकाळच्या अल्पोपहाराच्या वेळीं तो ठराव पूर्ण केला. तो ठराव पुढें बैठकीत मांडण्यांत आला. त्यावर खुली चर्चा झाली, आणि तो ठराव मजूर झाला.

दर कांही दिवसांनी त्यांची बैठक होते. संपूर्ण दोन आठवडेभर त्यांची कधीं बैठक झाली नाही असें कधीं होत नाही. कोणत्याहि सभासदाला बैठक बोलवायची असेल तर तो बोलावू शकतो.

बहुतेक सर्व बैठका खुल्या व जाहीर असतात. पण एखाद्या वेळीं मंडळाची खाजगी बैठक होते. त्यावेळीं मायक्रोफोन नसतात, कॅमेरे नसतात आणि वार्ताहरहि नसतात. त्या बैठकीचें कामकाज कुणालाहि कळत नाही. इतकेंच नव्हें तर यूनोचे सभासद असलेल्या सरकारांनाहि त्या बैठकींत काय झालें याचा थांगपत्ता लागत नाहीं.

बहुतेक बैठका न्यू यॉर्क येथील यूनोच्या मुख्य ठाण्यावरच होतात. परंतु जगाच्या कोणत्याहि भागांत सुरक्षा-मंडळ बैठक घेऊं शकते. समजा—दक्षिण अमेरिकेंत युद्ध सुरू झालें, तर सुरक्षा-मंडळ कदाचित आपल्या बैठका दक्षिण अमेरिकेंतहि भरवील.

सुरक्षा-मंडळाच्या प्रत्येक सभासदानें आपल्या राष्ट्राच्या मूळवर्णाप्रमाणें (आल्फाबेटिकल ऑर्डरनें) मंडळाचें अध्यक्षपद क्रमाक्रमानें स्वीकारावें व अध्यक्षपदाची मुदत एका महिन्यापुरती असावी असें सुरक्षा-मंडळानें सुरवातीलाच ठरविलें. पहिल्या बैठकीच्या वेळीं ऑस्ट्रेलियाला अध्यक्षपद मिळालें. नंतर ब्राझिलचा प्रतिनिधी अध्यक्ष झाला. त्यानंतर चीनला अध्यक्षपद लाभलें. या क्रमानुसार ज्या राष्ट्राची पाळी असेल त्या राष्ट्राला कोणालाहि आपला प्रतिनिधी म्हणून नेमतां येतो व तो एक महिन्यापुरता अध्यक्ष होतो.

सुरक्षा-मंडळांतील मतदान हात वर करून होतें. वर केलेले हात एक कारकून मोजतो आणि अध्यक्ष निकाल जाहीर करतात.

जें राष्ट्र सुरक्षा-मंडळाचें सभासद असतें, त्या राष्ट्रानें मंडळांतील आपला प्रतिनिधी कसा निवडावा हें आपण ठरवावयाचें असतें. अमेरिकेच्या प्रतिनिधीला परराष्ट्रीय वकिलाचा दर्जा असतो. त्या प्रतिनिधीला अमेरिकन सरकार पगार (वर्षाला २०,००० डॉलर) देतें. या प्रतिनिधीची नेमणूक अमेरिकेचे अध्यक्ष करतात. अध्यक्ष नियोजित प्रतिनिधीचें नांव सीनेटला सादर करतात. जर सीनेटला तें नांव पसंत नसेल तर अध्यक्षांना दुसरें एखादें नांव सुचवावें लागतें.

सुरक्षा-मंडळांतील प्रतिनिधी एखाद्या दिवशीं मर्जीस आलें म्हणून "होय" किंवा "नाहीं" अशीं मतें देत नाहींत. प्रत्येक प्रतिनिधी आपल्या सरकारच्या आदेशानुसार मत देतो.

प्रतिनिधींचीं भाषणें झाली कीं, अध्यक्ष सर्वांवर एकदां दृष्टिक्षेप टाकतात, आणि म्हणतात, "जर कुणाला कांहीं बोलावयाचें नसेल तर ही सूचना मी मतास टाकतो. आपलें सैन्य इराणमधून ६ मे पर्यंत काढून घेईन असें आश्वासन देणारा रशियाकडून आलेला खलिता स्वीकारण्यासंबंधींची सूचना आपल्या समोर आहे."

नऊ प्रतिनिधींनीं आपले हात वर केले. तीं मतें कारकुनानें मोजलीं. कामकाजाची ही साधी पद्धति आहे. एकदां त्यांनीं रशियाचें आश्वासन स्वीकारलें कीं ६ मे पर्यंत या प्रश्नावर चर्चा होणार नाहीं. "ही सूचना मंजूर झाली आहे." असें अध्यक्षांनीं जाहीर केलें. कारण कार्यपद्धतीच्या

प्रश्नासंबंधींची -- मंडळानें पुढचें पाऊल कसें टाकावें याबाबतची -- सूचना मंजूर होण्यास सात मतें पुरेशीं असतात.

तथापि दुसऱ्या एखाद्या दिवशीं एखादा प्रतिनिधी मोठें भाषण करतो, "आणि म्हणून मी असें सुचवितों कीं, इतर सर्व राष्ट्रांना त्या राष्ट्राला तेल, कोळसा किंवा शस्त्रास्त्रें विकूं नयेत अशी आम्ही शिफारस करावी," असेहि तो प्रतिनिधी शेवटीं सुचवितो.

या सूचनेवर मतदान होतें. समजा सूचनेच्या बाजूनें नऊ हात वर झाले, आणि चीन व अमेरिका या दोन राष्ट्रांनी मतें दिलेली नाहींत.

अशावेळी "सूचना नामंजूर" असें अध्यक्ष जाहीर करतात.

या सूचनेसारखी जी सूचना दुसऱ्या राष्ट्रावर एखादा इलाज योजण्यासंबंधीं असते, ती सूचना सात मतांनीं पास होते. पण त्या सातहि मतांमध्यें चीन, फान्स, रशिया, ब्रिटन व अमेरिका या पाचहि बड्या राष्ट्रांचीं मतें असतील तर ती पास होते. या पांच बड्या राष्ट्रांपैकीं कोणत्याहि एका राष्ट्राला मत देऊन नकाराधिकार (व्हेटो) वापरतां येतो व सूचना नामंजूर करतां येते.

हा नकाराधिकार निरनिराळया प्रकारच्या प्रश्नांत वापरतां येतो.

जर एका राष्ट्रानें केलेल्या एखाद्या गोष्टीला दुसऱ्या एका राष्ट्रानें सतत विरोध चालू ठेवला, तर सुरक्षा-मंडळाचे तीन सभासद एक अधिकृत संदेश लिहूं शकतात की, "हा तंटा बराच काळ चालू आहे, तरी तुम्हीं राष्ट्रांनीं हा तंटा शांततेच्या मार्गानें मिटवावा अशी सुरक्षा-मंडळाची शिफारस आहे." या संदेशावर सुरक्षा-मंडळावर मतदान होईल. परंतु कांहीं कारणास्तव इंग्लंडनें जर नकार दिला तर सदर संदेश पाठवितां येणार नाही.

कोणताहि तंटा मिटविण्याबाबत सुरक्षा-मंडळापुढें आलेली शिफारस कोणतेंहि एक बडें राष्ट्र आपला नकाराधिकार वापरून फेटाळून लावूं शकतें.

एखादा तंटा युद्धास कारणीभूत होईल असें जर कांहीं सभासदांनीं ठरविलें, तर कोणतेंहि एक बडें राष्ट्र सरळ मांगू शकतें कीं, "नाहीं, तो केवळ एक प्रसंग आहे. तो कांहीं भीतिदायक असा तंटा नाहीं." अशा वेळीं कोणताहि अपवाद नाहीं. खुद्द तंटयासंबंधी असलेल्या निर्णयावर सुद्धां कोणतेंहि एक बडें राष्ट्र नकाराधिकार वापरूं शकतें.

एखाद्या राष्ट्राविरुद्ध नाकेबंदी करून, सैन्य वापरून किवा १० व्या प्रकरणांत सांगितलेली कोणतीही उपाययोजना करून जर त्या राष्ट्राला शासन करावयाचें असेल, तर कोणतेंहि एक बडें राष्ट्र हा नकाराधिकार वापरून तसें करण्यास सुरक्षा-मंडळास प्रतिबंध करूं शकतें.

याच नकाराधिकाराच्या जोरावर अमेरिका किंवा इतर कोणतेंहि बडें राष्ट्र आपल्याविरोधी लष्करी इलाज करण्याची शिफारस फेटाळून लावूं शकतें.

कोणतेंहि राष्ट्र यूनोमध्यें सभासद म्हणून येण्यास हाच नकाराधिकार प्रतिबंध करूं शकतो. समजा, जर अमेरिकन सरकारनें असें ठरविलें कीं, जनरल फ्रँकोचें स्पॅनिश सरकार हुकूमशाही, लोकशाही विरोधी, जुलमी व यूनोच्या तत्वांविरुद्ध बऱ्याच गोष्टी करणारे आहे, तर अमेरिकन अध्यक्ष सुरक्षा-मंडळांतील आपल्या प्रतिनिधीला नकाराधिकार वापरण्याचा आदेश देऊं शकतात. आणि अमेरिकेला तसें वाटेपर्यंत फ्रँकोच्या स्पेनला यूनोमध्यें बसतां येणार नाही.

वाईट वर्तणुकीबद्दल कोणत्याहि सभासद राष्ट्रांचें यूनोचें सभासदत्व तहकूब ठेवण्यास किंवा तें रद्द करण्यास हा नकाराधिकार प्रतिबंध करूं शकतो. जर रशियानें सांगितलें कीं, अर्जेन्टाइनला यूनोंतून घालविलें पाहिजे, आणि इंग्लंडने तसें करण्यास नकार दिला तर अर्जेन्टाइनचें सभासदत्व पूर्वीप्रमाणेंच चालू रहातें.

संघटनात्मक बदल करण्यासाटीं यूनोच्या सनदेंत बदल सुचविणारी जर एखादी दुरुस्ती मांडली गेली व तिला कोणत्याहि एका बड्या राष्ट्रानें विरोध केला तर तसा बदल होऊं शकत नाही. ज्या राष्ट्राला राजा आहे तें राष्ट्र यूनोचें सभासद नसावें अशी जर आम्हीं दुरुस्ती मांडली तर इंग्लंड नकाराधिकार वापरून ती दुरुस्ती फेटाळून लावू शकते. ज्या राष्ट्राचें सरकार कम्युनिस्ट स्वरूपाचें असेल ते राष्ट्र यूनोचें सभासद नसावें अशी दुरुस्ती जर इंग्लंडला हवी असेल तर त्याविरुद्ध रशिया आपला नकाराधिकार वापरूं शकतो. कोणत्याहि राष्ट्रानें वसाहतीवर साम्राज्य ठेवू नये अशी दुरुस्ती जर रशियाला पाहिजे असेल तर फ्रान्स किंवा इंग्लंड नकाराधिकार वापरूं शकतात.

परंतु अशा कांही गोष्टी आहेत कीं जेथें नकाराधिकार वापरतां येत नाही.

समजा, कांहीं आयरिश लोकांनीं पंचवीस इंग्रज लोकांना ठार मारलें आहे आणि म्हणून इंग्लंडनें आयर्लण्डमध्यें लष्कर पाठवून तेथील खेडीं बेचिराख करण्यास सुरुवात केली आहे. अशावेळीं इंग्लंडला असें म्हणण्याचा अधिकार नाहीं कीं, ही आमची खाजगी बाब आहे. तेव्हां या प्रश्नावर चर्चा करण्याची किंवा दोष कुणाचा हें ठरविण्याची सुरक्षा-मंडळास गरज नाहीं. या प्रश्नावर सुरक्षा-मंडळांत चर्चा करण्यास

नकाराधिकार प्रतिबंध करूं शकत नाहीं.

या गोष्टीला इतके महत्व आहे की, निरनिराळीं सरकारें आपापले तंटे सुरक्षा-मंडळांत चर्चिले जाऊं नयेत म्हणून ते मिटविण्यासाठी आटोकाट प्रयत्न करतात.

ब्रिटिश सैनिक इजिप्तमध्यें ठेऊं देण्यासंबंधीच्या एका जुन्या तहनाम्या-बद्दल सुरक्षा-मंडळाकडे तक्रार करण्याची जेव्हां इजिप्तने धमकी दिली तेव्हां इंग्लंडने नवीन तहनामा सुचविण्यासाटी मि. बेव्हिन यांना अलेक्झाण्ड्रियाला पाठविलें.

सभासद नसलेल्या राष्ट्राला त्याचा प्रतिनिधी सुरक्षा-मंडळांत पाठविण्यास आमंत्रण देण्याचें जर सुरक्षा-मंडळानें ठरविलें तर त्याविरुद्ध नकाराधिकार वापरतां येत नाही. आंतरराष्ट्रीय न्यायालयाचे न्यायाधीश निवडण्यासाठी जेव्हां मतदान होते तेव्हाही नकाराधिकार वापरता येत नाही.

एकदा सीरिया व लिबेनॉन यांनी आपल्या मुलुखांतून ब्रिटिश व फ्रेन्च फौजा काढून घेण्यांत याव्या अशी मागणी केली. इंग्लंड व फ्रान्स यांनीं त्यांवर बऱ्याच सबबी पुढें केल्या. पण अमेरिकन व रशियन प्रतिनिधींनी जेव्हां सीरिया व लिबेनॉन याच्या मागणीला पाठिबा दिला तेव्हां इंग्लंड व फ्रान्स यांनी आपल्या फौजा काढून घेण्याचे मान्य केलें. जेव्हां या प्रश्नावर मतदान झालें तेव्हां इंग्लंड, फ्रान्स, सीरिया व लिबेनॉन यांचे प्रतिनिधी बसून होते. पण त्यानां मत देतां येत नव्हतें. कारण इंग्लंड व फ्रान्स यांचा त्या तंटयांत संबंध होता, आणि सीरिया व लिबेनॉन सुरक्षा-मंडळाचे सभासद नव्हते.

जेव्हां एखादा तंटा शांततेनें मिटविण्यासाठी सुरक्षा-मंडळांत मतदान होतें, तेव्हां त्या तंटयाशी संबंध असलेल्या राष्ट्रांना त्या मतदानांत भाग घेतां येत नाहीं, अशा वेळी पांच बडया राष्ट्रांपैकी तंटयाशीं संबंध नसलेल्या बडया राष्ट्रांच्या मतांसह एकूण सात मतें मिळालीं कीं सूचना मंजूर होते.

यूनोच्या सनदेमध्यें हा नकाराधिकार कां घालण्यांत आला? याचें कारण अगदीं साधें आहे. या नकाराधिकाराशिवाय आपण सनद स्वीकारणार नाहीं असें अमेरिकन सीनेटनें व सोव्हिएट सरकारनें प्रथमच स्पष्ट केलें. आणि या दोन मोठया राष्ट्रांना वगळून यूनो स्थापन करणें खुळेपणाचें आहे असें इतर राष्ट्रांना वाटलें.

सुरक्षा-मंडळाचें काम कांहीं आमसभेच्या कामासारखें नसतें. रोगराई नष्ट करण्याच्या आणि गरिबांचे दारिद्र्य कमी करण्याच्या किंवा कामगारांना वेतन मिळवून देण्याच्या आणि चांगलें शिक्षण देण्याच्या योजनांवर आमसभेला

चर्चा करतां येते. युद्ध सुरू होऊं न देणें हेंच सुरक्षा-मंडळाचें काम आहे.

दोन राष्ट्रांमध्यें उपस्थित झालेल्या लहानशा तंट्यामुळेंहि परिस्थिति अधिकाधिक बिघडत जाण्याचा संभव असतो. नुसत्या बोलाचाली ऐवजीं घोषणा सुरू होतील. घोषणांवरून बहिष्काराचें सत्र सुरू करून एकमेकांचे व्यापार बसविण्याचे खटपटीस सुरुवात होईल. त्यानंतर सरहद्दीवरील बंदुकांच्या कांहीं फैरी झडतील आणि तीं राष्ट्रें युद्धास तयार होतील.

म्हणून कोणत्याहि दोन राष्ट्रांतील महत्वाचा तंटा मिटविण्याचे सुरक्षा-मंडळाकडून प्रयत्न होतात.

कधीं कधी आमसभाहि या कामी सहाय्य करते. पण आमसभेला तसे अधिकार नाहींत. दोन्हीं राष्ट्रांना तंट्यापासून परावृत्त करण्याची



शाळामास्तराची भूमिका आमसभेला करतां येते. आमसभेला पोलीस-प्रमुखाचें काम बजावतां येत नाहीं.

एकदां सुरक्षा-मंडळाची एक नाट्यपूर्ण अशी बैठक झाली. रशियानें इराणमध्यें ठेवलेले आपले सैनिक हा एक महत्व नसलेला प्रसंग आहे की तंटा आहे यावर चर्चा चालू होती. सुरक्षा-मंडळाचें काम तंटे मिटविण्यास मदत करण्याचें आहे. तंटे याचा अर्थ भितीदायक भांडणें असा आहे. केवळ कांहीं प्रसंग लक्षांत घेण्याची सुरक्षा-मंडळास गरज नाहीं. प्रसंग याचा अर्थ असा कीं, ज्याबाबत युद्ध करण्याचा कुणाचाहि हेतू नाहीं अशी वस्तुस्थिति, पण एखाद्या प्रसंगामुळें युद्ध उद्भवण्याचा संभव आहे कीं काय हे सुरक्षा-मंडळ पाहूं शकतें. परंतु या महत्व नसलेल्या प्रसंगामुळें युद्ध उद्भवण्याचा संभव नाहीं असा रशियन प्रतिनिधीनें आग्रह धरला.

इतकेंच नव्हें तर त्यानें सर्व सभासदांना एक आश्चर्याचा धक्काच दिला. कलम २७ नुसार तंट्याशीं संबंध असलेल्या राष्ट्राला मत देतां येत नाहीं हें प्रत्येकाला माहीत होते. पण इराणच्या प्रतिनिधीनें या प्रकरणाचा एक प्रसंग म्हणून उल्लेख केला होता म्हणून हा तंटा आहे हें आधीच ठरविणें सुरक्षा-मंडळाला भाग होतें. नाहीतर रशियन प्रतिनिधीला मत देण्याचा अधिकार मिळाला असता आणि रशियन सरकारला नको असलेली कोणतीहि तडजोड नकाराधिकार वापरून फेटाळून लावतां आली असती.

आमसभा मात्र अशा प्रसंगावर चर्चा करून शिफारशी करूं शकली असती. पण सुरक्षा-मंडळाचें कार्यक्षेत्र मर्यादित आहे. जेव्हां एखादे राष्ट्र दुसऱ्याबरोबर लढण्याची धमकी देते तेव्हां सुरक्षा-मंडळाला त्यांत हात घालतां येतो.

भाग ३ मध्यें यूनो तंटे कशी हाताळते ह्याचा उल्लेख आहे. त्या भागामध्यें सुरक्षा-मंडळाचें बरेंच कार्य आहे हें आढळून येईल.

२४ व्या कलमान्वयें असें स्पष्ट करण्यात आलें आहे की, कलम १ व २ यामध्यें सांगितलेल्या तत्वांचें सुरक्षा-मंडळाच्या निर्णयामध्यें पालन झालें पाहिजे. कलम १ व २ मध्यें खालील तत्वें समाविष्ट करण्यांत आली आहेत.

जगांत शांतता नांदवणें.

कोणत्याहि एका राष्ट्रावर दुसऱ्या राष्ट्रानें हल्ला केला तर तो थांबविणें.

सर्व राष्ट्रांकडून त्यांचे तंटे शांततेच्या मार्गानें, न्यायानें व आंतरराष्ट्रीय कायद्याचा मान ठेऊन मिटवून घेणें.

प्रत्येक राष्ट्रांतल्या लोकांना इतर राष्ट्रांतील लोकांप्रमाणें हक्क मिळवून देणें.

प्रत्येक राष्ट्रांतील लोकांना आपलें सरकार निवडण्याचा व तें सरकार कोणत्या प्रकारचें असावें हें ठरविण्याचा हक्क मिळवून देणें.

प्रत्येक राष्ट्राच्या स्वतःचा राज्यकारभार पहाण्याच्या हक्काला बाध येऊं न देणें.

जोपर्यंत दुसऱ्या राष्ट्राला जाचक होत नाहीं तोपर्यंत कोणत्याहि राष्ट्राच्या अंतर्गत बाबीत ढवळाढवळ न करणें.

सॅन फ्रॅन्सिस्को येथें यूनोची सनद ज्या लोकांनी लिहिली त्यांनीं असें भाकीत केलें कीं हीं तत्वें सुरक्षा-मंडळ कधींतरी विसरणें शक्य आहे. म्हणून त्यांनी त्याच २४ व्या कलमाला आणखी एक वाक्य जोडलें. तें हे कीं, सुरक्षा-मंडळानें आपल्या कार्याचा अहवाल आमसभेला सादर केला पाहिजे.

आमसभेंत सर्व सभासद राष्ट्रें असतात. सनदेतील वरील सर्व तत्वांचे सुरक्षा-मंडळाच्या निर्णयांत पालन झालेलें आहे कीं नाहीं हें आमसभेच्या सभासदांना पहावें लागतें.

या तत्वांच्या विरोधी असें सुरक्षा-मंडळानें कांहीं केलेलें असेल तर आमसभेला ताबडतोब सुरक्षा-मंडळाकडून अहवाल मागवितां येतो. त्यावर चर्चा करतां येते आणि अशी शिफारस करतां येते की आपण जें कांहीं केलेलें आहे तें यूनोच्या तत्वांच्या विरोधी असें आहे. आणि आमची अशी शिफारस आहे कीं या प्रश्नांवर आपण पुन्हां सर्वांगीण विचार करावा व निर्णय बदलावे.

या शिफारशीप्रमाणें सुरक्षा-मंडळानें वागावें अगर न वागावें; पण जर सुरक्षा-मंडळ तसें वागलें नाहीं तर अनेक लोकांकडून विरोधाचें वादळ उठेल.

# प्रकरण ५

# आर्थिक आणि सामाजिक मंडळ

## सर्वांचें जीवन अधिक सुखी करण्याचा प्रयत्न

यूनोचें आर्थिक आणि सामाजिक मंडळ म्हणजे जगाचे स्वच्छता-खातें आहे. (स्वच्छता-खातें हें कचरा गोळा करण्यासाठीं नम्र असें नांव आहे.) हें मंडळ म्हणजे रस्ते आणि गटारें सुधारणारें खातें आहे. या मंडळाचें आरोग्य खातें आहे, गरीबांना सहाय्य करणारें खातें आहे आणि मजूर मध्यस्थी समितीहि आहे—ही समिती मालक व मजूर यांच्यामधले तंटे व संप मिटविण्याचे प्रयत्न करते. तुमच्या शहरांतील स्थानिक स्वराज्य खात्याने या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें तर शहरांतील अनेक लोकांची गैरसोय होईल आणि त्यामुळें अशान्तता सुरू होईल.

हें आर्थिक आणि सामाजिक मंडळ म्हणजे उद्यानें, शाळा, विमानतळ व सुखसोयी पुरविणाऱ्या इतर गोष्टीं यांवर देखरेख ठेवणारे खातें आहे.

दोन जागतिक युद्धांमधल्या वीस वर्षांच्या काळात सर्व राष्ट्रांतील लोकांना हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. त्यांच्याकडे पुरेसे पैसे नव्हते. त्यामुळें अन्न-वस्त्र व घरें त्यांना मिळेनाशीं झाली. मुलांना शिकण्यासाठीं पुरेशा शाळा नव्हत्या, बेकारी होती, नोकऱ्या मिळत नव्हत्या आणि होते ते पैसे खर्च होत होते.

या हालअपेष्टाच प्रामुख्यानें दुसऱ्या जागतिक युद्धाच्या मुळाशीं होत्या.

या अनुभवानें आम्हांला एक धडा दिला आहे. जेव्हां कोणत्याहि राष्ट्रांतील लोक दुःखी-कष्टी होतात, जेव्हां दारिद्र्यामुळे त्यांना अन्न मिळेनासें होतें, निवारा मिळेनासा होतो, जेव्हां त्याना नोकऱ्या मिळेनाशा होतात व रोगराईमुळें त्यांच्यावर मृत्यूची धाड पडते तेंच राष्ट्र युद्धास प्रवृत्त होण्याचा संभव असतो.

अशा गर्तेत कोसळलेल्या गोरगरीब लोकांना कांहीं राजकारणी पुरुष ओरडून सांगतात, "माझ्या मागून या. मी तुम्हांला भरपूर अन्न-वस्त्र देईन! आम्हीं लढा करूं आणि विजयी होऊं. मग आम्हांला सर्व कांहीं मुबलक मिळेल आणि आमच्या ऐवजी आमच्या शत्रूंना उपाशी मरावें लागेल!" याचा परिणाम काय होईल याची कल्पना करा.

याची पुनरावृत्ति होईल काय? दुसऱ्या जागतिक युद्धानंतर २० वर्षांनीं म्हणजे १९६५ मध्यें तिसरें जागतिक युद्ध होऊन सारी संस्कृति नष्ट होईल काय?

न्यू यॉर्क येथील यूनोच्या मुख्य ठाण्यावर आर्थिक आणि सामाजिक मंडळाचें सभागृह आहे. या सभागृहांत मंडळाचे सर्व सभासद गंभीर चेहऱ्यानें बैठकीसाठीं येतात. वृत्तपत्रांना भडक मथळे मिळतील अशा तऱ्हेची जोरदार भाषणें करण्यासाठीं ते येत नाहींत. उलट या मंडळाच्या श्रम घेऊन केलेल्या कार्याला वृत्तपत्राच्या शेवटच्या पानावर एक परिच्छेदभर जरी जागा मिळाली तरी भाग्य समजावें लागेल. जे लोक भुकेकंगाल आणि निराधार आहेत, जे रोगराईनें पीडलेले आहेत, कोणत्याहि राष्ट्रांत ज्यांना प्रवेश दिला जात नाहीं, असे निर्वासित, ज्यांचें जीवन मागच्या युद्धामुळें उध्वस्त झालें असे लोक, या सर्वांसाठीं, त्यांचें जीवन सुखी करण्यासाठीं हें मंडळ मोठ्या मेहनतीनें कार्य करतें.

या मंडळांत अठरा प्रतिनिधी, सरचिटणीस, व साहाय्यक सरचिटणीस एवढी माणसें बसतात. एका अर्धवर्तुळाकार मेजापाशीं सजवलेल्या खुर्च्या असतात. त्यांवर हे प्रतिनिधी बसतात. त्यांच्यामागें सुमारें पन्नास सल्लागार बसलेले असतात. बारा दुभाषी आणि स्टेनोग्राफर्स त्यांच्या पुढ्यांत बसलेले असतात.

सभागृहामध्यें सुमारें सातशें खुर्च्या आहेत. त्या खुर्च्यांवर बहुतेक असंख्य अशा संस्थांचे प्रतिनिधी बसलेले असतात. निरनिराळ्या देशांत अशाच प्रकारचें कार्य करणाऱ्या अनेक संस्थांचे हे प्रतिनिधी असतात. डॉक्टर, शिक्षक, चर्च, व्यापारी, मजूर वगैरेंच्या संस्थांचे कितीतरी प्रतिनिधी येथें बसलेले पाहून तुम्हांला आश्चर्य वाटेल.

यापैकीं खालील चार संस्थांना खास सवलती देण्यांत आलेल्या आहेत:—'वर्ल्ड फेडरेशन ऑफ ट्रेड युनियन्स', 'अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर', 'इंटरनॅशनल को-ऑपरेटिव्ह अलायन्स' आणि 'इंटरनॅशनल चेंबर ऑफ कॉमर्स' या त्या चार संस्था होत. मंडळानें कांहीं कल्पनांवर अगर प्रश्नांवर विचार करावा असें या संस्थांना वाटलें तर त्या कल्पना अगर प्रश्न मंडळाकडे सादर करण्याच्या सवलती या संस्थांना देण्यांत आल्या आहेत, आणि या प्रश्नांवर मंडळाला विचार करावा लागतो.

राष्ट्राराष्ट्रांमध्यें जेव्हां तीव्र मतभेद असतात तेव्हा त्यांना एकत्र जमून आपले प्रश्न सोडविणें कठीण होतें. पण नेमकी तीच गोष्ट आर्थिक

आणि सामाजिक मंडळाला करावी लागते. हें मंडळ निरनिराळ्या राष्ट्रांना एकत्र घेऊन खालील गोष्टी पार पाडण्याची खटपट करतें :--

प्रत्येक देशांतील लोकांना चांगलें अन्न, वस्त्र व राहण्यासाठीं चांगलीं घरें मिळवून देण्याच्या कामीं त्यांना मदत करणें.

प्रत्येक कामगाराला रोजगारी मिळूं शकेल अशा तऱ्हेनें व्यवस्था करणें.

सर्व ठिकाणीं जहाजें पाठविण्याची व्यवस्था करणें. एका राष्ट्राचें चलन दुसऱ्या राष्ट्रांत वटवून देणें. यामुळें एका राष्ट्रांतील लोक दुसऱ्या राष्ट्रांतून कच्चा माल अगर इतर गरजेच्या वस्तु विकत घेऊं शकतात व आपला माल विकूं शकतात. प्रत्येक राष्ट्रानें त्या राष्ट्रांत आणलेल्या मालावर टॅरिफचे दर कमी करावेत अशी मंडळानें शिफारस करावी अशा सूचना अनेकांकडून या मंडळाकडे येत आहेत. (पण प्रत्यक्षांत मंडळांतील अठरा प्रतिनिधींना एक अशी योजना करणें शक्य आहे कीं जी चांगली असेल व सर्व राष्ट्रांना स्वीकारणीय वाटेल.)

निरनिराळ्या धर्माच्या व वर्णाच्या आपल्या शेजाऱ्यांबद्दल आदरभाव बाळगण्याचें सर्व राष्ट्रांतील लोकांस शिक्षण देणें.

लोकांचें आरोग्य सुधारणें. हा प्रश्न आंतरराष्ट्रीय आहे. विमानें आणि



जहाजें रोगराई जगभर पसरवितात. जेथें दारिद्र्य व अज्ञान आहे तेथें अत्यंत वाईट असे रोग सर्रास आढळतात. त्यानंतर हे रोग अधिक सुसंस्कृत अशा विभागांतहि पसरतात. म्हणून आर्थिक व सामाजिक मंडळ रोगराईचा प्रतिबंध करण्याचें कार्य करतें. प्रत्येक राष्ट्रांतील शेतकऱ्यांना चांगलें पीक काढण्यास व त्यामुळें चांगलें जीवन जगण्यास सहाय्य करणें.

प्रत्येक राष्ट्राला तेथील लोकांस चांगले शिक्षण देण्यास मदत करणें. एका देशांतून दुसऱ्या देशांत शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करणें, अशा रीतीने दुसऱ्या राष्ट्राची अधिक माहिती मिळविण्यास सर्वांना मदत करणें, आणि टेलिफोन व आकाशवाणी यांचें अधिक चांगलें दळणवळण स्थापन करणें.

या सर्व गोष्टी ५५ व्या कलमामध्यें नमूद करण्यांत आल्या आहेत. आणि जर काहीं याबाबत महत्वाचें बाकी उरलें असेल तर त्याचाहि समावेश करण्यासाठीं "आणखी तत्संबंधित प्रश्न" असे शब्द परिच्छेद 'बी' मध्यें घालण्यांत आले आहेत.

याबाबतीतील फक्त प्रश्न सोडविण्याचेच केवळ काम नसून आर्थिक व सामाजिक मंडळानें या बाबतींत 'प्रगति व विकास' यासाठी कार्य केलें पाहिजे असें या कलमांत म्हटलेलें आहे. ज्या परिस्थितीत आमचे आजोबा समाधान मानीत होते ती परिस्थिति आम्हांला असह्य होते व त्याबद्दल संतापहि येतो. दर वर्षी शक्य असणाऱ्या नवीन सुधारणा आम्ही पहातों, आणि त्यांची मागणी करतों. असे हें जीवन आहे व तें तसेंच चालू रहाणार आहे. अशा रीतीनें प्रगति व विकास यासाठीं सतत मागणी करीत रहाण्यामुळें जीवनांत रंग आला आहे.

ही कामगिरी एका राष्ट्राला न पेलणारी अशी आहे. पण एका राष्ट्राला न झेपणारें कार्य अनेक राष्ट्रें एकत्र यऊन करूं शकतील.

कांहीं विशिष्ट रोगांचा फैलाव करणारे डांस तुमच्या देशांतून नष्ट करण्याचा तुमचा तुम्ही जरी चंग बांधलांत, आणि तुमच्या शजारच्या राष्ट्रानें मात्र त्याबाबत कांही केलें नाही, तर तुमचे प्रयत्न व्यर्थ होतील. कारण शेजारच्या राष्ट्रांतील डांस मोकाटपणें तुमच्या देशात उडू शकतील.

एखाद्या वेळी एखादें छोटें राष्ट्र फार गरीब असतें. त्यामुळें तें स्वत: नदीला धरण बांधून विद्युत्‌शक्ति निर्माण करूं शकत नाही. पण अशा वेळीं दोन राष्ट्रें एकत्र येऊन तें धरण बांधू शकतील आणि विद्युत्‌शक्ति वांटून घेऊन वापरूं शकतील.

आमच्या देशांत कापड गिरण्यांतील कामगार युनियन्स संघटित करतात आणि आपलें वेतन वाढवून घेण्यासाठी संपाचा अवलंब करतात. मग पांच हजार मैल दूर असलेल्या देशांतील कांही कारखाने--जेथें वेतन कमी आहे--हजारों टन कापड आमच्या देशांत पाठवितात. तेथें कामगारांना रोज ५० सेंट दिले जातात. तें स्वस्त भावानें विकलें जातें, कारण तें तयार करण्याला विशेष खर्च येत नाहीं. ते स्वस्त मिळतें म्हणून येथील सर्व लोक परदेशी कापड विकत घेतात. त्यामुळें जेथें वेतन चागले आहे अशा आमच्या कापड गिरण्या बंद कराव्या लागतात आणि आमच्या कामगारांना नोकरीस मुकावें लागतें.

म्हणून हे प्रश्न केवळ एक देश सोडवूं शकणार नाहीं. आणि बरेच प्रश्न अशा स्वरूपाचे असतात.

आर्थिक आणि सामाजिक मंडळामध्यें अठरा प्रतिनिधी असतात. अठरा राष्ट्रें या मंडळाची सभासद असतात. आणि प्रत्येक सभासद राष्ट्राला एक प्रतिनिधी पाठवितां येतो.

या मंडळावर सभासद म्हणून दरवर्षी आमसभा सहा राष्ट्रांना निवडते.

एकदां एक राष्ट्र निवडून आलें की तें या मडळावर तीन वर्षे सभासद म्हणून राहूं शकते. ही मुदत संपली आणि त्याच राष्ट्राला आमसभेंत एकूण मताच्या दोन-तृतियांश मतें मिळाली तर ते राष्ट्र पुन्हा सभासद म्हणून या मंडळावर निवडून येऊ शकतें.

या मंडळावर सभासद म्हणून ज्या राष्ट्राला निवडण्यांत आलें असेल त्या राष्ट्रानें आपला प्रतिनिधी कसा निवडावयाचा हें ठरवावयाचें असतें.

या मंडळाच्या प्रतिवर्षी कमीत कमी तीन बैठका होतात. पण जरूर पडल्यास कधी कधीं खास बैठकीहि घेतां येतात.

आर्थिक आणि सामाजिक मंडळ आपल्या कामकाजाचे नियम स्वतःच करतें. या मंडळानें आपल्या पहिल्याच बैठकीत भारताचे शांत प्रवत्तीचे व विद्वान असे सर रामस्वामी मुदलियार यांना अध्यक्ष म्हणून निवडलें. याच वैठकीत उपाध्यक्ष म्हणून युगोस्लाव्हिया आणि कोलंबिया यांच्या प्रतिनिधींना निवडण्यांत आलें. ज्या प्रतिनिधीना निवडण्यांत आलें असेल त्याच प्रतिनिधींनी स्वतः त्या जागेवर राहिलें पाहिजे. सुरक्षा-मंडळाच्या प्रतिनिधीप्रमाणें त्यांच्या राष्ट्रांना कोणतेहि प्रतिनिधी निवडतां येत नाहींत.

क्वचित प्रसंगी एखाद्या प्रश्नावर या मंडळांत जेव्हां मतदान होतें, तेव्हां साधें बहुमत निर्णय घेण्यास पुरेसें असतें. या मंडळांत छोटया राष्ट्रांपेक्षां बड्या राष्ट्रांना अधिक हक्क नसतात. इतकेंच नव्हें तर एखादें बडें

राष्ट्र मंडळाच्या बाहेरहि राहूं शकतें. एखादी सुधारणा कोणाला पाहिजे याला महत्व नसतें. तर ती सुधारणा खुद्द किती महत्वाची आहे हें पाहिलें जातें.

आर्थिक आणि सामाजिक मंडळाला आपलें कार्य करण्यासाठीं बरीच माहिती मिळवावी लागते, आणि ती माहिती मिळविण्याचे मंडळाचे बरेच मार्ग आहेत. शिक्षण घेतलेले सामाजिक कार्यकर्ते, वकील, आणि इतर तज्ज्ञ यांच्या समितीला प्रश्न विचारून माहिती जमविण्यासाठीं हें मंडळ कोणत्याहि देशांत पाठऊं शकतें. एखाद्या राष्ट्राला अशी चौकशी करूं द्यावयाची नसेल तर त्या समितीला तें राष्ट्र प्रवेश नाकारूं शकतें. आणि मग त्या राष्ट्रासंबंधींची माहिती मंडळाला अन्य मार्गानें मिळवावी लागते.

या मंडळाला आंतरराष्ट्रीय बैठका बोलावतां येतात. उदाहरणार्थ, या मंडळानें एकदां न्यू यॉर्क येथें अशी बेठक भरविली होती. या बैठकीस प्रतिनिधी पाठविण्यासाठी स्पेन सोडून ६७ राष्ट्रांना प्रत्येक राष्ट्राला आमंत्रण पाठविण्यांत आलें होतें. जून १९४६ मध्यें ही प्रचंड बैठक झाली व त्या बैठकींत जागतिक आरोग्य संघटनेची (वर्ल्ड हेल्थ ऑर्गनायझेशन) घटना तयार करण्यांत आली. त्यानंतर थोड्याच दिवसांत ही संघटना यूनोची एक खास संस्था बनली.

या मंडळाचें कार्य इतकें प्रचंड असतें कीं तें या मंडळाच्या अठरा सभासदांकडून होणें कठीण असतें. म्हणून यूनोच्या सनदेनें या मंडळाला मदत देण्यासाठीं खास तज्ज्ञांच्या संस्था व कमिशनें देण्याची व्यवस्था केली आहे. या संस्था व हीं कमिशनें मंडळाला सल्ला देतात आणि कमिशनें ज्या योजना करतात त्यांवर मतें देण्याचेंच मंडळाचें प्रामुख्यानें कार्य असतें. सध्यां या मंडळाची नऊ कमिशनें आहेत. आणि जरूर पडल्यास आणखीहि कमिशनें हें मंडळ तयार करूं शकतें.

मंडळाच्या सर्वात महत्वाच्या कार्यापैकी मानवी हक्कांचें संरक्षण करणें हें एक कार्य आहे.

दुसऱ्या लोकांच्या हक्कांचें आम्हांला महत्व वाटतें. जेव्हां एखाद्या दूरच्या राष्ट्रांतील लोकांवर हल्ला होतो, त्यांचें स्वातंत्र्य नष्ट केलें जातें, तेव्हां येथील कांहीं लोक विचारतात, "त्याची आम्ही कां काळजी करावी ?" पण आम्हीं कां काळजी करावी हें त्यांना ताबडतोब कळून चुकतें.

दुसऱ्याला वाईट तऱ्हेनें वागविणें आणि हुकूमशाही गाजविणें या गोष्टी रोगासारख्या असतात. त्यांचा लगेच फैलाव होतो. जेव्हां त्यांचा इतर देशांत फैलाव चालू असतो तेव्हां त्यांचें लोण आमच्या देशांतहि येणें शक्य असतें.

यूनोच्या सनदेमध्यें मानवी हक्कांसंबंधी निश्चित असा कांही उल्लेख नसला तरी त्यांत अनेक सर्वसाधारण गोष्टींचा उहापोह केला आहे. या सनदेंत असें म्हटलें आहे कीं, "मानवी हक्क आणि मूलभूत स्वातंत्र्य" याबद्दल आदरभाव बाळगण्यास सर्व राष्ट्रांतील लोकांस उत्तेजन दिलें जाईल असें यूनो व सभासद राष्ट्रें आश्वासन देत आहेत.

पण "मानवी हक्क" व "मूलभूत स्वातंत्र्य" म्हणजे काय याचें या सनदेंत स्पष्टीकरण नाही. परंतु या सनदेंत असें स्पष्ट म्हटलें आहे की, धर्म, जाति, वर्ण, भाषा लक्षांत न घेतां सर्व लोकांना सारखेच हक्क मिळाले पाहिजेत.

पुरुषांना जे हक्क मिळतील तेच हक्क स्त्रियांनाहि मिळाले पाहिजेत असें यांत म्हटलें आहे. आमसभा किंवा मंडळें यांचे प्रतिनिधी होण्यास अगर न्यायाधीश किंवा चिटणीस होण्यास किंवा या संघटनेंत कोणतेंहि काम करण्यास स्त्रियांना प्रतिबंध केला जाणार नाहीं असेंहि या सनदेंत म्हटलें आहे.

धर्मभेद न मानतां सर्व लोकांच्या मूलभूत स्वातंत्र्यासाठीं यूनो व सभासद राष्ट्रें कार्य करतील असें आश्वासन या सनदेंत देण्यांत आलें आहे. याचा अर्थ आम्ही असा मानतों कीं प्रत्येकाला आपल्या धर्माप्रमाणें पूजा करण्याचा हक्क आहे. याचाच अर्थ असा आहे कीं एखाद्या विशिष्ट धर्माच्या लोकांवर हल्ला केला जातां कामा नये, त्यांचा मतदानाचा हक्क हिरावून घेतां नये, किंवा त्यांना सक्तीनें काम करून घेण्याच्या छावण्यांत डांबून ठेवतां नये.

सनदेच्या उपोद्घातामध्यें सुरुवातीलाच "आम्ही सर्व लोक" असा उल्लेख आहे. याचा अर्थच असा कीं हे लोक सरकारें बनवतात व त्यांनीं काय करावें तें सांगतात. हा उल्लेख हुकूमशाही कल्पनेविरुद्ध आहे. कारण हुकूमशाहीमध्यें सर्व लोक सरकारची सेवा करण्यासाठीं जगतात, आणि कोणी काय करावें हें सरकार सांगून देतें. दुसरा कोणताहि जाहीरनामा अशा शब्दांनीं सुरू झालेला नाहीं. अनेक सरकारी अधिकाऱ्यांनीं हे शब्द फार महत्वाचे आहेत असा उल्लेख केला आहे.

या सनदेंत म्हटलें आहे कीं, मोठ्या राष्ट्रांना जे हक्क आहेत तेच हक्क छोट्या राष्ट्रांनाहि असले पाहिजेत. लहान राष्ट्र स्वतःच्या सामर्थ्यावर स्वतःचें संरक्षण करूं शकत नाहीं म्हणून कोणत्याहि लहान राष्ट्रावर हल्ला होतां कामा नये, त्याचा कोणताहि मुलूख गिळंकृत करतां नये, किंवा त्या राष्ट्रावर कसलीहि सक्ति होता कामा नये.

शेवटीं, कलम १, परिच्छेद २ मध्यें असें म्हटलें आहे कीं, कोणत्याहि

लोकांच्या गटाला, त्यांना कोणत्या प्रकारचें सरकार पाहिजे हें ठरविण्यासाठीं मत देण्याची मोकळीक पाहिजे. त्याचप्रमाणें दुसऱ्या राष्ट्राचे नागरिक होण्यानें जर दोन्हीं राष्ट्रांचे संबंध अधिक मैत्रीचे होणार असतील तर कोणत्या राष्ट्राचे नागरिक रहावें हें ठरविण्याचीहि त्यांना मुभा असावी.

१९४१ च्या सुरुवातीस अध्यक्ष फ्रँकलीन डी. रूझवेल्ट यांनीं एक वक्तव्य केलें, तें फारच प्रसिध्दी पावलें. कारण त्या भाषणांत ते म्हणाले होते, "चार अत्यावश्यक मानवी स्वातंत्र्यांवर अधिष्ठित झालेल्या जगाकडे आमची दृष्टि आहे". ते पुढें म्हणाले की "हीं स्वातंत्र्यें म्हणजे–भाषण स्वातंत्र्य, धर्म स्वातंत्र्य, गरजांपासून स्वातंत्र्य व भयापासून मुक्तता."

यानंतर सहा महिन्यांनीं अटलांटिक सनद लिहिण्यांत आली. त्यामध्यें फक्त दोन स्वातंत्र्यांचा उल्लेख करण्यांत आला. तो म्हणजे गरजा व भय यांपासून स्वातंत्र्य. त्यानंतर दुसऱ्या वर्षाच्या सुरुवातीस जेव्हां यूनोचा जाहीरनामा तयार झाला तेव्हां 'धर्मस्वातंत्र्याची' भर घालण्यांत आली.

चारहि स्वातंत्र्यांवर आपल्याला जें वाटतें तें बोलण्यास एखाद्या व्यक्तीला सोपें असतें. पण अनेक राष्ट्रांच्या सरकारांना तें तितकें सोपें नसतें. याचा परिणाम असा झाला आहे कीं, यूनोच्या अधिकृत कागदपत्रांत 'भाषण स्वातंत्र्य' ग्रथित करण्यांत आलेलें नाहीं. नेहमी कोणी ना कोणी 'भाषण स्वातंत्र्य' ग्रथित करण्यास विरोध केला आहे.

अमेरिकेची राज्यघटना पुढें पुढें जशी अधिक मजबूत केली गेली तशी यूनोची सनद पुढें अधिक मजबूत केली जाईल अशी अमेरिकन व इतर मुत्सद्यांना आशा वाटते.

अमेरिकन राज्यघटना १७८९ मध्यें जेव्हां अंमलांत आली, तेव्हां तिच्यामध्यें मानवी हक्कांसंबंधीं निश्चित असा कांही उल्लेख नव्हता. पण त्यानंतर दोन वर्षांनीं तिच्यामध्यें हक्काचा मसुदा घालण्यांत आला. त्यामध्यें दहा दुरुस्त्या आहेत. त्यामुळें अमेरिकनांना धार्मिक स्वातंत्र्य व भाषण स्वातंत्र्य मिळालें. ज्यूरीपुढें खटला चालविण्याचा हक्क मिळाला आणि वॉरंटशिवाय घरें तपासण्यास पोलिसांना मनाई झाली.

त्यानंतर अनेक वर्षांनीं आणखी कांहीं दुरुस्त्याहि जोडण्यांत आल्या. काळ्या लोकांना नागरिकत्वाचे (१८६८) व मतदानाचे (१८७०) हक्क मिळाले. स्त्रियांना मतदानाचा हक्क (१९२०) मिळाला. पुढील कांहीं वर्षांत आणखी कांहीं हक्कांची यांत भर घालण्यांत येईलहि.

अशा तऱ्हेचे हक्क यूनोच्या सनदेंत समाविष्ट करण्यासाठीं प्रयत्न करणें हें एक 'मानवी हक्क कमिशन'चें कार्य आहे. आर्थिक आणि सामाजिक

मंडळाचें हें एक महत्वाचें कमिशन आहे. या कमिशनला 'हक्कांचा आंतरराष्ट्रीय मसुदा' तयार करावयाचा आहे.

कोणते मानवी हक्क आणि स्वातंत्र्यें निरनिराळ्या राष्ट्रांची सरकारें मान्य करतील हें पहाण्याचें या कमिशनचें पहिलें कार्य आहे. ज्यूरीकडून खटला चालविण्याचा हक्क, एकत्र जमण्याचा व इच्छेप्रमाणें बोलण्याचा हक्क, वॉरंटशिवाय घरांची तपासणी करण्यापासून संरक्षण व दैनंदिन जीवनांत सुरक्षितपणाची जाणीव होईल असें संरक्षण, यांची हमी देण्यास राष्ट्रें कितपत तयार आहेत हें या कमिशनला पहावयाचें आहे.

हा 'हक्कांचा आंतरराष्ट्रीय मसुदा' यूनोच्या सनदेला दुरुस्तीच्या स्वरूपांत जोडतां येईल. ती दुरुस्ती यूनोच्या आमसभेनें मंजूर केली तर ती सर्व राष्ट्रांकडे पाठवितां येईल. आणि ती सर्व राष्ट्रांनी मान्य करावी अशी शिफारस करतां येईल.

किंवा हक्कांचा आंतरराष्ट्रीय मसुदा तहनाम्याच्या स्वरूपांत मांडतां येईल व त्यावर सर्व राष्ट्रांना सह्या करण्यास सांगतां येईल.

त्याचप्रमाणें शिफारशीच्या स्वरूपांत हा मसुदा मांडतां येईल. तो आमसभा मंजूर करील, आणि सर्व राष्ट्रांनीं आपल्या घटनेंत हे हक्क समाविष्ट करावेत असें त्यांना सांगण्यांत येईल. उदाहरणार्थ, लोकांना त्यांच्या गरजांपासून स्वातंत्र्य मिळेल ही हमी भारतीय घटनेंत नाहीं. तेव्हां तशी हमी देणारी दुरुस्ती भारतीय घटनेंत करण्यास भारत सरकारचें मत वळविण्यांत येईल.

हे मानवी हक्क कागदोपत्रीं नमूद केल्यानंतर हे हक्क आणि हीं स्वातंत्र्यें जगभर कशी काय अंमलांत येतात हें पहाण्याचेंहि काम मानवी हक्क कमिशनचें आहे. याबाबत निरनिराळीं राष्ट्रें काय करीत आहेत याचा अहवाल या कमिशनला मागवितां येईल. कांहीं लोकांना हे हक्क व हीं स्वातंत्र्यें नाकारण्यांत येत आहेत अशी खात्रीलायक माहिती जर कोणाकडे असेल तर ती या कमिशनला मिळवितां येईल. त्याचप्रमाणें या बाबतींत काय करणें शक्य आहे या विषयींच्या विचारपूर्ण कल्पना कोणाकडे असतील तर त्याहि या कमिशनला स्वीकारतां येतात.

एखाद्या विशिष्ट वर्णाच्या किंवा धर्माच्या लोकांना लुटणें, मारहाण करणें, त्यांना चौकशीशिवाय तुरुंगांत डांबणें वगैरे गोष्टी नाझींनीं जर्मनीत केल्या. त्यामुळें युद्ध उद्‌भवलें. अशींच कृत्यें करून मानवी हक्कास एखादें सरकार हरताळ फाशीत आहे असें दिसून आल्यास हें कमिशन ताबडतोब सुरक्षा-मंडळास कळवूं शकतें. ही खास सवलत या कमिशनला देण्यांत

आली आहे. आणि या कमिशनच्या माहितीवर सुरक्षा-मंडळ खात्रीनें बैठक बोलावील आणि त्याची दखल घेईल.

या कमिशनचें दुसरें कार्य म्हणजे भाषण स्वातंत्र्याचा सखोल विचार करणें. सॅन फ्रॅन्सिस्को परिषदेंत, सनदेंतील "मूलभूत स्वातंत्र्य" या शब्दांमध्यें, भाषण, वृत्तपत्रें, रेडिओ, चित्रपट यांचें स्वातंत्र्य व वृत्तपत्रांच्या वार्ताहरांना कोणत्याहि देशांत जाऊन वृत्त मिळविण्याचें व वृत्ताची तपासणी अगर कापणी न होण्याचें स्वातंत्र्य अंतर्भूत आहे असा आग्रह अमेरिकेच्या प्रतिनिधींनीं धरला होता. हीं स्वातंत्र्यें मान्य करण्यासाठीं मानवी हक्क कमिशन किंवा आर्थिक आणि सामाजिक मंडळ यांना सर्व राष्ट्रांचीं मनें कितपत वळवितां येतील याबाबत संदेह वाटतो. तथापि त्यासाठीं कार्य करीत राहिलें पाहिजे इतकें त्यांचें महत्व आहे.

या कार्यांत मदत करण्यासाठीं मानवी हक्क कमिशनची एक शाखा आहे. तिला 'माहिती स्वातंत्र्य उपकमिशन' म्हणतात. या उपकमिशनमध्यें सुमारें १२ सभासद असतात. त्यामध्यें बरेच वृत्तपत्र संपादक व प्रकाशक असतात. वृत्तपत्रें, रेडिओ, पुस्तकें, नियतकालिकें, व चित्रपट यांना सत्य सांगण्यामध्यें जे अडथळे येतात ते दूर कसे करावे याबाबत ते




योजना करतात. त्याचप्रमाणें कोणतीं सरकारें हे अडथळे निर्माण करतात यावरहि हें उपकमिशन लक्ष ठेवतें.

आर्थिक आणि सामाजिक मंडळाचें स्त्रियांच्या दर्जाविषयींचें एक कमिशन आहे. स्त्रिया जेव्हां पुरुषांसारखेंच काम करतात तेव्हां त्यांना पुरुषांइतकेंच वेतन मिळवून देण्याचा हें कमिशन प्रयत्न करतें; स्त्रियांना वैद्यकीय किंवा लॉ कॉलेजमध्यें प्रवेश मिळवून देण्यास मदत करतें ; त्याचप्रमाणें, अमक गोष्टी करण्याचा आपला हक्क आहे असें

स्त्रियांना वाटतें. कांही देशांत स्त्रियांना कायद्यानें अगर रूढीनें त्या गोष्टी करूं दिल्या जात नाहीत. हें कमिशन हीं बंधनें नष्ट करण्याचे प्रयत्न करतें. सर्व सभासद राष्ट्रांनीं स्त्रियांना मतदानाचा हक्क द्यावा अशी शिफारस या कमिशननें आर्थिक आणि सामाजिक मंडळास केली आहे.

सॅन फ्रॅन्सिस्कोच्या परिषदेंत स्त्रियांच्या हक्कांसंबंधी ज्या योजना करण्यांत आल्या, त्यांतील बहुतेक ब्राझीलच्या प्रतिनिधींनी केलेल्या मागणीमुळें करण्यांत आल्या. यूनोचें कांहीं उत्कृष्ट कार्य तुम्हां आम्हांला कल्पनाहि करवणार नाहीं अशा पद्धतीनें छोटया राष्ट्रांच्या प्रतिनिधीनीं केलें आहे.

सामाजिक कमिशन गुन्हा प्रतिबंधक व कायदेभंग करणाऱ्यांना तुरुंगांत देण्यांत येणाऱ्या वागणुकीसंबंधीं कार्य करतें. लोकांसाठी चांगलीं घरें, म्हातारपणीं पेन्शन, कामगारांसाठीं नुकसानभरपाईचे कायदे वगैरे बाबतहि हें कमिशन कामकाज करतें.

या कमिशनची आणखी एक शाखा आहे. बालसंगोपन उपकमिशन असें त्याचें नांव आहे. बालगुन्हेगार, त्यांना सुधारणाऱ्या शाळा, मोफत शिक्षण, गरीब मुलांसाठीं योग्य अशी वैद्यकीय मदत वगैरें गोष्टींकडे हें कमिशन लक्ष पुरवतें.

युद्धामुळें युरोप व आशिया येथील जीवन इतकें वाईट तऱ्हेनें उखडलें गेलें आहे कीं, त्यानंतर कित्येक वर्षांनीं सुद्धां अनेक राष्ट्रांना आपल्या हजारों निराधार, आजारी व उपाशी मुलांची काळजी घेणें शक्य होत नाही. आर्थिक आणि सामाजिक मंडळाच्या शिफारशीवरून आमसभेनें 'आंतरराष्ट्रीय बाल सहाय्यक निधि' उभारला आहे. या दुर्दैवी बालकांसाठीं या निधींतून अन्न-वस्त्र व वैद्यकीय सामुग्री विकत घेतली जाते. मुलांसाठीं रुग्णालयें चालविलीं व बांधलीं जातात. अनाथबालकगृहें उघडली जातात. या निधीस कोणीहि मदत करूं शकतो. या निधीस शाळा, चर्च किंवा खाजगी संस्थांकडून देणग्या मिळतात. यासंबंधींचीहि चौकशी करावयाची असल्यास किंवा देणगी द्यावयाची असल्यास, सरचिटणीस, यूनो, न्यू यॉर्क (Secretary-General of the United Nations in New York) येथें करतां येईल.

वाहतूक आणि दळणवळण कमिशन जहाजें, विमानें, बसीस्, रेल्वे, आगबोटी वगैरेंच्या वाहतुकीसाठीं आणि तारा, रेडिओ वगैरेंच्या दळणवळणासाठीं अधिक चांगले कायदे अस्तित्वांत आणण्याचे प्रयत्न करतें.

पासपोर्टचे निर्बंध सुधारून लोकांना एका देशांतून दुसऱ्या देशांत जाणें सुलभ करण्यासाठीं निरनिराळ्या देशांच्या प्रतिनिधींची परिषद बोलवावी

अशी सूचना या कमिशननें आर्थिक आणि सामाजिक मंडळाला केली आहे. 'युनिव्हर्सल पोस्टल युनियन' (याची तुम्हांला अवश्य माहिती हवी) आणि 'इंटरनॅशनल टेलीकम्युनिकेशन्स युनियन' (याचें तुम्हीं नांवहि कदाचित ऐकलें नसेल) यांच्याशीं या कमिशनचा संपर्क असतो. इं. टे. युनियनला या कमिशनने अशी सूचना केली आहे की एक परिषद भरवून सर्व रेडिओंच्या लहरी अशा आंखून द्याव्यात की त्यामुळें एकमेकांचे कार्यक्रम मिसळून जाणार नाहींत.

आर्थिक आणि रोजगार कमिशन प्रत्येक राष्ट्रांतील काम करूं इच्छिणाऱ्या इसमास काम कसें मिळवून द्यावें याचा विचार करतें. त्याचप्रमाणें व्यापार कोलमडून पाडणारी मंदी न येऊं देण्याचाहि हें कमिशन प्रयत्न करतें. लोकांच्या गरजा शक्यतों भागल्या जाव्यात व सर्वत्र रहाणीचा दर्जा वाढावा यासाठी हे कमिशन कार्य करतें.

फिस्कल कमिशन, कर कसे वाढवावेत व ते लोकांच्याच हितासाठी कसे वापरावेत हें निरनिराळ्या राष्ट्रांना दाखवून देतें. अनेक सरकारांनी चुकीच्या मार्गानें कर वसूल केले आहेत. त्यामुळें तेथील नागरिक गरीब झाले असून तेथील कारखानेहि मंदावले आहेत.

आंकडेविषयक कमिशन अधिक रुक्ष वाटतें. तथापि त्या कमिशनचे सभासद थोडे विनोदबुद्धीचे असावेत. कारण त्यांनीं या कमिशनला 'स्टॅटकॉम ऑफ इकोसॉक' (Statcom of Ecoasoc – Statistical Commission of the Economic and Social Council) असें नांव दिले आहे. बेरजा, गणितें हें या कमिशनचें काम. निरनिराळ्या राष्ट्रांनीं गोळा केलेली आंकडेवारी हें कमिशन एकत्रित करतें. विशेषत: व्यापारविषयक आंकडेवारी–गेल्या वर्षात सबंध जगामध्यें किती जोडे विकले गेले किंवा एकूण कोबडयांची उत्पत्ति किती आहे यासाटीं आंकडेवारी – हें कमिशन गोळा करतें.

मादक औषधी कमिशनला कांहीं खास अधिकार दिलेले असतात. निरनिराळ्या सरकारांनी एका करारावर सह्या करून हे अधिकार दिलेले असतात. अफू, पॉपीबिया व कोकेन यांवर नियंत्रण ठेवण्याचा हें कमिशन प्रयत्न करतें. ही मादक औषधी विकणाऱ्या फेरीवाल्यांना कसें पकडावें याबाबत हें कमिशन योजना तयार करतें.

प्रत्येक कमिशनमध्यें १२ ते १८ तज्ज्ञ असतात. आर्थिक आणि सामाजिक मंडळानें ज्या राष्ट्रांना निवडलेलें असतें, तीं राष्ट्रें या तज्ज्ञांना पाठवितात.

या कमिशनशिवाय आर्थिक आणि सामाजिक मंडळाला त्याच्या कार्यात मदत करण्यासाठीं तज्ज्ञ यंत्रणा दिलेल्या असतात. यूनोच्या सनदेनें 'तज्ज्ञ यंत्रणा' या शद्वांना विशिष्ट अर्थ प्राप्त करून दिला आहे.

अनेक राष्ट्रांनीं सह्या केलेल्या करारानुसार बऱ्याच मोठ्या व महत्वाच्या आंतरराष्ट्रीय संघटना अस्तित्वांत आल्या आहेत. उदाहरणार्थ 'आंतरराष्ट्रीय मजूर कचेरी' (इंटरनॅशनल लेबर ऑफिस) ही संघटना होय. ही संघटना बरीच वर्षे कार्य करीत आहे. अमेरिकेसहित अनेक राष्ट्रांनी सह्यानिशी केलेल्या करारानुसार ही संघटना स्थापन झाली. संघटनेचे हेतु खास स्वरूपाचे असतात. आरोग्य, शेतीच्या सुधारलेल्या पद्धती, हवाई वाहतुकीचे अधिक चांगले नियम आणि आर्थिक व सामाजिक मंडळापुढील इतर प्रश्न यांसंबंधीं या संघटना कार्य करतात. अशाच आणखी कांही संघटनाहि स्थापन करण्याच्या योजना सध्यां हाती आहेत.

अशा संघटनांपैकीं कोणत्याहि संघटनेनें जर आर्थिक आणि सामाजिक मंडळाशीं औपचारिक करार केला तर त्या संघटनेला यूनोचें एक अंग म्हणून कार्य करतां येतें. अशा कराराला आमसभेनें मंजुरी द्यावी लागते. कधी कधी यूनोमध्यें सामील होणाऱ्या संघटनांना त्यांच्या कार्याला मदत म्हणून आर्थिक सहाय्यहि आमसभेकडून दिलें जातें. अशा संघटना यूनोमध्यें सामील होतात. त्यांना 'तज्ज्ञ यत्रणा' म्हणून संबोधिलें जातें.

अशा बऱ्याच यंत्रणा आहेत. प्रत्येक यंत्रणेला स्वतःची सनद अगर घटना असते. त्यांची आमसभा असते, सरचालक असतो आणि सचिवालयहि असतें. प्रत्येक यंत्रणा आपल्या विशिष्ट प्रकारच्या कार्यासाठीं लाखों डॉलर जमा करते आणि खर्च करते.

या यंत्रणा मोठ्या, महत्वाच्या व स्वतंत्र असतात. त्या यंत्रणेची जीं राष्ट्रें सभासद असतात त्या राष्ट्रांचें त्या यंत्रणेवर नियंत्रण असतें. यूनो या यंत्रणांना मार्गदर्शन करतें आणि त्यांना दुसऱ्या एखाद्या संस्थेनें आधींच केलेल्या कार्यावर व्यर्थ वेळ दवडूं देत नाही. पण त्यांचें नियंत्रण मात्र यूनो मार्फत होत नाही. त्या यंत्रणांना मदत करून त्यांच्या कार्याचा यूनो फायदा करून घेते. याच पुस्तकाच्या चौथ्या भागांत महत्वाच्या यंत्रणांची माहिती दिलेली आहे.

कमिशनें आणि यंत्रणा यांच्या कार्याचा मेळ घालण्याचें कार्य आर्थिक आणि सामाजिक मंडळाला करावे लागतें. ही कमिशनें व या यंत्रणा आपापले अहवाल या मंडळाकडे पाठवितात. त्यांच्या प्रतिनिधींचे विचार मंडळ ऐकून घेतें आणि त्यांनीं केलेल्या शिफारशींवर मत देतें.

मंडळानें जी बरीचशी माहिती मिळविलेली असते ती अहवालाच्या स्वरूपांत छापून तयार असते. ही माहिती सुरक्षा-मंडळ, आमसभा किंवा यूनोचीं सभासद राष्ट्रें यांना आणि तज्ज्ञ यंत्रणा यांच्याकडेहि दिली जाते.

व्यापार सुधारणें, कामाच्या पद्धती सुधारणें, लोकांना अधिक सुसंस्कृत करणें, शाळा अधिक मनोरंजक करणें, आरोग्य वाढविणें, रोगराईंचा प्रतिबंध करणें आणि जीवन अधिक सुखी व समाधानी बनविणाऱ्या इतर अनेक गोष्टी करण्यासाठी हें मंडळ शिफारशी करूं शकतें.

या मंडळांत शिफारशी बहुमतानें मंजूर झाल्या कीं, त्या आमसभेकडे किंवा सुरक्षा-मंडळाकडे पाठविल्या जातात. मग त्या अमलांत आणण्याचा प्रयत्न त्यांनीं करावयाचा असतो. आर्थिक आणि सामाजिक मंडळाला सैन्य आणतां येत नाहीं. त्या मंडळाकडे पोलीस नसतात. इतकेंच नव्हें तर मादक पदार्थ विकणाऱ्या फेरीवाल्यालाहि तें तुरुंगांत घालूं शकत नाहीं.

तथापि या मंडळाच्या शिफारशीची बहुधा दखल घेतली जाते. एखादें राष्ट्र जेव्हां सनदेला मान्यता देतें, तेव्हां सनदेंतील सर्व गोष्टी पार पाडण्याचें तें आश्वासन देत असतें. या सनदेच्या ५६ व्या कलमांत म्हटलें आहे कीं, आर्थिक व सामाजिक मंडळ आणि आमसभा यांच्याशीं सहकार्य देण्याचें प्रत्येक राष्ट्र आश्वासन देत आहे.

जेव्हां या मंडळाकडून किंवा आमसभेकडून सभासद राष्ट्राच्या सरकारकडे एखादी शिफारस जाते, तेव्हां त्या शिफारशीनुसार त्या सरकारनें त्वरित कृति केली पाहिजे. हातमोजांवरील जकात कमी करण्यासंबंधीं किंवा स्थलान्तराच्या कायद्यांत बदल करण्यासंबंधीं शिफारशी केल्या जातात तेव्हां त्या शिफारशी पार पाडण्याची त्या सरकारावर नैतिक जबाबदारी येऊन पडते. अर्थातच तसें करण्यास नकार देण्याइतकें पुरेसें कारण असेल तर गोष्ट वेगळी.

आर्थिक आणि सामाजिक मंडळाच्या शिफारशींचा रोख केवळ एका राष्ट्रावर नसतो. त्या मंडळाला असें म्हणतां यावयाचें नाहीं कीं "स्वीडननें स्पेनला पोलाद विकतां कामा नये." पण त्या मंडळाला असें म्हणतां येईल कीं "ज्या राष्ट्रांना शांततेच्या कार्यासाठीं पोलाद पाहिजे असेल त्याच राष्ट्रांना सर्व पोलाद विकत द्यावें."

पण या शिफारशीकडे कांहीं राष्ट्रांनीं लक्षच दिलें नाहीं तर काय होतें ? आपल्या शिफारशींबाबत काय होतें व काय केलें नाहीं याबाबतचा अहवाल मंडळाला या राष्ट्रांकडे मागतां येतो. हे अहवाल जर मंडळाला

असमाधानकारक वाटले तर त्या नंतरच्या बैठकींत मंडळाला आमसभेकडे तक्रार करतां येते.

आमसभेकडे आपल्या विरुद्ध तक्रार व्हावी असें कोणत्याहि राष्ट्राला वाटत नाही. म्हणून बहुधा ती राष्ट्रें हातमोजांवरील जकात कमी करतील किंवा स्थलान्तराच्या कायद्यांत बदल करतील. आणि अशा रीतीनें आपल्यावर आमसभेच्या जागतिक बैठकीत चर्चा होऊं देणार नाहीत.

कमिशनें व तज्ज्ञ यंत्रणा यांच्या सहाय्यानें आर्थिक आणि सामाजिक मंडळ अविश्रान्तपणें कार्य करीत असतें. त्यांनीं आपलें कार्य व्यवस्थितपणें चालू ठेवलें तर आम्हांला आमचें जीवन सुरक्षित, सुखी व सुखसोयींनीं सज्ज असें करतां येईल.

# प्रकरण ६

# विश्वस्त मंडळ

## स्वसत्ताक नसलेल्या जनतेचें संरक्षण करणें

या जगांतील एकंदर लोकसंख्येपैकीं एक-चतुर्थांश लोक परक्या लोकांच्या वसाहती बनलेल्या भूभागांत राहात आहेत. त्यांजवर इतर राष्ट्रांची राजसत्ता चालते. त्यांना स्वराज्य मिळालेलें नाहीं.

असल्या कांहीं वसाहती दोस्त राष्ट्रांनीं पहिल्या युद्धाच्या वेळीं जर्मनी व तुर्कस्तान यांजकडून काढून घेतल्या. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं जपानकडूनहि अशाच कांहीं वसाहती दोस्तांनीं काढून घेतल्या. अशा रीतीनें काढून घेतलेल्या या वसाहतींचें काय करावयाचें ?

हा प्रश्न सोडविण्यासाठीच विश्वस्त मंडळाची योजना निघाली. जर्मनी व तुर्कस्तान यांजकडून जिंकून घेतलेल्या वसाहतींचें काय करावें त्याचा पहिल्या महायुद्धानंतर दोस्त राष्ट्रांना जेव्हां प्रश्न पडला, तेव्हां, 'मॅंडेट सिस्टिम' या नांवाची एक योजना त्यांनीं शोधून काढली. जर्मनी व तुर्कस्तान यांजकडून काढून घेतलेल्या वसाहतींपैकीं एक-एक वसाहत एकेका दोस्त राष्ट्राला – इंग्लंड, फ्रान्स, जपान, दक्षिण आफ्रिका, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया किंवा बेल्जियम—–कर्जाऊ म्हणून देण्यांत आली.

उदाहरणार्थ, पॅलेस्टाइन इंग्लंडच्या अंमलाखालीं ('मॅंडेट' खालीं) देण्यांत आला, आणि सीरिया फ्रान्सच्या अंमलाखालीं देण्यांत आला. आफ्रिकेंतल्या बऱ्याचशा जर्मन वसाहती इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें विभागून देण्यांत आल्या. पॅसिफिक महासागरांतील न्यू गिनी बेट ऑस्ट्रेलियाकडे देण्यांत आलें, आणि त्याच भागांतलीं बरींचशीं बेटें जपानला देण्यांत आलीं. याच्या मागें भूमिका अशी होती कीं हे सर्व भाग राष्ट्रसंघाच्या मालकीचे असून त्याच्याच हुकूमानें हीं सामर्थ्यवान राष्ट्रें त्यांजवर आपला अंमल चालवीत आहेत.

पण प्रत्यक्ष व्यवहारांत या योजनेचा नीट अंमल झाला नाहीं. राष्ट्रसंघानें जपानकडे दिलेल्या कोण्या एका बेटांतील कारभारांत राष्ट्रसंघाच्या नियमांचें कसें काय पालन होतें आहे तें पहाण्यासाठीं राष्ट्रसंघाची एक कमिटी जेव्हां तिकडे गेली तेव्हां जपाननें त्या कमिटीला त्या बेटाच्या भूमीवर पाय

ठेंवू देण्याचेंच नाकारलें. तोफखाने व दारूगोळ्याचे सांठे लपवून ठेवण्याच्या जागा त्या बेटावर जपान बांधून तयार करीत आहे असें पुढें उघडकीस आलें. नेमकें असें काही करण्याचीच राष्ट्रसंघानें मनाई केलेली होती. इंग्लंड व फ्रान्स यांनीहि त्यांच्या ताब्यांत दिलेले प्रदेश जणुं काय त्यांच्या मालकीचेच आहेत अशाप्रकारें त्यांच्याशी (त्या प्रदेशांशी) वागणूक चालविली.

पहिल्या महायुद्धांत 'मॅंडेट' नें दिलेले भूभाग आतां पुन्हां कर्जाऊ देण्यांत येत आहेत. यावेळची पद्धति पहिल्या पद्धतीपेक्षां जरा निराळी आहे आणि कार्यक्षम ठरण्याचाहि संभव आहे. इटाली व जपान यांनी सत्ता गाजविलेल्या पण दुसऱ्या महायुद्धांत दोस्तांनी जिंकून घेतलेल्या अशा भूप्रदेशांवरहि विश्वस्त मंडळाला अधिकार मिळेल. तसेंच दुसऱ्या कोणत्या एखाद्या राज्यसत्तेनें मनांत आणले तर ती आणखीहि दुसरा एखादा भूभाग या विश्वस्त मंडळाच्या अंमलाखाली देऊं शकेल.

लेखी करार झाल्यानंतरच कोणताहि प्रदेश विश्वस्त मंडळाच्या अंमलाखाली येतो. आपल्या अंमलाखाली असलेला एखादा प्रदेश विश्वस्त मंडळाच्या अंमलाखालीं द्यावा असें एखाद्या राष्ट्रानें ठरविलें म्हणजे त्या प्रदेशाशी संबंध असलेलीं राष्ट्रें एक लेखी करार करतात. सदर प्रदेशाचा कारभार कोणत्या राष्ट्रानें पहावा, आणि विश्वस्त मंडळाला त्यासंबंधांत



काय करतां येईल तें त्या करारांत लिहिलेलें असून, राज्यकारभारांत पाळावयाचे नियमहि त्यांत ग्रथित केलेले असतात. प्रत्येक विभागासाठीं एकेक स्वतंत्र करार केला गेला पाहिजे, कारण प्रत्येक प्रदेश वेगवेगळा असतो व ज्याचे त्याचे स्वतंत्र प्रश्न असतात.

ज्या प्रदेशाबद्दलची ही सनद असेल त्या प्रदेशांतल्या लोकांची सल्लामसलत घेतली गेलीच पाहिजे असें तींत म्हटलेलें नसतें. आपल्याला काय पाहिजे आहे हें ते लोक मात्र नेहमींच बोलून दाखवितात पण त्यांजवर राज्य करणारीं राष्ट्रें मात्र बहुधा त्यांचें ऐकतच नाहीत असें घडत आलें आहे. उदाहरणार्थ, पॅलेस्टाईनच घ्या, तेथल्या लोकांचें बरेंच मागणें होतें.

भूप्रदेशांचे दोन प्रकार असतात. एक म्हणजे युद्धदृष्टचा उपयोगाचे व दुसरे म्हणजे तसे नसलेले. युद्धोपयोगी प्रदेश म्हणजे ज्यांत युद्धबोटीच्या दृष्टीनें उपयोगाचें असें बंदर आहे, अगर लष्करी विमानतळ आहे अगर अशीच युद्धांत उपयोगी पडणारी दुसरी कांहीं सोय आहे. पुष्कळशा जागा युद्धदृष्टचा महत्वाच्या समजल्या जात नाहींत.

युद्धदृष्टचा महत्वाचा असा एखादा भाग विश्वस्त मंडळाकडे देण्याचें पक्कें करण्यापूर्वीं सुरक्षा-मंडळाचें त्यावर मत घेतलें जावें लागतें. सुरक्षा-मंडळांतल्या राष्ट्रांना जर तो करार पसंत पडला नाही तर त्या भागावर राज्य करणाऱ्या एका किंवा अनेक राष्ट्रांचें मन वळविण्याचा तीं प्रयत्न करतात.

युद्धदृष्टचा महत्वाचे नसलेले असे प्रदेश विश्वस्त मंडळाकडे सोंपविण्याच्या करारांवर यूनोच्या आमसभेचें मत घ्यावेंच लागतें. आतांपर्यंत या सभेपुढें जे करार ठेवण्यांत आले त्यांत बऱ्याच सुधारणा घडवून आणण्याच्या कामीं या सभेला यश आलेलें आहे.

ही अगदीं सोपी पद्धति आहे. कोणताहि प्रदेश विश्वस्त मंडळाकडे सोंपविण्याच्या प्रत्येक करारांत, त्या प्रदेशावर कोणा एका विशिष्ट राष्ट्राचाच अंमल चालावा, कीं कांहीं राष्ट्रांनीं मिळून त्याचा कारभार पहावा, कीं खुद्द विश्वस्त मंडळानेच तेथील कारभार चालवावा, त्याचा स्पष्ट उल्लेख असावा लागतो.

कोणत्याहि भागावर विश्वस्त म्हणून सत्ता चालविणाऱ्या राष्ट्रांनीं, विश्वस्त मंडळानें त्यांजवर देखरेख ठेवण्याला आणि त्या राष्ट्रांनीं काय काय केलें पाहिजे तें सांगण्याला मान्यता दिलेली असली पाहिजे अशी या योजनेमागील भूमिका आहे.

विश्वस्त मंडळांत, पहिली गोष्ट म्हणजे, निरनिराळ्या करारान्वयें ज्यांच्या अंमलाखालीं कांहीं प्रदेश दिले गेलेले असतात अशा राष्ट्रांचा समावेश असतो. तसेंच पांचहि बडीं राष्ट्रें (इंग्लंड, फ्रान्स, सोव्हिएट युनियन, चीन आणि अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें) त्यांच्याकडे विश्वस्त या नात्यानें कोणता

प्रदेश सोंपविलेला असला-नसला तरीहि या विश्वस्त मंडळाचीं सभासद असतातच.

त्याशिवाय यूनोची जनरल ॲसेंब्ली त्या मंडळावर जरूर तितक्या इतर राष्ट्रांचीहि निवड करते. म्हणजे अखेर ज्यांच्या हाताखालीं कोणता तरी प्रदेश दिला गेलेला आहे त्या राष्ट्रांच्या संख्येइतकी ज्यांच्या हाताखालीं असा प्रदेश नाहीं त्या राष्ट्रांची त्या मंडळांत संख्या होते.

अगदीं पहिल्याने बनविल्या गेलेल्या विश्वस्त मंडळांत पुढील राष्ट्रें होतीं :—

'विश्वस्तां'च्या अंमलाखालील प्रदेशांचा कारभार पहाणारीं राष्ट्रें : ऑस्ट्रेलिया, बेल्जियम, फ्रान्स, न्यूझीलंड आणि युनायटेड किंगडम (इंग्लंड).

'विश्वस्त' म्हणून कोणत्याहि प्रदेशाचा कारभार न पहाणारीं राष्ट्रें बड्या पांच राष्ट्रांपैकीं इतर: चीन, सोव्हिएट यूनियन, अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें.

आणि निवडून दिलेलीं: इराक, मेक्सिको.

ही अगदीं छान योजना आहे. वसाहतींवर हुकूमत गाजविणारीं राष्ट्रेंच जर या मंडळांत असतीं तर हुकूमत गाजविणाऱ्या एका राष्ट्राचा प्रतिमिधी तसल्याच दुसऱ्या राष्ट्राला म्हणाला असता, की, "माझ्या ताब्यांतील प्रदेशांतून भरपूर पैसा उकळण्याच्या आड जर तूं आला नाहींस तर तुझ्या ताब्यांतील प्रदेशांत तुलाहि मी तसें करूं देईन; आणि ज्या प्रदेशांचा आपण कारभार पाहातों त्यांच्यासाठीं जास्त शाळा बांधण्यासाठीं आपण या पैशांतली एक दमडीहि खर्च करीत नाहीं याबद्दल आपण दोघेहि मूग गिळून बसू."

पण विश्वस्त मंडळांत 'विश्वस्त' म्हणून काम करणाऱ्या, सहा राष्ट्रांचे जसे प्रतिनिधी असतात तसेंच त्या प्रकारचें काम न करणाऱ्या ६ राष्ट्रांचे प्रतिनिधी असल्यामुळेंच त्या (विश्वस्तांच्या हवालीं केलेल्या) प्रदेशांना कांहींतरी संरक्षण मिळतें आहे.

विश्वस्त मंडळाचा सभासद असलेलें प्रत्येक राष्ट्र आपला एक-एक प्रतिनिधी त्या मंडळावर पाठवितें. म्हणजे बारा राष्ट्रें जर त्या मंडळाची सभासद असलीं तर त्या मंडळांत बारा जण असतात.

प्रत्येक राष्ट्राला एकेक मत असतें. सगळे निर्णय साध्या बहुमतानें होतात. (नकार देऊन अडवणूक करण्याचा पांचहि बड्या राष्ट्रांना अधिकार नाहीं.)

हें मंडळ त्याच्या कामाकाजाचे नियम स्वतःच तयार करतें, आणि त्याचा अध्यक्षहि त्यानेंच निवडलेला असतो.

या मंडळांतील बहुसंख्य सभासदांना जितक्या वेळां त्याची बैठक भरण्याची आवश्यकता वाटेल तितक्या वेळां त्याच्या बैठका भरतात.

हें विश्वस्त मंडळ एक प्रश्नपत्रिका तयार करून ती 'विश्वस्त' म्हणून कारभार पहाणाऱ्या राष्ट्रांकडे पाठवितें. 'गेल्या वर्षीं तुम्ही किती शालागृहें बांधलींत?' किंवा 'तुम्हीं तुमच्या अंमलाखालील लोकांना त्यांच्या शहरांतील स्थानिक स्वराज्याचे अधिकार दिले आहेत काय?' असले किंवा अशाच प्रकारचे प्रश्न तीत विचारलेले असतात. विश्वस्ताच्या हवाली केलेल्या कोठल्याहि भागावर अंमल चालविणाऱ्या राष्ट्रानें किंवा राष्ट्रांनीं या प्रश्नपत्रिकेला उत्तर देणारा अहवाल दर वर्षीं विश्वस्त मंडळाकडे पाठवावाच लागतो.

अशा प्रकारें येणाऱ्या उत्तरांवर विश्वस्त मंडळ चर्चा करतें, त्या उत्तरांसंबंधांतलीं आपलीं मतें लिहून काढतें, आणि तीं दोन्हीं आमसभेकडे किंवा सुरक्षा-मंडळाकडे पाठवून देतें.

पण 'विश्वस्त' राष्ट्रांकडून येणाऱ्या अहवालांवरच केवळ विश्वस्त मंडळ अवलंबून राहात नाही. विश्वस्तांच्या हातांखालील प्रदेशांत कमिट्या पाठवून पाहाणी करविण्याचा व चौकशी करण्याचाहि विश्वस्त मंडळाला अधिकार आहे. एखाद्या विश्वस्त राष्ट्रानें या चौकशी कमिटीला त्याच्या हातांखालील मुलुखांत येऊं दिलें नाही तर विश्वस्त मंडळ ती गोष्ट आमसभेच्या अगर सुरक्षा-मंडळाच्या कानावर घालतें.

विश्वस्त राष्ट्रांच्या अंमलाखालील प्रदेशांत राहाणाऱ्या लोकांना, विश्वस्त मंडळाची मदत मागण्यासाठी त्याच्याकडे अर्ज पाठविण्याचा आतां हक्क मिळालेला आहे. 'विश्वस्त' प्रदेशावर राज्य करणाऱ्या बेल्जियम, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका या राष्ट्रांना ही गोष्ट आवडली नाही. म्हणून त्यांनी त्यांच्या हाताखालील प्रदेशांतल्या लोकांच्या असले अर्ज करण्याच्या हक्कांवर बंधन घालण्याचा प्रयत्न केला. आपण काय करतों तें स्वतः पाहाण्याइतकी विश्वस्त मंडळाला खरीखुरी सत्ता मिळेल अशी त्यांना भीति वाटली. पण विश्वस्तांच्या हातांखालील प्रदेशांतल्या लोकांना हा (विश्वस्त मंडळाची मदत मागण्याचा) अधिकार असलाच पाहिजे असें अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें व सोव्हिएट युनियन या दोन्हीं राष्ट्रांनीं आग्रहपूर्वक प्रतिपादन केलें.

'लोकांना वाईट रीतीनें वागविण्यात येत आहे' असें जर या अर्जांत

म्हटलेलें असलें तर, त्या विशिष्ट भागाच्या कारभाराबद्दल जबाबदार




असणाऱ्या राष्ट्राशीं किंवा राष्ट्रसमूहाशीं विश्वस्त मंडळ त्या बाबतींत बोलणें करतें. त्यानंतर काय केलें गेलें पाहिजे आहे त्याबद्दल विश्वस्त मंडळ शिफारस करूं शकतें आणि ती शिफारस जनरल अॅसेंब्लीकडे किंवा सुरक्षा-मंडळाकडे पाठवूंहि शकतें.

त्याचप्रमाणें, कोणत्याहि भागावर 'विश्वस्त' पणानें अधिकार गाजविण्याची कामगिरी ज्या राष्ट्रांकडे आलेली असते त्यांतील प्रत्येक राष्ट्र, त्याच्या ताब्यांतील वसाहतीबद्दलची तांत्रिक म्हणजे एकंदर कर किती वसूल केला गेला, किती नवे रस्ते बांधले गेले, आणि गुन्हे केल्याबद्दल किती जणांना शिक्षा करण्यांत आली वगैरे माहिती विश्वस्त मंडळाला पुरविण्याचें मान्य करीत असतें. या माहितीमुळें एखादें विश्वस्त राष्ट्र त्याच्याकडे दिलेल्या अधिकारांचा दुरुपयोग किंवा अतिक्रमण करतें आहे कीं काय, तें विश्वस्त मंडळाला व आमसभेला कळूं शकतें.

कोणत्याहि वसाहतीवर किंवा प्रदेशावर सत्ता चालविणारें विश्वस्त मंडळांतील राष्ट्र त्याच्या ताब्यांतील भागांत — मग ते विश्वस्त मंडळाकडे

सोंपविलेले असोत अगर नसोत — दोन उद्देश पुढें ठेवून कार्य करण्याचें वचन देत असतें.

एक उद्देश हा कीं त्या प्रदेशांतला कापूस, तेल, रबर व ताग वगैरे कच्चा माल विकत घेण्याचा, आणि आपला माल तेथें विकण्याचा सर्व राष्ट्रांना सारखाच हक्क असावा. कोणत्याहि एकाच राष्ट्राच्या ताब्यांत खूपशा वसाहती नसाव्यात आणि त्यांतला सर्व कच्चा माल फक्त त्या एकट्या राष्ट्रालाच मिळेल व तें त्या वसाहतींना फक्त गजराचीं घड्याळें किंवा शिवण्याचीं यंत्रेंच विकूं शकेल असें घडूं नये. ज्यांना ज्यांना म्हणून तेथला माल विकत घ्यावयाचा असेल किंवा आपला माल तेथें विकावयाचा असेल त्या त्या सर्व राष्ट्रांना आपल्या वसाहतींचीं द्वारें त्या राष्ट्रानें खुलीं ठेवलीं पाहिजेत.

दुसरा उद्देश असा कीं प्रत्येक राष्ट्रानें त्याच्या ताब्यांतील वसाहतींत किंवा प्रदेशांत जो राज्यकारभार चालवावयाचा तो तेथल्या लोकांच्या हिताच्या दृष्टीनें चालविला पाहिजे. केवळ आपल्या स्वतःच्या हिताच्या दृष्टीनें नव्हे.

'तेथल्या लोकांच्या हिताच्या दृष्टीनें' म्हणजे काय तें 'सनदे'मध्यें (७३व्या कलमांत) पुढीलप्रमाणें स्पष्ट सांगितलें आहे: त्या प्रदेशांत शाळा व व्यापार यांची वाढ केली पाहिजे, आपला राज्यकारभार आपणच स्वतः कसा चालवावयाचा तें शिकण्याच्या कामीं तेथल्या लोकांस मदत केली पाहिजे, आणि लवकर किंवा उशीरां का होईना, इतर कोणत्याहि राष्ट्रांतल्या लोकांप्रमाणें तेच संपूर्णपणें त्यांचा राज्यकारभार चालवूं लागले पाहिजेत.

दुसऱ्या कोणत्याहि लोकांइतकेच या 'विश्वस्त' प्रदेशांतल्या किंवा वसाहतींतल्या लोकानांहि अधिकार असले पाहिजेत असेंहि त्या सनदेंत म्हटलेलें आहे.

'विश्वस्त' म्हणून काम करणाऱ्या राष्ट्रांच्या मर्जीवरच सोपविल्यास ते त्यांच्या ताब्यांतील वसाहतींत जें कांहीं कार्य करतील त्याच्यापेक्षां कितीतरी जास्त कार्य, हें विश्वस्त मंडळ आमसभेच्या व सुरक्षा-मंडळाच्या मदतीनें त्यांजकडून करवून घेऊं शकेल यांत शंका नाहीं.

पण, वसाहतींवर राज्य करणाऱ्या राष्ट्रांतील सरकारांत असणाऱ्या लोकांवरच अजून पुष्कळ अंशीं अवलंबून राहावें लागतें. जर खरोखरच त्यांच्या मनांत असेल तर ते वसाहतींत शालागृहें बांधूं शकतील, त्यांच्या म्युनिसिपालिट्या आणि कायदे मंडळें यांजमध्यें लोकांना त्यांचे प्रतिनिधी

निवडूं देतील, आणि त्यांच्या स्वत:साठीं कसे कायदे करावे तेंहि त्यांना शिकूं देऊं शकतील. पण असल्या कांहीच गोष्टी करण्याचें जर त्या सत्ताधारी राष्ट्राच्या सरकारच्या मनांत नसेल तर विश्वस्त मंडळ, सुरक्षा-मंडळ आणि आमसभा हीं तिघेंहि त्या राष्ट्राचा निषेध करूं शकतील आणि अमक्या-अमक्या गोष्टी केल्या गेल्याच पाहिजेत अशा शिफारशी करूं शकतील.

# प्रकरण ७

# आंतरराष्ट्रीय न्यायालय

## जेथं राष्ट्रांवर न्यायालयांत खटले भरले जातात

आपल्या राज्याचे कायदे, राज्याचें कायदेमंडळ करतें. ह्या कायदे-मंडळात आपल्या राज्यांतील नागरिकांनीं मतदानानें निवडून दिलेले स्त्रीपुरुष असतात. प्रत्येक राज्याचे स्वत:पुरते कायदे असतात.

आपण कुठल्या गोष्टी करूं नये हें सांगणारे आपल्या राज्याचे कायदे असतात, त्याचप्रमाणें त्यांतील एखाद्या कायद्याचे उल्लंघन केल्यास राज्यांतील पोलीस, न्यायालयें आणि तुरुंग आपली कशी दखल घेतील हें सांगणारेही दुसरे कायदे असतात.

राष्ट्राराष्ट्रात देखील "आंतरराष्ट्रीय कायदे" म्हणून कांही करार केलेले असतात. त्यांची अंमलबजावणी करण्यास आपल्याकडे आंतरराष्ट्रीय पोलीस किंवा तुरुंग नसल्यामुळें, ते राज्याच्या कायद्याहून निराळे असतात. राज्याचा कायदा म्हणजे "कायदा" असल्यामुळें, त्याचें उल्लंघन झाल्यास आपली रवानगी तुरुंगांत होते, परंतु सन १९४५ पर्यंत कुणासही "आंतरराष्ट्रीय कायदा" मोडल्यामुळें आंतरराष्ट्रीय पोलीसांकडून शिक्षा दिली गेलेली नाही.

आंतरराष्ट्रीय कायदे तीन प्रकारें केलेले असतात. एक प्रकार म्हणजे तहनामा करून. दोन राष्ट्रें असा तहनामा करतात कीं, ज्यांत एक राष्ट्र कबूल करतें, "आम्हीं तुमच्याकडून दरवर्षी चाळीस लाख टन कॉफी विकत घेऊं," तर दुसरे सांगतें ,"आमच्या नागरिकांकडून विकत घेण्यांत येणाऱ्या तुमच्या मोटारगाड्यांवर आम्हीं जकात किंवा कर आकारणार नाही." दोन्ही राज्यांकडून हा तहनामा स्वीकारण्यांत आला कीं त्या दोन राष्ट्रांपुरता तो कायदाच झाला.—मात्र हा कायदा व्यक्तिगत लोकांकरतां नसून, त्या राष्ट्रांसाठीं आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

अशा प्रकारचे हजारों तहनामे केलेले आहेत. प्रत्येक राष्ट्राचे जवळ जवळ दुसऱ्या प्रत्येक राष्ट्राशी असे तहनामे झालेले असतात, आणि जेव्हां आपण आंतरराष्ट्रीय कायद्याचा उल्लेख करतों, तेव्हां आपला खरा अर्थ हे तहनामे असाच असतो.

आणखीही दोन प्रकार यांत आहेत, पण त्यांना फारसें महत्व नाहीं. रूढीमुळें एखादा कायदा होऊं शकतो. जेव्हां राष्ट्रें कांहीं कार्यें विशिष्ट पद्धतीनें करीत असतात, त्या पद्धतीलाच "आंतरराष्ट्रीय कायदा" समजतात. उदाहरणार्थ पूर्वकालागत चालत असलेली अशी एक पद्धति आहे की, जर महासागरांत एखादें जहाज दुसऱ्या जहाजांकडून लुटलें गेलें, तर ती चांचेगिरी ठरते, आणि चाच्यांना जें राष्ट्र पकडतें, त्याच्याकडूनच कोर्टांत खेंचून शिक्षा दिली जाते. याबाबत ते चाचे कुठल्या राष्ट्राचे आहेत, किंवा लुटले गेलेलें जहाज कोणाचें आहे याची दखल घ्यावयाची नसते.

ही पूर्वपरंपरागत चालत आलेली पद्धति आहे, त्याचप्रमाणें सर्वसाधारण बुद्धीला पटणारी गोष्ट आहे. गेली दोन शतकें प्राय: लोक समजून चुकले आहेत कीं बऱ्या व वाईटाच्या सर्वसाधारण बुद्धीला पटणाऱ्या कल्पना या आंतरराष्ट्रीय कायदे म्हणून स्वीकारल्या जाव्या.

आंतरराष्ट्रीय कायद्याचा तिसरा आधार म्हणजे ह्यूगो ग्रोशिअस किंवा अमेरिकन न्यायाधीश ग्रीन एच्. हॅक्वर्थ यांसारख्या आंतरराष्ट्रीय कायदा जाणणाऱ्या मान्यवर लेखकांचे ग्रंथ. तहनाम्यांत न उल्लेखिलेले तपशील ठरविण्यासाठी हे ग्रंथ अधिकृत समजले जातात.

आंतरराष्ट्रीय न्यायालय निकाल देण्यापूर्वी याच तीन प्रकारच्या आंतरराष्ट्रीय कायद्यांचा उपयोग करतें.

सनदेच्या १०२ कलमाप्रमाणें सभासद असलेल्या प्रत्येक राष्ट्रानें आपल्या तहनाम्याच्या प्रती 'यूनो'च्या कचेरीत पाठवायला हव्यात. ज्याला कुणाला ते वाचावयाचे असतील, त्याच्यासाठीं यूनो तहनाम्याच्या हजारों प्रती काढते. आपण जर एखाद्या मोठ्या शहरांत रहात असाल, तर या छापील प्रती आपणांस एखाद्या सार्वजनिक वाचनालयांत आढळून येतील. त्या लहानशा पुस्तिकेसारख्या दिसत असून आंतील भाषाही क्लिष्ट स्वरूपाची असते. पण त्यांत कधीं कधीं खळबळ उडविणाऱ्या गोष्टी असतात.

पूर्वीं राष्ट्रांराष्ट्रांत गुप्त तहनामे होत असत. ज्यावेळीं रिचेलू हे फ्रान्स देशाचे प्रधानमंत्री होते, तेव्हां त्यांनी स्पेनला इंग्लंडविरुद्ध मदत देण्याचें गुप्त वचन दिलें होतें. स्पेननें उलट बेहद्द खूष होऊन त्याला हव्या असलेल्या कांही गोष्टी देण्याचें कबूल केलें. त्याच वेळीं त्यानें इंग्लंडला गुप्तपणें वचन दिलें कीं, स्पेनविरुद्ध लढण्यासाठीं इंग्लंडच्या आरमाराला मदत करूं, आणि त्याबरोबर इंग्लंडनेंही उलट त्याला हव्या असणाऱ्या कांही गोष्टी देऊं केल्या. अशा प्रकारें थोड्या वर्षापूर्वीं राष्ट्राराष्ट्रांत गुप्त तहनामे होत असत.

तथापि, आंतरराष्ट्रीय कोर्ट साहजिकच स्वत:ला या गुप्त तहनाम्यांच्या




मूर्खपणांत गोंवून घेणें शक्य नाही, म्हणूनच कलम क्रमांक १०२ प्रमाणें, जर एखाद्या राष्ट्रानें असा गुप्त तहनामा केला आणि प्रत्येक सार्वजनिक वाचनालयाला (ज्यांना जरुरी आहे अशांना) देण्यासाठी यूनो कचेरीला तहनाम्याच्या प्रती छापू न दिल्या, तर आंतरराष्ट्रीय न्यायालय तो तहनामा स्वीकारणार नाहीं, आणि म्हणूनच तो "आंतरराष्ट्रीय कायदा" मानणार नाहीं.

पहिल्या जागतिक युद्धानंतर जन्मलेल्या राष्ट्रसंघानेंही आंतरराष्ट्रीय कायद्याचा संबंध येणारे तंटे सोडविण्यासाठी एक कायम स्वरूपाचें आंतरराष्ट्रीय न्यायालय स्थापिलें होतें. लोक त्यास "जागतिक न्यायालय" असें म्हणत, व राष्ट्रसंघाचा तोच सर्वात यशस्वी असा अंश होता. या कोर्टानें पंचवीस वर्षात सुमारें साठ दावे हाताळले. प्रत्येक दाव्यानंतर राष्ट्रांनीं या न्यायालयाचा निकाल प्रमाण मानला, पण अमेरिकन सीनेटनें यांत सामील होण्याविरुद्ध मत दिलें होतें.

नवीन 'आंतरराष्ट्रीय न्यायालय' हे यूनोचा एक भाग जरी असलें तरी जवळ जवळ जुन्या जागतिक न्यायालयासारखेंच आहे. मात्र हें नवीन न्यायालय अधिक सुरळीतपणें चालावें म्हणून थोडाफार तपशिलांत बदल केलेला आहे. जुनें जागतिक न्यायालय नाकारण्यांत आल्यावर अवघ्या दहा वर्षातच, म्हणजे १९४५ मध्येंच अमेरिकन सीनेटनें हें नवीन न्यायालय

स्वीकारण्याचें कारण म्हणजे, दुसऱ्या महायुद्धानें जागतिक शांततेसाठीं झटणाऱ्या संघटनेंत किंवा न्यायालयांत मन घालण्याची अमेरिकेला जरुरी वाटली हें होय.

यूनोंत सामील होणाऱ्या प्रत्येक राष्ट्राला नव्या आंतरराष्ट्रीय न्यायालयाचें सभासद व्हावेंच लागतें. यूनोच्या इतर घटकांत आणि या न्यायालयांत एक फरक असा आहे कीं या न्यायालयाचे सभासद राष्ट्रें नसून व्यक्ति असतात. आमसभेकडून सुरक्षा-मंडळाचे, आर्थिक आणि सामाजिक मंडळाचे, किंवा विश्वस्त मंडळाचे सभासद म्हणून "राष्ट्रें" च निवडलीं जातात. निवडून आलेलीं राष्ट्रें कुठल्या स्त्रीपुरुषाला प्रतिनिधी नेमावें तें आपणच ठरवतात. परंतु या न्यायालयाचे न्यायाधीश हे कुणाचेच प्रतिनिधी नसतात आणि ते कुणासाठीही म्हणून काम करीत नसतात.

हे न्यायाधीश नेमण्याची किंवा निवडण्याची पद्धति फार क्लिष्ट स्वरूपाची असली, तरी ती उत्तम प्रकारें चालते. प्रत्येक राष्ट्राचें सरकार चार लोकांचा एक "राष्ट्रीय गट" म्हणून नेमतें. हा गट चार न्यायाधीश नेमतो ; त्यांतील फक्त दोन त्या राष्ट्रांतील असूं शकतात. खरें पहातां पुष्कळ वेळां ते तीन दुसऱ्या राष्ट्रांतून नेमतात, व एक खुद्द स्वतःच्या राष्ट्रांतून नेमला जातो. या सर्व राष्ट्रांतील नेमणुका सुरक्षा-मंडळ आणि आमसभा यांजकडे पाठविल्या जातात. या दोन्हीं सभा त्यांच्यावर मतदान करून ज्या न्यायाधिशाला सुरक्षा-मंडळांत आणि आमसभेंत माताधिक्य मिळेल, तो निवडून आला असें समजण्यांत येतें.

(परंतु जर का सुरक्षा-मंडळानें निवडलेले पांच न्यायाधीश आमसभेनें निवडलेल्या पांचाहून निराळे असले, तर, कुणाचीच निवड झाली नाहीं असें समजतात, आणि सुरक्षा-मंडळ व आमसभा पुन्हां मतदान करतात. या बाबतीत दोघांचें एकमत होण्यासाठीं त्यांनीं प्रयत्न करावे यास्तव भरपूर सोय करण्यांत आली आहे.) एकूण पहातां या न्यायालयांत पंधरा लोक असतात, व त्यांतील पांच जणांची दर तीन वर्षांनी निवडणूक होते. एकाच राष्ट्राचे दोन सभासद असूं शकणार नाहींत. "ह्यांची निवडणूक त्यांच्या राष्ट्रीयत्वाची दखल न घेतां केलेली असून, उच्च तोलाच्या नीतिमत्तेचे व स्वतंत्र बाण्याचे असे हे न्यायाधीश असतात" (न्यायालयाच्या कायद्यांचें २ रें कलम). प्रत्यक्ष पहातां ह्या श्रेष्ठ व मान्यवर अशा व्यक्ती असतात.

प्रत्येक न्यायाधीशाची नेमणूक नऊ वर्षें असून त्याची त्यानंतरही पुन्हां निवड होऊं शकते. नऊ वर्षें हा जरी दीर्घकाल असला, तरी त्यापूर्वीं कुणाही न्यायाधीशाला काढूं शकत नाहींत. एखाद्या दाव्याचा निकाल देण्यापूर्वीं तो

आपल्या मनांत यत्किंचितही असा विचार आणू देत नाही, कीं 'आमसभेला मी करतों तें पसंत न पडल्यास ती मला बडतर्फ करील काय?' त्याला जें बरोबर वाटेल तें तो करील. एखाद्या न्यायाधीशाला आपल्या कामाचा कंटाळा आला, तरीही जर तो राजिनामा देण्यास तयार नसेल, तर इतर न्यायाधीशांना एकमत करून त्याच्याविरुद्ध मतदान करून त्याला काढून टाकतां येतें. पण दुसऱ्या कुणास हें करतां येत नाहीं. थोडक्यांत म्हणजे सुरक्षा-मंडळ व आमसभा यांनी आपल्या पूर्ण विश्वासांतलेच न्यायाधीश निवडले पाहिजेत.

हे न्यायाधीश कुणाचेच ताबेदार नसतात. असं समजा––त्यांतील एक आपल्या भारतांतील आहे, तर भारत सरकारला त्यानें कसें मत द्यावें हें सांगण्याची नव्हे तर नुसतें सुचविण्याचीहि परवानगी नसते, आणि एखादा न्यायाधीश दुसऱ्या कुणाची ताबेदारी करूं लागला, तर इतर न्यायाधीशांना त्याच्याविरुद्ध मतदान करून, त्याला काढतां येतें.

आमसभा या न्यायाधीशांना वर्षाला २१,००० डॉलर्स (एक डॉलर म्हणजे सुमारे ४ रु. १२ आ.) इतका पगार देते. एखाद्या न्यायाधीशाच्या नऊ वर्षाच्या कारकीर्दीत तो कमी करावयाचा हक्क आमसभेला नाहीं.

हें न्यायालय व्यक्ती-व्यक्तीतील तंट्याची दाद मुळीच घेणार नाहीं. एखाद्या देशाचा नागरिक असलेल्या कुणा व्यक्तीनें जर दुसऱ्या देशाच्या सरकारनें आपल्याला लाखों रुपयाला फसविलें असा दावा माडला तरी देखील या दाव्याची दाद हें न्यायालय घेणार नाहीं. कारण ती व्यक्ति म्हणजे राष्ट्र नव्हे; या न्यायालयांत फक्त एका राष्ट्राविरुद्ध दुसऱ्या राष्ट्राची कांही तक्रार असली, तर तें कामकाज चालेल. यूनोचें सभासद असलेलें कुठलेंही राष्ट्र या न्यायालयांत दावा मांडू शकतें. सभासद नसलेल, पण या न्यायालयाच्या कायद्याला मान्यता देणारें राष्ट्रही दावा मांडू शकतें; पण असें करूं इच्छिणाऱ्या राष्ट्रासाठी सुरक्षा-मंडळ व आमसभा यांनी एकत्र मिळून नियम करावयाचे असतात. जनरल फ्रँकोच्या वर्चस्वाखालच्या स्पेन सारख्या राष्ट्रालासुद्धां, जरी तें यूनोंत सामील झालें नसलें तरी, या न्यायालयांत भाग घेतां येईल. अशा प्रकारचें राष्ट्र या न्यायालयामध्यें कांही बिघाड करील अशी धास्ती बाळगण्याचें कांहीच कारण नाही.

न्यायालयाच्या कायद्याला मान्यता न दिलेल्या राष्ट्रालाहि आपला दावा या न्यायालयांत मांडतां येतो. मात्र असें करूं इच्छिणाऱ्या राष्ट्रानें या दाव्यासंबंधीं यूनोची सनद व न्यायालयाचा निकाल प्रमाण मानीन असा कबुलीजबाब (लेखी) दिला पाहिजे.

न्यायालय तंटे स्वतः होऊन कधीच शोधीत नाहीं. 'आपमांतला तंटा त्यांत दाखल करा' असा हुकूम तें कधीच देऊं शकत नाही, सुरक्षा-मंडळही आपली तक्रार या न्यायालयांत न्या असा हुकूम कुणाही राष्ट्राला देऊं शकत नाहीं, फार तर ते तशी शिफारस करूं शकेल.

दावे दाखल करून घ्यावयाची पद्धति पुढीलप्रमाणें आहे :

एक राष्ट्र या न्यायालयाच्या रजिस्ट्रारला संदेश पाठवतें, "आम्हांला 'क्ष' राष्ट्राविरुद्ध तक्रार करावयाची आहे." या संदेशांतच ती तक्रार, तंटा, कशाविषयी आहे हेंही विषद केलें पाहिजे. रजिस्ट्रार लागोलाग त्या 'क्ष' राष्ट्राला आणि यूनोचे सभासद असलेल्या इतरांना देखील संदेश पाठवितो.

यदाकदाचित तें दुसरें 'क्ष' राष्ट्र त्या तक्रारीबाबत या कोर्टात येण्याचें नाकबूल करीत असेल तर तें प्रकरण तेवढ्यावरच 'समाप्त' समजावयाचें. कारण त्यावर सक्ति अशी कुणीच करू शकत नाहीं.

आंतरराष्ट्रीय न्यायालयाच्या ३६ व्या कलमाप्रमाणें, कुणाही राष्ट्राला न्यायालयाचें "सक्तीचे अधिकार क्षेत्र" स्वीकारतां येतें. जेव्हां एखादें सरकार याचा स्वीकार करतें, तेव्हांपासून दुसऱ्या कुणा राष्ट्रानें त्याविरुद्ध आंतरराष्ट्रीय न्यायालयांत तक्रार केल्यास त्यांना तो तंटा न्यायालयांत दाखल करून त्याचा निकाल प्रमाण मानलाच पाहिजे.

यूनोच्या अमेरिकेसह सर्व सभासदांनीं, अशा प्रकारचें वचन दिलें आहे.

क्षुल्लक बाबीसंबंधी प्रत्येक तंटा दाखल करून घेतलाच पाहिजे असा कांही या न्यायालयाला दंडक नाही. कित्येक वेळां न्यायालय असें ठरवितें, "ही तक्रार आम्ही दखल घेण्यायोग्य नाही". पुष्कळ वेळां असें ठरवितात, "तक्रार करणाऱ्या राष्ट्राची तक्रार कांही खऱ्या स्वरूपाची नाही, आणि त्याची दखल घेण्याची आम्हांला कांहींच जरुरी नाहीं."

जेव्हां एखादें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रानें तहनामा मोडला, किंवा 'आंतरराष्ट्रीय कायदा' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या परंपरागत रूढीचें उल्लंघन केलें अशी तक्रार करतें, तेव्हां ती न्यायालयांत दाखल करणें शक्य असतें. केलेल्या तक्रारीप्रमाणें आरोपित राष्ट्रानें खरोखरच उल्लंघन केलें की काय, आणि तसें असल्यास त्या राष्ट्रानें खरोखरच तहनामा किंवा आंतरराष्ट्रीय कायदा मोडला कीं काय हें पहावयाचें काम न्यायालयाचें होय.

आपण असें समजूं कीं, इक्युएदॉरच्या सरकारकडून व्हेनिझुएला राष्ट्रानें इक्युएदॉरच्या तीन नागरिकांना तेलाच्या खाणींत चाळीस लक्ष डॉलर्सनां फसविलें. या तेलाच्या खाणी त्यांनीं व्हेनिझुएलांत विकत घेतल्या होत्या

आणि पुढें व्हेनिझुएलानें कबूलहि केलें कीं, त्यांनी त्या माणसांकडून खाणी काढून घेतल्या.




आतां, हें करणें कुठल्या "तहनाम्याच्या" किंवा, "आंतरराष्ट्रीय कायद्याच्या" विरुद्ध आहे की काय हें ठरवावयाचें काम न्यायालयाचें आहे.

समजा न्यायालयाने निकाल दिला की, व्हेनिझुएलाला त्या तेलाच्या खाणीचा कब्जा घेण्याचा कायदेशीर हक्क आहे, पण त्या लोकांना त्याबद्दल पैसे द्यावेत. तर मग न्यायालयानें, तज्ज्ञाचा सल्ला घेऊन आणि त्यांचें म्हणणें ऐकून, व्हेनिझुएला त्या एक्युएदॉरच्या तीन नागरिकांना किती देणें लागतें तें ठरविलें पाहिजे. व्हेनिझुएलानें त्यांना मागणी केलेल्या चाळीस लक्षाऐवजीं दहा लक्ष डॉलर द्यावे असेंही न्यायालय ठरवूं शकेल.

याप्रमाणें व्हेनिझुएला सरकारला, इक्युएदॉरच्या सरकारला दहा लक्ष डॉलर द्यावे लागतात व तें सरकार ते पैसे त्या तीन नागरिकांना देतें.

कधीं कधीं तंटयांत गोंवलेलें एखादें राष्ट्र असें प्रतिपादतें कीं, "तहनाम्याप्रमाणें तक्रार बरोबर आहे, पण तो तहनामाच अन्याय्य आहे, आणि त्याकरतां तो बदलला पाहिजे". अशा प्रकारच्या तंटयावर न्यायालय निकाल देत नाहीं. न्यायालयानें राष्ट्रें तहनामा बरोबर पाळतात कीं नाहीं एवढेंच

पहावयाचें; तहनामा बदलणें त्यांना शक्य नसतें. अशा प्रकारचा तंटा सुरक्षा-मंडळ किंवा आमसभेकडे जातो.

आंतरराष्ट्रीय कोर्टाच्या कायद्यांच्या कक्षेंत असल्यास न्यायालय आपल्या बैठकीकरतां विशिष्ट नियम करूं शकतें; हे कायदे या ग्रंथाच्या शेवटी सांपडतील.

तें आपल्या न्यायाधीशातूनच एक अध्यक्ष, दुसरा रजिस्ट्रार अशी निवडणूक करतें. रजिस्ट्रार म्हणजे जवळ जवळ अव्वल कारकूनच असतो. सहाय्यकांच्या मदतीनें तो न्यायालयाचे दप्तर सांभाळणें, आणि शिवाय त्याच्याकडून अपेक्षिलेली दुसरीही कामें करतो.

हें न्यायालय भरण्याची जागा नेदर्लंडसमधील हेग शहर होय. जरूर पडल्यास दुसऱ्या कुठल्याही स्थळी तें भरूं शकतें. सबंध वर्षभर त्याचें कामकाज चालू असतें. दोन किंवा तीन न्यायाधीश एकदम मिळून सुटी घेतात, आणि ते जेव्हां पुन्हां कामावर रुजू होतात तेव्हां दुसरे दोन-तीन सुटी घेतात. अकरा न्यायाधीश नेहमी कामावर असतील, असा प्रयत्न चालू असतो.

जर न्यायालयासमोर अनेक दावे उपस्थित झाले तर तीन किंवा अधिक न्यायाधीशांचें एक चेंबर या प्रमाणें भाग पाडले जातात. अशा प्रकारची चार चेंबरें, निरनिराळया चार दाव्यांचे कामकाज एकाच वेळी करूं शकतात. संपूर्ण न्यायालयासमोर आपल्या दाव्याचें काम चालावें याची वाट पाहून विलंब लागत असेल तर, अशा एखाद्या 'चेंबर'समोर आपला दावा चालावा अशी मागणी करण्याचा सभासद राष्ट्राला हक्क आहे. मात्र एकदां 'चेंबर' पुढें दावा दाखल केल्यावर, त्यांनी--चेंबरनें--दिलेला निकाल जणू "संपूर्ण न्यायालयानेंच" दिल्याप्रमाणें प्रमाण मानला पाहिजे.

जेव्हां फ्रान्स आणि पोलंड यांच्यामध्यें तंटा असेल तेव्हां तें प्रकरण या न्यायालयाकडे गेलें असतां तें ऐकणाऱ्या न्यायमूर्तींपैकी एकजण फ्रान्सपैकीं असला, आणि त्या वर्षी पोलंडमधला कोणीच न्यायमंडळांत नसला तर कोर्ट अन्याय करीत आहे असें कांहीं लोकांना वाटेल. म्हणून हें न्यायालय स्थापन करणाऱ्या कायद्यानें असें म्हटलें की, अशा परिस्थितीत पोलंडचें सरकार आपला एक न्यायाधीश नेमील व तो त्या एका तंटयाच्या कामा-पुरताच त्या न्यायमंडळांत बसेल. बाकीच्या प्रत्येक न्यायाधीशाप्रमाणें त्यालाहि एकच मत देतां येईल.

बहुतेक सर्व कज्जांचें काम इंग्रजीत किंवा फ्रेंच भाषेंत चालतें. एखाद्या कज्जाच्या कामासाठीं येणाऱ्या साक्षीदारांना किंवा वकीलांना, ज्या भाषेंत

त्या तंटयाचें काम चालतें, ती भाषा समजत नसेल तर त्यांना दुभाषी नेमावे लागतात.

अमुक एका राष्ट्रानें त्याचा तंटा कोर्टात नेला असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां त्याचा अर्थ पुढीलप्रमाणें असतो. त्या राष्ट्राचें सरकार आपला प्रतिनिधी म्हणून कोणातरी एका माणसाची नेमणूक करतें, आणि तो—त्याला जरूर वाटतील तितके—वकील, मदतनीस, दुभाषी व चिटणीस बरोबर घेऊन कोर्टात हजर होतो. आपलीच बाजू बरोबर आहे असें जे सिद्ध करूं शकतील असें त्याला वाटते तशा प्रकारचे महत्वाचे कागद तो न्यायाधीशाच्या हातांत देतो, आणि भाषणेंहि करतो. त्यानें त्याला विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांची उत्तरेंहि द्यावी लागतात.

ही न्यायमंडळें कांही मदतहि घेतात (पण आर्थिक व सामाजिक मंडळें जेवढी मदत घेतात तेवढी मात्र नाही). तंटा जर तेलाच्या खाणीबद्दल असला तर तेलखाणीबद्दलची ज्याला माहिती आहे अशा एखाद्या माणसाला तें न्याय-मंडळ आपल्याबरोबर बसायला बोलावतें. या माणसाला 'अॅसेसर' या ठराविक नांवाने संबोधलें जातें (सनदेचें ३० वें कलम). हा मनुष्य साक्षीदारांकडे किंवा वकिलांकडे वळन त्यांना अडचणीत पाडणारे प्रश्नहि विचारणें शक्य असतें. नंतर एका खोलीत जमून न्यायाधीश आपसांत चर्चा करतात तेव्हां तीतहि तो भाग घेतो. पण निर्णय घेण्याच्या वेळी मात्र तो मत देत नाही.

तसेंच, न्यायालयांत हजर राहून विचारलेल्या प्रश्नाना उत्तर देण्यापुरतेच दुसऱ्या कांही तज्ज्ञांना हे न्यायमंडळ बोलावू शकते. तें साक्षीदारांनाहि बोलावूं शकतें. तसेंच, जरुरी वाटली तर कोणतेहि कागद, कोणतींहि पत्रें, कोणतेहि तह, किंवा तसलाच दुसरा पुरावा हजर करण्याबद्दल तें फर्माऊं शकतें.

पण साक्षीदार किंवा पुरावा धरून आणण्याचा मात्र या न्यायमंडळाला अधिकार नाही. व्हेनिझुएलामधल्या तेलखाणीबद्दलची जर त्याला माहिती पाहिजे असेल तर, तो पुरावा पाठविण्याबद्दल ते व्हेनिझुएलाच्या सरकारला फक्त लिहून कळवूं शकेल. स्वतःच्या डोळ्यांनी खरे पुरावे पहाण्यासाठी आणि त्याचे फोटो घेण्यासाठी तें आपल्या रजिस्ट्रारला पाठवू शकणार नाही. फ्रान्समधल्या एखाद्या साक्षीदाराची जर त्याला गरज भासली तर त्या साक्षीदाराला पाठवून देण्याबद्दल तें फ्रान्सच्या सरकारला तसें फक्त कळवू शकेल.

हा या व्यवस्थेतला खरोखर एक दोष आहे असें म्हणतां येणार नाहीं.

समजा--पोलंड म्हणतें, "अकरा स्टीम टर्बाईन इंजिनें आम्हाला देण्याचा फ्रान्सनें आमच्याशीं तह केलेला आहे, आणि तरीहि ती पाठविली नाहीत." फ्रान्स म्हणतें, "आम्हीं ती अकरा इंजिनें पोलंडकडे पाठविली आहेत. त्या इंजिनांचा फोटो काढून आणण्यासाठी आपण पोलंडमध्यें एक फोटोग्राफर पाठवू या." त्या फ्रेंच फोटोग्राफरला आपल्या हद्दीत येऊ देण्याला पोलंडनें नकार दिला.

अशा वेळी तीं इंजिने पहाण्याकरितां आपला रजिस्ट्रार पाठविण्याची न्यायमंडळाला गरज नाही. कोणतें राष्ट्र खोटें बोलतें आहे तेवढेंच तें सांगेल.

कोणत्याहि तंटयांतील दोन्ही बाजूंच्या लोकांनी आपापली कागदपत्रें सादर केली, आणि त्यांच्या-त्याच्या तर्फेचीं भाषणें केली, आणि न्यायाधीश मंडळींनी प्रश्न विचारण्याचें काम संपलें की सगळे न्यायाधीश एका खोलीत जातात व आपसांत चर्चा करतात. त्यानंतर त्यांची मतें घेतली जातात, आणि बहुमतानुसार त्या तंटयाचा निकाल लागतो. जर दोन्ही बाजूंस ६–६ किंवा ५–५ मतें पडली तर या तंटयाच्या कामाच्या वेळी जो न्यायाधीश अध्यक्ष असेल तो दोनदां मत देतो. त्याच्या या जादा मताला 'कास्टिंग व्होट' म्हणतात (सनद कलम ५५).

त्यानंतर न्यायमंडळाचा तो निर्णय लिहून काढला जातो. तसे करतांना त्या निर्णयाची कारणेंहि नोंदलेली असतात. साधारणतः एकच न्यायाधीश तो निर्णय लिहून काढतो पण त्या निर्णयाशी सहमत असलेल्या सर्व न्यायमूर्तींची नांवेंहि तो नमूद करतो. सर्व कारणें काळजीपूर्वक ज्यांत नमूद केलेली आहेत असा प्रत्येक निर्णय साधारणतः छापलेली १० पानें भरेल इतका लांब असतो. आंतरराष्ट्रीय कायदे काय आहेत तें कळण्यासाठी कायद्याचे विद्यार्थी असले निर्णय ज्यांत दिलेले आहेत अशी सबंध पुस्तकेंच्या पुस्तकें वाचून काढीत असतात.

प्रत्येक निर्णय न्यायालयामध्यें मोठयानें वाचून दाखविला जातो आणि त्यावेळी सर्व प्रतिनिधी व वकील शांतपणें तो ऐकून घेतात. त्यानंतर त्या निर्णयाच्या छापून प्रती तयार करण्यांत येतात आणि सरकारे, वाचनालयें, विद्यार्थी वगैरे ज्या ज्या कोणाला त्या हव्या असतील त्याला त्याला त्या देण्यांत येतात.

त्यानंतर न्यायमंडळाचें काम खलास होतें. त्यानें दिलेला निर्णय राष्ट्रांना मान्य करावयाला लावण्यासाठी तें कोणताहि प्रयत्न करीत नाही.

"आमच्यांत व दुसऱ्या कोणा राष्ट्रांत तंटा उत्पन्न झाल्यास त्यासंबंधांत आंतरराष्ट्रीय न्यायमंडळ जो निर्णय देईल तो आम्ही मान्य करूं," असें

यूनोच्या सनदेवर सही करणाऱ्या प्रत्येक राष्ट्रानें वचन दिलेलें असतें. आंतरराष्ट्रीय न्यायमंडळानें दिलेला निर्णय जर एखाद्या राष्ट्रानें मानला नाहीं तर त्याबद्दल दुसरें राष्ट्र सुरक्षा-मंडळाला तांतडीची तार करूं शकेल असें ९४ नंबरच्या कलमांत सांगितलेलें आहे.

पण सुरक्षा-मंडळ असो कीं यूनोची दुसरी कोणती संस्था असो, कोणताहि निर्णय मानण्याची एखाद्या राष्ट्रावर सक्ती करण्याचा त्यांपैकीं कोणालाहि अधिकार नाही. असल्या कामासाठी यूनोला तिच्या सैन्यबळाचाही उपयोग करतां येत नाहीं.

असें असतांहि, जुन्या जागतिक न्यायालयाचे सर्व निर्णय मानले गेले होते, आणि या नव्या आंतरराष्ट्रीय न्यायालयाचे सर्व निर्णयहि तसेच मान्य केले जातील याबद्दल तुमची खात्री असूं द्या.

असें कां बरें ? याचें कारण अगदीं साधें आहे. जर एखाद्या राष्ट्रानें या न्यायालयाचे निर्णय अमान्य केले तर तेंच अडचणीत येईल. मग "तुम्हीं दिलेल्या वचनाप्रमाणें वागत नसल्यामुळें आम्हीं यापुढें तुमच्याशीं कसलाहि करार करणार नाही!" असें दुसरें प्रत्येक राष्ट्र त्याला म्हणूं लागेल. पण दुसऱ्या राष्ट्रांशीं करार-मदार केल्याखेरीज कोणत्याच राष्ट्राला जगतां येत नाहीं.

आपल्याकडे येतील तितके सर्व वाद तोडण्यास समर्थ होण्याइतकें हें आंतरराष्ट्रीय न्यायालय सामर्थ्यवान आहे. आपलीं सर्व कायदेशीर भांडणें याच न्यायालयाकडून सोडवून घेण्याचें सगळ्या राष्ट्रांनीं मान्य केल्यास पुष्कळच प्रकरणें न्याय मिळून तुटतील; आणि जर राष्ट्रांराष्ट्रांनीं जास्त मनोरंजक असे करार एकमेकांशीं केले तर तसेच जास्त मनोरंजक असे वादहि या न्यायालयापुढें येऊं लागतील. कामगार लोकांना हव्या त्या देशांमध्यें येऊं जाऊं देण्याची व काम मागूं देण्याची मोकळीक देण्याचें वचन देणारा करार सर्व राष्ट्रांनी मिळून केला, किंवा ज्यांच्या हाताखाली कांहीं वसाहती आहेत अशा राष्ट्रांनीं त्या वसाहतीना वीस वर्षाच्या अवधींत पूर्ण स्वतंत्र करण्याचें वचन देणारा करार केला तर या आंतरराष्ट्रीय न्यायालयाला बरेंच महत्वाचें खाद्य मिळेल. थोडक्यांत सांगावयाचें तर करार-मदार जितके महत्वाचे असतील त्या मानानें या न्यायालयाचें महत्व वाढेल.

इ.स.१९४५ सालीं एक नवी गोष्ट घडली. इंग्लंड, फ्रान्स, सोव्हिएट रशिया व अमेरिका यांनीं 'दि चार्टर ऑफ दि इंटरनॅशनल मिलिटरी ट्रिब्यूनल' या नांवाचा एक करार केला. राष्ट्रांनीं—लोकांनीं नव्हे—काय करावें अगर करूं नये तें नमूद करण्याचीच सर्वसाधारणतः सगळ्या करार-मदारांची

पद्धति असते, पण या आश्चर्यकारक करारामध्यें "एखाद्या आक्रमक युद्धाची किंवा आंतरराष्ट्रीय कायद्यांचा भंग करून सुरू केलेल्या युद्धाची योजना आंखण्याची, तयारी करण्याची, सुरुवात करण्याची किंवा तें चालू राखण्याची ज्याच्या ज्याच्यावर जबाबदारी असेल त्या त्या **प्रत्येक माणसाला** शिक्षा झाली पाहिजे," असें म्हटलेलें आहे. तसेंच व्यापलेल्या मुलुखांतील सामान्य नागरिकांना युद्धाच्या काळांत वाईट रीतीनें वागविणें किंवा त्यांचे खून करणें, किंवा वंश व धर्म या कारणासाठी कोठल्याहि लोकांना उपद्रव देणें वगैरें बऱ्याच गोष्टी या करारामध्यें गुन्ह्याच्या सदरांत घातलेल्या आहेत. असल्या गुन्ह्यांबद्दल जर्मनी, इटाली व जपान या राष्ट्रांतील युद्धगुन्हेगारांवरील खटले चालविण्यासाठी व गुन्हेगार ठरतील त्यांना कोणत्या शिक्षा कराव्यात तें सांगण्यासाठीं या करारान्वयें तात्पुरती अशी कांहीं न्यायालयेंहि नेमलीं गेलीं. त्या खटल्यांनाच 'नुरेंबर्ग ट्रायल्स' म्हणतात.

कोणत्याहि आंतरराष्ट्रीय कायद्यानें विशिष्ट गुन्ह्यांचें वर्णन देण्याची आणि त्या गुन्ह्यांबद्दल प्रत्येक माणसाला शिक्षा झाली पाहिजे असा हुकूम करण्याची हीच पहिली वेळ होती.

कुणी सांगावें, पुनःहि असेंच केलें जाईल. अणु बाँबच्या मदतीनें सबंध जगावर संकट आणू पाहाणारांना शिक्षा होण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय कायदा केला पाहिजे अशी अमेरिकेनें मागणी केली असल्याचें पुढें अणुशक्तीबद्दलच्या प्रकरणांत तुम्हांला आढळून येईलच.

# प्रकरण ८

# सेक्रेटरिएट

## संयुक्त राष्ट्रमंडळाचें काम करणारे स्त्रीपुरुष

तुम्ही जेव्हां यूनोच्या एखाद्या कचेरींत जातां आणि तेथल्या टाइपरायटर्सचा क्लिक्-क्लिक् आवाज ऐकतां व एखादा अधिकारी त्याच्या कारकुनाला पाठवावयाच्या पत्रांचे मजकूर सांगत असल्याचें पाहातां, किंवा तुम्ही जेव्हां तेथल्या एखाद्या सभेस जातां आणि तेथली भाषणें स्टेनोग्राफर्स उतरून घेत आहेत व दुभाषी लोक त्या भाषणांचा अर्थ सांगत आहेत असें पाहातां तेव्हां तुम्हीं यूनोच्या सेक्रेटरिएटचें काम कसें चालतें तेंच पाहात असतां,——'सेक्रेटरिएट' हा फ्रेंच भाषेंतला शब्द असून, सरकारी कचेरींत काम करणाऱ्या नोकरवर्गाबद्दल समुच्चयानें हा शब्द वापरण्यांत येत असतो— ह्या लोकांमुळेंच यूनो-संघटनेचे दैनंदिनचें काम चालू राहूं शकतें. यूनोला यशस्वी करण्यासाठी आपलें सगळें जीवन खर्ची घालणारे हे लोक आहेत.

या सेक्रेटरिएटचा प्रमुख अधिकारी म्हणजे जो सेक्रेटरी-जनरल त्याचे स्थान इतकें महत्वाचें आहे की, तो जर शहाणा मनुष्य नसेल तर या सबध सघटनेकडूनहि फारच थोडें कार्य घडू शकेल.

या कामावर नेमण्यासारख्या माणसाचा सुरक्षा-मंडळ शोध सुरू करतें, आणि पाचहि बडी राष्ट्रे व सुरक्षा-मंडळांतील छोटया राष्ट्रांपैकी निदान दोन तरी राष्ट्रे त्यांना मान्य होईल असा मनुष्य सांपडेपर्यंत सुरक्षा-मंडळां-तील राष्ट्रांच्या प्रतिनिधीना तसल्या माणसाचा शोध चालूच ठेवावा लागतो. पण हवा तसा मनुष्य एकदां आढळला की मग त्याचे नांव आमसभेपुढें ठेवण्यांत येतें. आमसभेने त्या नांवाला जर मान्यता दिली तर त्या माणसाची निवड होते. तिनें जर मान्यता दिली नाहीं तर तिला पसंत पडेल अशा दुसऱ्या एखाद्या माणसाचा शोध करणें सुरक्षा-मंडळाला भाग पडतें.

सेक्रेटरी-जनरलच्या पदावर निवड झालेला गृहस्थ पांच वर्षेपर्यंत त्या स्थानावर राहातो आणि त्या मुदतीनंतर पुन्हां त्याचीच त्या पदावर निवड सुद्धां करतां येते. यूनो त्याला वर्षाला २० हजार डॉलर इतका पगार देते. या उत्पन्नावर त्याला कोणतेहि कर द्यावे लागत नाहीत. त्याशिवाय दुसरे २० हजार डॉलर खर्च-भत्ता म्हणून त्याला देण्यांत येतात.

अगदी पहिल्या प्रथम या पदावर निवड झालेले गृहस्थ म्हणजे ट्रिग्वा ली (असाच त्यांच्या नांवाचा खरा उच्चार आहे) हे ५० वर्षे वयाचे असून एका सुताराचे ते चिरंजीव आहेत. त्यांचे केस काळे कुळकुळीत व कुरळे असून चेहरा देखणा आहे, आणि बाकीचे शरीर जाडजूड असलें तरीहि सुटसुटीत आहे. नॉर्वेतील मजूर संघाचा पुढारी या नात्यानें प्रथम ते पुढें आले आणि पुढें दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं नाझींनी त्यांचा देश व्यापल्यावर, नॉर्वेच्या सरकारमधील एक अधिकारी या नात्याने ते त्या सबंध युद्धाच्या काळांत नाझींशी झगडत राहिले. युनोतील प्रत्येकाचा त्यांच्यावर विश्वास असून, नॉर्वेत आजपर्यंत जे निष्णात कायदेपंडित जन्मास आले त्यात यांचीहि गणना होते असे समजलें जातें.

'ॲटमिक एनर्जी कमिशन'चे सभासद असलेल्या १२ हि राष्ट्रांकडून त्या कमिशनवर त्यांच्या त्यांच्यातर्फेचा प्रतिनिधी नेमला जायला जेव्हा दिरंगाई होऊं लागली तेव्हां 'लवकर तुमच्या प्रतिनिधीची नेमणूक करा,' असें त्यांना सुचविणारी पत्रें लिहायला श्री. ली यांनी मागें घेतलें नाही. तेच यूनोचे मुख्य कारभारी आहेत. ती संघटना कार्यक्षम राहील असें करणें हेच त्यांचें काम आहे.

एकदा काही सभासदाना नको असताहि, त्यांनी सुरक्षा-मंडळाची गुप्त बैठक बोलावली. त्या सभासदांना राग आला, तरी पण जेथें जमण्यास श्री. ली यांनीं त्यांना सांगितलें तेथें ते जमलेच.

सुरक्षा-मंडळाच्या आणि आमसभेच्या प्रत्येक बैठकीचे वेळी कोणत्या प्रश्नांचा उहापोह करावयाचा त्यांची यादी तयार करणे हा त्यांच्या कामाचाच एक भाग आहे. अर्थात, उपरिनिर्दिष्ट दोन्ही संस्थानी जे नियम केलेले आहेत त्याना अनुसरूनच त्यांस ही यादी तयार करावी लागते, आणि त्या संस्थांच्या सभाच्या वेळी, जरूर तर, सभागृह सभेच्या वेळी त्या यादीत फेरफारहि करू शकतें.

सेक्रेटरी-जनरलनें आमसभेच्या, सुरक्षा-मंडळाच्या, आर्थिक व सामाजिक मंडळाच्या आणि विश्वस्त मंडळाच्या सर्व बैठकींना हजर राहिलेंच पाहिजे असें सनदेमध्यें म्हटलेलें आहे. पुष्कळदा असें घडतें की, या मंडळांपैकी दोन किंवा त्याहूनहि जास्त मंडळांच्या बैठकी एकाच दिवशी व एकाच वेळी भरतात. अशा वेळी त्यांतल्या कांही बैठकींना हजर राहण्यासाठी आपल्यातर्फे दुसऱ्या कोणाची तरी डेप्युटी म्हणून रवानगी करणें त्यांना भाग पडतें. पण ते व त्यांचे डेप्युटी यांच्या वारंवार बैठका होत असतात. कारण एक मंडळ काय काम करीत आहे तें दुसऱ्या मंडळाला सांगणें हें सुद्धां सेक्रेटरी-जनरलच्या अनेक कामांतलेंच एक काम आहे.

हे म्हणजे सेक्रेटरी-जनरल व त्यांचे डेप्युटी निरनिराळ्या कमिटचांच्या, कमिशन्सच्या व सब-कमिशन्सच्या बैठकींनाहि हजर राहातात. असल्या कमिटचा किंवा कमिशनें यांजपैकीं पुष्कळांच्या गुप्त बैठकाहि भरतात, पण सेक्रेटरी-जनरलपासून मात्र तीं कांहींहि छपवून ठेवू शकत नाहींत.

सेक्रेटरी-जनरल हा कोणत्याहि बैठकींत बसून नुसतें ऐकण्याचें काम करीत नसतो. आमसभेंत आणि निरनिराळ्या कमिटचांच्या व कमिशनांच्या बैठकींत, फार काय सुरक्षा-मंडळाच्या अतिशय गंभीर चर्चेंतहि भाग घेण्याचा व स्वतःचें म्हणणें पुढें मांडण्याचा त्याना अधिकार आहे.

सेक्रेटरी-जनरलकडे आणखी एक खास काम असतें. एखादें राष्ट्र दुसऱ्या एखाद्या राष्ट्रावर हल्ला करण्याची गुप्तपणें तयारी करीत आहे असें एखादे वेळीं ते उघडकीस आणतील, किंवा एखादें राष्ट्र त्याच्या विश्वस्तते-खालील वसाहतींत इतक्या वाईट रीतीनें राज्यकारभार चालवीत आहे कीं त्यामुळें तेथली प्रजा युद्ध पुकारायलाहि तयार झाली आहे अशी ते बातमी आणतील, किंवा तसलाच दुसरा कांही गंभीर प्रकार घडण्याचेंहि त्यांच्या कानावर आलेलें असेल. असल्या घटनांचा तपास करण्याची सेक्रेटरी-जनरल जवळ बरीच साधनें असतात. कोठें धोका उत्पन्न झालेला दिसला कीं पुष्कळ लोक स्वतःच या सेक्रेटरी-जनरलनां पत्रें लिहून, किंवा तारा करून किंवा प्रत्यक्ष त्यांच्या भेटीस जाऊन त्यांना कळवीत असतात. हे संदेश खरे आहेत कीं खोटे त्याचा त्यांना पडताळा पाहावाच लागतो.



खरोखरच कोठें धोका उत्पन्न झाला आहे असें जर सेक्रेटरी-जनरलनां आढळून आलें तर त्यांनीं सुरक्षा-मंडळाकडे गेलें पाहिजे, त्याचें जें काय काम चाललें असेल तें जरा बाजूला ठेवावयाला लावलें पाहिजे, कोठें कोणता धोका उत्पन्न झाला आहे तें त्या मंडळाला सांगितलें पाहिजे व तो धोका खरा कशावरून तें सिद्ध करण्यासारखा त्यांजजवळ जर कोणता कागदोपत्रीं पुरावा असेल तर तो त्या मंडळापुढें ठेवला पाहिजे. सुरक्षा-मंडळालाहि त्यांचें म्हणणें ऐकून घ्यावेंच लागते.

यूनो संघटनेची निरनिराळी मंडळें, कमिशनें, समित्या, नोकर लोक आणि तज्ज्ञांच्या संस्था यांनी सबंध वर्षात काय काय कामगिऱ्या केल्या त्यांचा संपूर्ण अहवाल याच सेक्रेटरी-जनरलनी आमसभेला सादर करावयाचा असतो. या सर्व संस्थांवर आमसभेचें बरेंच नियंत्रण असतें हें तुम्हांला आठवत असेलच. म्हणून प्रत्येक मंडळाच्या किंवा संस्थेच्या कार्याचा अहवाल वाचतांना, त्या प्रत्येकाच्या बाबतींत आमसभेनें जें काय करावें असें त्यांस वाटत असेल तें ते सहज सांगू शकतात, आणि यूनो संघटनेमध्यें काय चाललेलें आहे याची आमसभेंत बसणाऱ्या कोणाहि व्यक्तीपेक्षां सेक्रेटरी-जनरलनाच सर्वात जास्त माहिती असल्यामुळें, त्यांनी केलेल्या सूचनांवर प्रतिनिधी मंडळी गंभीरपणें विचारहि करतात.

हे सगळे अहवाल सेक्रेटरिएट छापवून घेत असतें आणि कोणालाहि ते मिळू शकतात. या अहवालाची एक एक प्रत दरवर्षी जर तुम्ही मिळवाल आणि या पुस्तकाबरोबरच जर जपून ठेवाल तर यूनोचा संपूर्ण इतिहास तुमच्या संग्रही राहील.

सेक्रेटरिएटसाठीं जरूर असणारे ३ ते ४ हजार कारकून, सेक्रेटरी, ऑफिस-मॅनेजर्स, भाषांतरकार, ग्रंथपाल, निरनिराळ्या विषयांतले तज्ज्ञ व इतर नोकर लोक कामावर नेमण्याच्या बाबतींत आमसभा नियम तयार करते आणि त्या सर्वांसाठीं मिळून एकंदर किती पैसे खर्च करावयाचे तेंहि तीच ठरविते. नंतर सेक्रेटरी-जनरल त्या नियमांनुसार माणसांची नेमणूक करतात व तेच त्या सर्व नोकरांचे सर्वश्रेष्ठ अधिकारी असतात. श्री. ली यांना अगदीं प्रथम जर कोणतें काम करावें लागलें असेल तर तें म्हणजे नोकर मंडळी जमविण्याच्या कामीं मदत करण्यासाठीच आधी कोणातरी एकाला नोकरीस ठेवणें हें.

यूनो संघटनेची सभासद असलेलीं अशीं जी राष्ट्रें आहेत त्या सर्वांतून पुरुष व स्त्री नोकर मिळविण्याचा ते प्रयत्न करतात. एका वर्षाच्या अवधींत जवळ जवळ ४० राष्ट्रांतील निवडक माणसांना त्यांनीं नोकरीस ठेवलें. पण,

प्रत्येक राष्ट्रांतला मनुष्य आपल्याकडे नोकरीस असावा एवढ्याकडेच केवळ लक्ष देऊन त्यांचें चालणार नाही. चांगले कार्यकर्ते मिळविणें ही त्यांच्या दृष्टीनें अधिक महत्वाची गोष्ट आहे.

यूनोकडे नोकरीस राहाणाऱ्या माणसांनीं केवळ आपापल्या देशाचें हित साधण्यासाठींच ती नोकरी पत्करून चालणार नाहीं. यूनोच्या नोकरीतले बरेचसे लोक कोणत्या तरी एकाच---उदाहरणार्थ, इंग्लंड---देशांतले असले तर बाकीच्या राष्ट्रांपेक्षां त्यांचेंच राष्ट्र खरोखर जास्त महत्वाचें आहे अशी त्यांची कल्पना होईल. प्रत्येक माणसानें आपापल्या राष्ट्रावर प्रेम करावें हें अगदीं बरोबर आहे, पण त्याला यूनोच्या सेक्रटरिएटमध्यें जर नोकरी करावयाची असेल तर त्यानें सर्वच राष्ट्रांच्या बाबतींत सारख्या न्यायानें वागण्यास शिकलें पाहिजे. येथें तो यूनोची नोकरी करायला म्हणून आलेला असतो, आणि त्याच्या स्वतःच्या राष्ट्राच्या सरकारचा, किंवा दुसऱ्या कोणा सरकारचा, किंवा एखाद्या राजकीय पक्षाचा अथवा धार्मिक पीठाचा, हुकूम ऐकण्याची त्याला परवानगी नसते.

यूनोच्या नोकरांपैकीं कांही थोडे नोकर सबंध जगभर जरी पसरलेले असले तरी बाकीचे बहुतेक सर्वजण यूनोच्या न्यू यॉर्कमधील किंवा त्याच्या जवळपासच्या शहरांतील कचेऱ्यांतूनच काम करणारे आहेत. त्यांनी एकापरीनें परकीय भूमीच आपल्याबरोबर येथें आणली आहे असा भास होतो. कारण त्यांच्या पगारावर त्यांना येथें इन्कमटॅक्स भरावा लागत नाहीं. सेक्रेटरी-जनरलनें त्यांना नेमून दिलेलें कामच जोंपर्यंत ते करीत असतील तोंपर्यंत अमेरिकन पोलीस त्यांना पकडू शकत नाहींत.

एकदां यूनोच्या असिस्टंट सेक्रेटरी-जनरल मंडळींची एक बैठक '६१०' येथें बोलाविण्यांत आली. '६१०' म्हणजे '६१० फिफ्थ ॲव्हेन्यू' असा स्पष्ट उल्लेख करावयाला कोणी तरी विसरला. श्री. हू या नांवाच्या अनुभवी चिनी मुत्सद्यानें असा अदमास केला कीं जेथें तेव्हां बरेचसे अधिकारी राहात होते त्या हॉटेलांतल्या ६१० नं. च्या खोलींत ही सभा भरणार असेल. त्याच कल्पनेंत तेथें जाऊन त्यांनी जेव्हां त्या खोलीचें दार ठोठावलें तेव्हां रेशमी पायजमा नेसलेल्या व हातांत सिगारेट असलेल्या एका बाईनेंच तें उघडलें, आणि "आंत या, तुम्हांला पाहून मला फार आनंद झाला आहे," अशा उद्गारांनीं त्यांचें स्वागत केलें.

आपण सिनेमामध्यें पाहातों तसल्या प्रकारासारखा हा काय प्रकार आहे असें त्यांना वाटूं लागलें. विशेषतः संकोचानेंच त्यांनीं जेव्हां त्या खोलींत पाऊल टाकलें आणि ती झोपण्याची खोली आहे असें जेव्हां त्यांना दिसून

आलें तेव्हां तर ते खूपच हतबुद्ध झाले. श्री. हू यांना अमेरिकन लोकांच्या आतिथ्यशीलतेबद्दल आणि त्यांच्या खुल्या दिलाबद्दल फार आदर वाटतो. तरीहि त्यांना या प्रकाराचा चटकन् उलगडा होईना. इतक्यांत त्या बाईनें मळलेल्या कपड्यांचें एक बंडल आणून त्यांच्या हातांत दिलें आणि 'किती लवकर हे कपडे धुवून आणून देऊं शकाल ?' असा त्यांना प्रश्न केला. आतां मात्र त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडला.

मग त्यांनी मुत्सद्देगिरीची त्यांची विद्या उपयोगांत आणली. ते म्हणाले, "बाईसाहेब आपला जरा गैरसमज झालेला दिसतो. तुमच्या देशात बरेचसे चिनी लोक धोबीकाम करणारे आहेत हें खरें, पण चिनी तेवढे सगळेच धोबी असें मात्र समजूं नका. मी चुकून भलत्याच खोलीत आलों आहे असें मला वाटतें"

यूनोच्या सेक्रेटरिएटमध्यें काम करणारांत डोमीनिकन रिपब्लिक, इजिप्त, भारत इत्यादि सर्व जगांतल्या राष्ट्रांतले स्त्रीपुरुष आहेत. हे लोक अतिशय कार्यकुशल व कर्तृत्ववान आहेत. ही जागतिक संघटना आमच्या सान्निध्यांत काम करीत आहे, हा विचार आम्हां अमेरिकनाना आल्हाद देतो यांत कांहीं शंका नाही.

सेक्रेटरिएटमधील ऑफिसर्समध्यें सेक्रेटरी-जनरल यांच्या एक्झिक्यूटिव्ह असिस्टंट पासून तो थेट, 'ऑर्डर ऑफ दि डे-ऑफिसर' पर्यंत सर्वांचा समावेश होतो. श्री. ली हे जें काय केलें गेलें पाहिजे म्हणून ठरवितील तें खरोखर केलें जाईलच असें पाहाणें हें एक्झिक्यूटिव्ह असिस्टंटचें काम आहे. त्याशिवाय ८ असिस्टंट सेक्रेटरी-जनरल आहेत व ते सेक्रेटरिएटच्या ८ निरनिराळ्या खात्यांचे प्रमुख अधिकारी आहेत. 'ऑर्डर ऑफ दि डे-ऑफिसर' हे यूनोच्या छोट्याशा पोलीस दलाचे मुख्य अधिकारी आहेत.

यूनोच्या ८ निरनिराळ्या खात्यांसाठीं ८ निरनिराळ्या असिस्टंट सेक्रेटरी-जनरलांची नेमणूक श्री. ली हेच करतात, पण त्या जागीं नेमण्या-सारखा चांगला मनुष्य मिळण्याकरितां त्यांना पुष्कळदां सौदा जमवून आणावा लागतो. सोव्हिएट युनियननें त्यांना आपल्या सरकारमधून अर्काडी सोबोलेव्ह या नांवाचे एक मोठे कर्तबगार गृहस्थ दिले. त्यांची सुरक्षा-मंडळ खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी-जनरल म्हणून नेमणूक करण्यांत आलेली असून, श्री. ली हे हजर नसतील तेव्हां त्यांचे डेप्युटी म्हणून अर्काडी सोबोलेव्ह यांनींच सुरक्षा-मंडळाच्या कामांत भाग घ्यावयाचा असतो. चीननें परराष्ट्र-विषयक कारभारांतले मि. हू नांवाचे मोठे तज्ज्ञ गृहस्थ श्री. ली यांना दिले. ते वसाहतीसंबंधाच्या खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी-जनरल म्हणून नेमले गेले

आहेत. चिली राष्ट्रानें, एक अनुभवी संपादक व त्यांच्या राष्ट्राचे वकील म्हणून नांव कमावलेले श्री. बेंजामिन कोहेन यांना यूनोकडे सोंपविलें. ते आता यूनोच्या 'पब्लिक इन्फर्मेशन' खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी-जनरल आहेत. तरी पण अगदी वरच्या दर्जाच्या अशा ३–४ जागांसाठी श्री. ली यांनी ज्यांना इंग्लंडमधून व अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतून बोलाविलें होतें ते मात्र येऊं शकले नाहीत. कारण त्यांना त्यांच्या त्यांच्या सरकारांत नोकऱ्या होत्या व त्यांच्या सरकारांनींहि त्यांना मुक्त केलें नाहीं.

कोणत्याहि राष्ट्राचा प्रतिनिधी जेव्हां एखादें महत्वाचें पत्र अथवा तार सुरक्षा-मंडळाकडे पाठवितो तेव्हां स्वत: सेक्रेटरी-जनरल किंवा सुरक्षा-मंडळ खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी-जनरल हे त्या पत्राचें अथवा तारेचें भाषांतर करवितात, त्याच्या नकला करवितात आणि त्या सुरक्षा-मंडळावरील अकरा राष्ट्रांच्या प्रतिनिधीकडे पाठवितात.

आमसभेची, किवा आर्थिक व सामाजिक मंडळाची, किंवा यूनोच्या असल्याच दुसऱ्या एखाद्या शाखेची जेव्हां बैठक भरावयाचें ठरतें तेव्हां त्या बैठकीच्या आधीं कित्येक दिवस किंवा आठवडेहि यूनोच्या सेक्रेटरिएटमधील ऑफिसांत कितीतरी रात्रीपर्यंत दिवे जळत असलेले दिसतात आणि तज्ज्ञ लोक त्यांच्या कागदपत्रांत योग्य जागीं योग्य शद्बप्रयोगच झालेला आहे कीं नाहीं तें पाहातात, त्यांची भाषांतरें करवितात व त्यांचे मिमिओग्राफ काढतात. त्यानंतर जेव्हां बैठकी सुरू असतात तेव्हां प्रत्येक ठरावाचें किंवा योजनेचेंहि भाषांतर करवावें लागतें, त्यांचा मिमिओग्राफ काढवावा लागतो आणि त्या ठरावावर किंवा योजनेवर सभासदांनीं मतें देण्याची वेळ येण्यापूर्वीं तीं सर्वांना वांटलेलीं असावीं लागतात. याचे कागदपत्र कित्येकवेळां ५० पानें भरतील इतके असतात. एकदा तर एका खूप लांब मजकुराच्या कागदावर हे सगळे पूर्व संस्कार करणें सेक्रेटरिएटला शक्य होण्यासाठीं आमसभेला सबंध एक दिवस सुट्टी घ्यावी लागली होती.

या सभामध्ये काम करणारे सर्व दुभाषी व स्टेनोग्राफर्स हे सेक्रेटरिएट-मधील नोकरवर्गाचाच एक भाग असतात.

पुष्कळदा आमसभा किंवा यूनोच्या निरनिराळ्या मंडळांपैकीं एखादें मंडळहि सर्व राष्ट्रांकडे पाठवावयासाठीं एखादी शिफारस करते. त्या शिफारशीचें भाषांतर कोण करतो? पाच निरनिराळ्या मातृभाषांत तो मजकूर कंपोज कोण करतो? छापतो कोण? आणि त्या राष्ट्राच्या सरकारकडे कोण पाठवितो? या सर्व प्रश्नांचें उत्तर एकच आणि तें म्हणजे सेक्रेटरिएट. तें नेहमींच कित्येक हजार प्रती छापतें आणि

आवश्यक त्या त्या लोकांना त्या पाठवून झाल्या म्हणजे उरलेल्या प्रती वृत्तपत्रांकडे, ग्रंथालयांकडे, कॉलेजांकडे, निरनिराळ्या कमिशन्सकडे, तज्ज्ञांच्या सस्थांकडे आणि जे कोणी मागणी करतील त्यांच्याकडे पाठवून देतें.

आमसभेची बैठक चालू असतां, मध्येंच एखादा सभासद उभा राहातो आणि म्हणतो, "पण ही योजना आम्ही मुळीच मान्य करूं शकत नाही. १९०२ सालीं सॅन् राफेल येथें २० राष्ट्रानी ज्या तहावर सह्या केल्या त्याच्याशी ही विरोधी आहे !" पुष्कळशा प्रतिनिधीनीं या तहाचें नांवहि ऐकलेलें नसतें, आणि त्या तहाचा उल्लेख करणाऱ्या सभासदाजवळहि त्याची प्रत नसते. त्यानें १९०२ सालचा तह म्हणून ज्याचा उल्लेख केला तो तह त्या सालचा नसून १९०७ सालचाच होय असेंहि असूं शकतें. त्यामुळें सेक्रेटरिएटमधले कांहीजण ग्रंथसंग्रहालयाकडे धावतात आणि त्या विशिष्ट तहाशी संबंध असलेल्या पुस्तकाचा शोध करूं लागतात. तें सांपडले की त्यांतील आवश्यक मजकुराचें ते भाषातर करतात, मिमिओग्राफने लगेच त्याच्या ५०० प्रती छापून काढतात आणि सगळ्या सरकारांच्या प्रतिनिधीना व त्याच्या सहाय्यकांना, दुसऱ्या दिवशी नीट चर्चा करता येण्यासाठी, रात्री ११॥ वाजण्याच्या आंतच त्या पोंचतील असें करतात.

कित्येक डझन 'रीसर्च वर्कर्स' (सांपडत नसेल तें शोधून काढणें हेंच यांचें काम असल्यामुळें त्यांना हे नांव पडले आहे) म्हणजे निरनिराळ्या प्रकारच्या कामांत अगदी गर्क असलेल्या सेक्रेटरिएटचा एक अगदी छोटासाच भाग होय.

यूनोच्या आमसभेचे किवा दुसऱ्या एखाद्या मंडळाचे सभासद एक बैठक संपवून विश्रांतीसाठी जेव्हां घरी जातात तेव्हा कांही छोटीशीं कामे, त्यांनी सेक्रेटरिएटवर सोंपविलेली असतात. उदाहरणार्थ--"बालगुन्हेगाराना तुम्हीं कोणत्या पद्धतीनें सध्यां वागवितां त्याची सविस्तर माहिती कळवा, आणि त्यांना वागविण्याच्या संबंधी सध्यांच्या पद्धतीत कोणत्या सुधारणा केल्या गेल्या पाहिजेत तेंहि कळवा--अशा अर्थाची एक प्रश्नपत्रिका तयार करून यूनोच्या सगळ्या सभासद-राष्ट्रांकडे पाठवा, आणि त्यांच्याकडून जी उत्तरें येतील त्यांचें वर्गीकरण करून व विषयानुक्रमानें ती लावून, आमच्या पुढच्या बैठकीपूर्वी ती छापवून तयार ठेवा." असें सेक्रेटरिएटला फर्मावलें गेलें असण्याची शक्यता असते.

भाषांतरकार व कारकून यांना एक-एक महिना पुरूं शकतील अशा प्रकारचीं एक-दोन नव्हे तर शेकडों कामें--कोणत्याहि एखाद्या बैठकीनंतर सेक्रेटरिएटच्या माथ्यावर लादली जाण्याचा संभव असतो.



हीं अतिशय कठीण कामें असतात, पण त्यांत एक प्रकारचा आनंदहि असतो. कारण त्या ठरावांतील व प्रश्नावल्यांतील बऱ्याचशा ठरावांमुळेंच व प्रश्नावल्यांमुळेंच पुढें अशी कांहीं तरी प्रत्यक्ष कृती घडते की जीमुळें लक्षावधि कुटुंबांच्या परिस्थितींत चांगला पालट घडून येत असतो.

कोणत्या राष्ट्रानें किती पैसे द्यावे, आणि त्या पैशांचा कसा उपयोग करावा हें एकदां आमसभेनें ठरवून दिलें की मग 'कृपा करून आतांच पैसे द्या', अशीं पत्रें त्या त्या राष्ट्रांना या सेक्रेटरिएटकडूनच जातात, आणि त्याप्रमाणें पैसे आले आहेत कीं नाहीत तेंहि हें सेक्रेटरिएटच पाहातें. यूनोच्या स्थापनेच्या पहिल्याच वर्षी दोन कोटी डॉलर्स जमविण्याचें सेक्रेटरिएटनें आपल्या अंगावर घेतलें होतें. तरी पण यूनोचा कारभार नीट सुरू होण्याच्या दृष्टीनेहि ही रक्कम फार थोडी होती, कारण पगार देणें, जमीनी खरेदी करणें, कांहीं इमारती स्वतः बांधणें आणि कांही इमारतींबद्दल भाडें भरणें वगैरे कामांसाठीं सेक्रेटरिएटमार्फत पैसे खर्च व्हावयाचे असतात.

जुना राष्ट्रसंघ जेव्हां (ता. १८ एप्रिल १९४६) नामशेष झाला तेव्हां त्यानें आपल्या सर्व इमारती (किमत १ कोटी १७ लक्ष डॉलर्स), त्याचा खूपच मोठा व बहुमोल असा ग्रंथसग्रह, त्याच्याजवळचीं इतर साहित्यें व कागदपत्रें यूनोच्या स्वाधीन केली. यूनोच्या सेक्रेटरिएटनेंच आतां त्या सर्वाचें नीट जतन करावयाचें आहे.

यूनोचे सभासद असलेल्या राष्ट्रांनी आपापसांत तह, करार वगैरे कांहीं केल्यास त्या तहाच्या अगर करारांच्या ज्या अधिकृत प्रती यूनोकडे पाठविण्यांत येतात त्यांचा स्वीकार करणें हें सेक्रेटरिएटचेंच काम आहे. यूनोचे सभासद नसलेल्या राष्ट्रांनी जर कोणाशी कसले तह वगैरे केले तर त्यांच्याकडून त्या तहांच्या अगर करारांच्या अधिकृत प्रती मागविण्यांत येतात. सेक्रेटरिएटच या सर्व अधिकृत प्रती अगदीं सुरक्षित अशा जागीं ठेवतें, त्यांचें अनेक भाषात भाषांतर करवितें, आणि जो कोणी मागणी करील त्याला देतां येण्यासाठीं त्या सर्व छापवूनहि घेतें. जुना राष्ट्रसंघहि असेंच करीत असे. एकंदर २६ वर्षांच्या अवधींत त्या जुन्या राष्ट्रसंघाकडे ४,५०० हून जास्त तहांच्या प्रती आल्या होत्या व त्यानें त्या छापवून प्रसिद्ध केल्या होत्या. त्या सर्व त्याने पुढें यूनोच्या हवालीं केल्या. येत्या २६ वर्षांच्या काळातसुद्धां फार नाहीं तरी वरच्या इतकेच तह व करारनामे झालेले आढळतील. प्रत्येक तहाची लांबी तीन ते वीस पृष्ठें इतकी असल्याचें साधारणतः आढळून येतें. त्यामुळें सेक्रेटरिएटच्या छापखान्याला नेहमीच भरपूर काम असतें.

केव्हां केव्हां कांहीं बाबतींत सेक्रेटरिएटनें स्वतःच पुढाकार घेतल्याचेंहि दिसून येतें. एकदां सेक्रेटरिएटचाच एक भाग असलेल्या 'दि सोशल अफेअर्स डिव्हिजन ऑफ स्टडीज ॲण्ड रीसर्च'नें शास्त्रज्ञ लोकांना एकत्र बसून काम करायला लावण्यासाठीं एक प्रचंड योजना लिहून काढली. क्षयरोग, कॅन्सर, किंवा जमीन उफाळणें यांजसारख्यांवर उपाय शोधून काढण्यासाठी, आणि नगररचना व खगोलांचे गुणधर्म यांच्या विशेष अभ्यासासाठी विशेष बुद्धिमान अशा शास्त्रज्ञांना चांगले पगार देऊन जेथें कामावर नेमता येईल अशा खूप मोठ्या संशोधन शाळा यूनोनें उभाराव्या अशी योजनेमध्यें सूचना केलेली होती. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांसाठी एक विचारानें एकत्र काम करणाऱ्या, सबंध जगभरच्या बऱ्याचशा शास्त्रज्ञांनीं ज्या प्रमाणें अणु-बॉबचा शोध लावला, त्याचप्रमाणें युनोसाठींहि जगभरच्या अशाच दुसऱ्या अनेक शास्त्रज्ञांना एकत्र काम करून नवे मोठे शोध लावणें शक्य होऊं शकेल.

यूनोच्या 'सोशल अफेअर्स' खात्याचे असिस्टंट सेक्रेटरी-जनरल उपरिर्निदिष्ट योजना खिशांत घालून आर्थिक व सामाजिक मंडळाकडे

गेले, आमसभेकडे गेले, आणि दुसऱ्याहि कित्येक खास कमिटयांकडे गेले व त्यांच्यापुढें त्यांनीं त्या योजनेचें महत्व सांगितलें. असली उत्साहवर्धक योजना लिहून तयार करण्याचें सेक्रेटरिएटच्या हातांतलें होतें, पण आमसभेने, किंवा एखाद्या मंडळानें, किंवा निदान एखाद्या खास समितीनें तिच्यावर पसंतीचा शिक्का मारून, तिचा अंमल करण्यासाठीं जरूर तेवढया पैशांची सोय केल्याखेरीज तिच्या बाबतींत सेक्रेटरिएटला कांहीच करतां येण्यासारखें नव्हते.

यूनोच्या कोणत्या खात्यामार्फत काय काम चालू आहे तें तुम्हांला समजावयाला पाहिजे असेल तर त्यासंबंधांत तुम्हीं सेक्रेटरिएटने चालविलेल्या माहितीखात्याला लिहूं शकतां. असली माहिती प्रत्येक दिवशी वृत्तपत्रांकडेहि तें खातें पाठवीत असतें.

'जगांतल्या सर्व लोकांशी यूनो बोलत आहे' अशाच शब्दांत या सेक्रेटरिएटनें त्याचें रेडिओवरचें रोजचें वृत्तकथन प्रथम सुरू केलें. जगांतल्या प्रत्येक खंडांत असलेल्या यूनोच्या रेडिओ स्टेशन्सवरून अनेक भाषांतून हे वृत्तकथनाचें कार्य आतां रोज होत असतें.

'पब्लिक इन्फर्मेशन' खात्याच्या 'डिव्हिजन ऑफ रेफरन्स व पब्लिकेशन्स'-तर्फे दर आठवडयाला एक 'न्यूज बुलेटिन', दरवर्षी एक 'इअर बुक' आणि इतर अनेक पुस्तिका प्रसिद्ध होत असतात व त्यांची किंमतहि फार थोडी असते. यूनोच्या कोणत्याहि खात्याशी तुम्हांला पत्रव्यवहार करावयाचा असो – 'बॉक्स नं. १०००, न्यू यॉर्क १, न्यू यॉर्क' हाच त्याचा पत्ता समजावा.

तुम्हांला कांहीहि माहिती हवी असली तर तुम्ही सेक्रेटरी-जनरल यांच्या नांवें पत्र टाका, कीं मग त्यांचे खासगी कारभारी सेक्रेटरिएटमधील जे खातें तुमच्या पत्राचें उत्तर देऊं शकेल त्याच्याकडे तें पत्र पाठवून देतील. पत्र लिहितांना त्याचा आरंभ तुम्हीं पुढें दिल्याप्रमाणें करावा :

सन्मान्य श्री. ट्रिग्वा ली,
सेक्रेटरी-जनरल ऑफ दि युनायटेड नेशन्स,
बॉक्स नं. १०००,
न्यू यॉर्क १, न्यू यॉर्क.

मत्प्रिय सेक्रेटरी-जनरल,

तुम्हांला जर कसली सामान्य माहितीच पाहिजे असेल तर तुम्ही पुढें दिलेल्या खात्याला पत्र लिहावें :

डिव्हिजन ऑफ पब्लिक इन्क्वायरीज,
डिपार्टमेण्ट ऑफ पब्लिक इन्फर्मेशन,

बॉक्स १०००,
न्यू यॉर्क १, न्यू यॉर्क.
सद्‌गृहस्थ हो,
कृपा करून मला कळवा की

किंवा तुम्हीं जर न्यू यॉर्कमध्येंच असाल तर '६१० फिफ्थ ॲव्हेन्यू' येथें डिपार्टमेण्ट ऑफ पब्लिक इन्फर्मेशन याच्या कचेरीत जा. पण तसें करण्यापूर्वी तुम्हीं त्यांना टेलिफोन करावा, तुम्हांला काय माहिती पाहिजे आहे तें त्यास सांगावें आणि कोणाला भेटू म्हणून विचारावें.

यूनोकडे १,५०० टेलिफोन असून ते सारखे कोणाशी ना कोणाशी तरी बोलत असतात, शिवाय रोजच्या रोज हजारों प्रश्नांना उत्तरें देणारा खास 'इन्फर्मेशन ब्यूरो' हि त्यानें चालविला आहे.

तसेंच न्यू यॉर्क येथील यूनोच्या दरबारांतील अमेरिकन शिष्टमंडळाकडे असलेल्या आमच्या प्रतिनिधीला पत्र लिहूनहि तुम्हांला हवी ती माहिती तुम्हीं मिळवू शकाल.

आमसभेची किंवा एखाद्या मंडळाची, कमिटीची, अगर कमिशनची बैठक चालू असतां त्यांचें कामकाज कसें चालतें तें तुम्हांला पाहावयाचें असल्यास तिकिट घेऊन तुम्हांला तेथें जातां येतें. फक्त गुप्त बैठकींना कोणी हजर राहूं शकत नाही. अशी तिकिटें देण्याच्या बाबतींत निरनिराळ्या कमिटयांचे निरनिराळे नियम आहेत. म्हणून आधी टेलिफोन करा, कोणत्या मंडळांची बैठक होणार आहे तें विचारा आणि तुम्हांला कसा आंत प्रवेश मिळेल तें विचारून घ्या. आमसभेच्या बैठकीला हजर राहाण्याची तुम्हांला इच्छा असेल तर फ्लशिंग येथील पास ऑफिसकडे जा. कसल्या मंडळांच्या बैठकी पहावयाच्या असतील तर लेक सक्सेस येथील पास ऑफिसांत जा. आपल्या हाताखालच्या सबंध वर्गालाच या बैठकी दाखविण्यासाठी घेऊन येणाऱ्या शिक्षकांनी लेक सक्सेस येथील 'एज्युकेशनल सर्व्हिसेस सेक्शन'कडे चौकशी करावी. हीं तिकिटें विनामूल्य मिळत असतात.

यूनो संघटनेच्या सभा-बैठकी पहाण्याचा तुम्हांला पूर्ण अधिकार आहे. यूनो संघटना म्हणजे काय आहे आणि ती काय करीत आहे हें जगांतील सर्व भागांतल्या लोकांनी समजून घेणें अत्यंत महत्वाचें आहे हें सेक्रेटरिएटमध्यें कामास असलेल्या सर्व पुरुषांना व स्त्रियांना कळतें. यूनो ही तुमची व माझी असल्यामुळे तिच्याबद्दलचें पूर्ण ज्ञान असणे हा तुमचा हक्कच आहे. यूनो म्हणजे 'ते' नव्हेत, 'आपण.' तिच्या निरनिराळ्या शाखा आज किंवा उद्यां जें कांही ठरवितील तें तुमच्याच विद्याभ्यासावर, आरोग्यावर, तुमच्या

जमाखर्चावर आणि सौख्यावर परिणाम करणार आहे. कदाचित् एखाद्या बाँबपासून किंवा युद्धामुळें निर्माण होणाऱ्या दुष्काळापासून ती तुमचें संरक्षण करील, कदाचित् तसें करण्यासहि ती चुकेल. तिनें जें काय करावें असें तुम्हांला वाटतें तें तुम्हीं तिच्या अधिकाऱ्यांना व प्रतिनिधींना कळविणें हें तुमचें कर्तव्यच आहे.

# प्रकरण ९ वें

## शांततामय उपाययोजना

बोलीव्हिया अर्जेंटिनाकडून गहूं खरेदी करतें, आणि अर्जेंटिना बोलीव्हियाकडून टिन विकत घेत असतें. नंतर बोलीव्हिया अशा दुसऱ्या अेखाद्या राष्ट्रांशीं सौदा ठरवितें की जेणेंकरून तें बोलीव्हियाकडचें सगळेंच्या सगळें टिन विकत घेअील, आणि अर्जेंटिनाला कांहींच शिल्लक अुरणार नाही. मग अर्जेंटिनाला राग येतो आणि तें म्हणतें, 'तुम्ही जर आम्हांला टिन देणार नाही तर, आम्ही तुम्हांला मुळींच गहूं देणार नाही'. पण बोलीव्हियांत गहूं मुळीच पिकत नसल्यामुळें त्याला गव्हाची अतिशय जरुरी असते. बोलीव्हियाहि अर्जेंटिनावर गरम होतें, आणि म्हणतें, 'तुम्हीं जर आम्हाला गहूं देणार नाही तर आम्हीं तुम्हांला रबर देणार नाहीं'. पण अर्जेंटिनाला रबरहि हवाच असतो. म्हणून तें आणखी जास्त संतापतें, आणि म्हणते, 'तर मग आम्ही तुम्हांला बीफही (मांस) देणार नाहीं जा.' पण बोलीव्हियाचें बीफशिवाय चालण्यासारखें नसतें. त्यामुळें हें भांडण आणखी वाढत जातें.

या दोन्ही राष्ट्रांपैकी कोणतेंहि एक जर आधीं केलेल्या एखाद्या तहाचा भंग करील तर दुसरे राष्ट्र हा वाद आंतरराष्ट्रीय कोर्टाकडे नेऊं शकतें.

पण, आपण ज्या चक्रांत सांपडलों आहोंत त्यांतून सुटण्यासाठी आपण दुसऱ्या राष्ट्राना आपली अडचण सांगितली पाहिजे आणि त्यांची मदत घेतली पाहिजे असें जर त्यांना वाटलें तर त्यांतलें कोणी तरी एक राष्ट्र यूनोच्या आर्थिक व सामाजिक मंडळाकडे आपली तक्रार नेते. तेव्हां असें होतें की निरनिराळी सात किंवा आठ राष्ट्रें असल्याच अडचणींत आहेत, आणि कांही तरी निश्चित योजनेचीच त्यांना गरज आहे असें या मंडळाला आढळून येतें. मग तें मंडळ एक योजना लिहून काढतें आणि ती त्या सात किंवा आठ राष्ट्रांकडे पाठवावयाचा ठराव करतें. त्यांनीं जर ती योजना मान्य केली तर ती लगेच एकमेकांकडून गहूं व टिन आणि रबर व बीफ विकत घ्यायला सुरवात करूं शकतात.

पण समजा की यांतल्या एखाद्या राष्ट्रानें सुचतील ते ते सगळे शांततामय-उपाय करून पाहिले, आणि तरीहि त्यांचा कांहीं उपयोग होत नाही असें

त्यांच्या अनुभवास आले, किंवा त्यांचा परिणाम फारच मंद गतीनें होतो आहे आणि त्याला तर जास्त धीर धरवत नाहीं अशी स्थिति असली तर ? तर तें अत्यंत सामर्थ्यवान अशा सुरक्षा-मंडळाकडे एक लांबलचक तार पाठवून आपली तक्रार त्याला कळवितें. किंवा आपली बाजू सुरक्षा-मंडळाकडे प्रत्यक्ष मांडण्यासाठी, भरपूर कागदोपत्री पुरावा आणि कसलेले सल्लागार व दुभाषी मंडळी बरोबर देऊन तें आपल्या एखाद्या तडफदार अधिकाऱ्यालाहि तिकडे पाठवू शकतें.

तेथें सुरक्षा-मंडळ त्याचें काय म्हणणें आहे तें ऐकून घेईल आणि त्याला प्रश्नहि विचारील. यूनो सनदेच्या ३५ व्या कलमानें प्रत्येक राष्ट्राला— मग तें यूनोचा सभासद असो अगर नसो—त्याचा कोणाबरोबर वाद उत्पन्न झाला असल्यास तो सुरक्षा-मंडळाला कळविण्याचा अधिकार दिलेला आहे. (ज्यानें यूनोच्या सनदेवर सही केलेली नाही अशा एखाद्या राष्ट्राला जर कधीं सुरक्षा-मंडळानें आपली तक्रार ऐकून घ्यावी असें वाटलें तर मी माझें भांडण शांततामय मार्गानींच मिटवीन, त्याच्यासाठीं शस्त्रबलाचा उपयोग करणार नाही, असें आधी स्पष्ट वचन द्यावें लागतें.)

यूनोचा सभासद असलेलें कोणतेंहि राष्ट्र कोणतीहि तक्रार सुरक्षा-मंडळाकडे आणू शकतें. केव्हां केव्हां तर भांडणांत स्वतःचा कांहींच फायदातोटा नाही अशीहि भांडणें, कोणी तरी ती सुरक्षा-मंडळाकडे नेणें भाग आहे एवढ्याचसाठी कांही राष्ट्रांनी त्याच्याकडे आणलेलीं असतात.

कोठें कांही धोका उत्पन्न होण्याची शक्यता निर्माण झाल्याचें सुरक्षा-मंडळाला समजलें तर असल्या विशिष्ट प्रकारच्या धोक्यांबद्दल ज्याना माहिती आहे अशा माणसांची तें एक कमिटी नेमतें व तिला त्या जागी चौकशी करायला पाठवितें.

स्पेनमधल्या फॅसिस्ट फ्रॅंको सरकारबद्दल कोणते धोरण स्वीकारावें याबद्दल सुरक्षा-मंडळाच्या सभासदांत जेव्हां एकमत होईना तेव्हां, चौकशी करून अहवाल सादर करण्यासाठीं त्यानी एक कमिटी नेमून टाकली. ती कमिटी न्यू यॉर्क सोडून गेली नाही. यूनोचे सभासद असलेल्या अशा सर्व राष्ट्रांच्या सरकारांकडून किंवा इतर कोणी माहिती पाठविल्यास तिचा कमिटी स्वीकार करील असें तिनें फक्त जाहीर केलें.

ताबडतोब तिच्याकडे कागदपत्रांच्या राशी येऊन पडूं लागल्या. अमेरिकेच्या स्टेट डिपार्टमेंटनें त्यांच्याजवळील गुप्त कागदपत्रांतील माहिती, आणि फ्रॅंकोची हिटलरला गेलेलीं जीं महत्वाचीं पत्रें पुढें जर्मनींत

पकडलीं गेलीं त्यांच्या नकला या कमिटीकडे पाठविल्या. स्पॅनिश रिपब्लिकन पक्षवाल्या ज्या लोकांना स्पेनमधून निर्वासित होऊन बाहेर पडावें लागलें आहे त्यांचा पुढारी न्यू यॉर्कला आला आणि बऱ्याच वेळां त्यानें कमिटीपुढें आपलें गाऱ्हाणें सांगितलें. पण जें कमिटीला माहीत नव्हते असें नवें कांहीं मात्र तो तिला मुळींच सांगू शकला नाही. फ्रॅंकोनें या कमिटीकडे कांहीच माहिती पाठविली नाही, निदान खुद्द त्याच्याकडून तरी कांहीच कळविलें गेलें नाही. पण कमिटीकडे आलेल्या ज्या कोणत्या बातम्यांचा कमिटी विचार करते आहे असें जाहीर झालें त्या खोटयाच आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न करणारी फ्रॅंको सरकारची निवेदनें मात्र स्पेनमधल्या सरकारनियंत्रित वृत्तपत्रांमध्यें बरीच येत असत. कमिटीचे सभासद तीं निवेदनेंहि वाचीत आणि फ्रॅंकोच्या सरकारचें काय म्हणणें आहे तें समजून घेत.

शेवटी कमिटीनें आपला अहवाल लिहून काढला आणि सुरक्षा-मंडळाला सादर केला. तिनें स्पेनमध्यें काय वस्तुस्थिति आहे तेंच तेवढें या अहवालांत लिहिलें असें नाही तर सुरक्षा-मंडळानें जें काय करावें असें तिला वाटलें त्याबद्दलहि तिनें शिफारस केली. या अहवालांत ग्रथित केलेल्या वस्तुस्थिति-निदर्शक गोष्टींचा सुरक्षा-मंडळानें नीट विचार केला पण त्या संबंधांत कमिटीनें केलेली शिफारस मात्र त्यानें मान्य केली नाही. तेवढयानेंच भागलें नाहीं, बऱ्याचशा चर्चेनंतर त्या मंडळानें स्वतःची अशी एक शिफारस लिहून काढली.

दोन राष्ट्रें एकमेकांवर त्यांच्या तोफा रोखीपर्यंत सुरक्षा-मंडळानें वाट पहावी लागत नाही. ज्यायोगें राष्ट्रांराष्ट्रांत युद्ध सुरू होण्याचा संभव निर्माण होईल असें कोठें खुट् झालेलें जरी ऐकलें तरी सुद्धां सुरक्षा-मंडळ आपल्या कामास लागतें.

समजा, एखाद्या मुसलमानी देशांत बाहेरचे बरेचसे ख्रिश्चन आले आणि त्यांनीं तेलखाणीसाठीं डेरिक्स बांधायला सुरवात केली म्हणून तेथले मुसलमान लोक भडकले आहेत. तेथल्या मुसलमान सरकारनें त्यांना शांत करण्याचा कांहींच उपाय केला नाही. मुसलमान लोकांनीं खूप मोठमोठ्या मिरवणुकी काढल्या आणि त्यांच्या देशातलें तेल नेणाऱ्या परकीयांविरुद्ध निदर्शनें केलीं. त्यानंतर ते लोक मोठमोठ्या राजकीय सभांना गेले, आणि तेथें भाषणें करणाऱ्या वक्त्यांनीं, 'जर यापुढें आणखी ख्रिश्चन लोक आमच्या देशांत आले तर आम्हीं त्यांना गोळ्या घालू,' असे उद्गार काढले, तरीहि तेथल्या सरकारनें कांहींच उपाययोजना केली नाही.




या अवस्थेला परिस्थिति म्हणतात.

हे कांहीं दोन राष्ट्रांमधलें भांडण नव्हे. सध्यां तरी नाही हें खरें आहे. पण आणखी एक-दोन दिवसांतच दोन राष्ट्रांच्या भांडणाचें त्याला स्वरूप येणें शक्य आहे. त्या परदेशी इंजीनियरांपैकीं खरोखरच एक-दोघे जण मारले गेले अशी आपण कल्पना करूं या. तर काय होईल? त्या मारल्या गेलेल्या इंजीनियरांचें राष्ट्र त्या मुसलमानांच्या सरकारला म्हणेल, 'हा गोळीबाराचा प्रकार न घडू देण्यासाठीं कांहीच कां केले नाही? असे कांही घडेल हे तुम्हांला माहीत होतें, तरी तुम्हीं स्वस्थ बसलां आणि कांही उपाय केला नाहीत. आम्हांला न्याय पाहिजे. तुम्हीं आम्हांला २० लाख डॉलर्स द्या, नाहीतर आम्ही सैन्य पाठवूं आणि या अत्याचाराचा मोबदला म्हणून तुमचा अर्धा मुलुख काबीज करूं'.

यावरून परिस्थिति केव्हां केव्हां कसें भयंकर स्वरूप धारण करूं शकते तें तुमच्या ध्यानांत येईल.

आम्हांला पसंत असतील त्या शांततामय मार्गांनी (सनद कलम ३३) आम्हीं आमचे वाद मिटविण्याचा प्रयत्न करूं, असें जरी राष्ट्रांनी वचन दिलेलें असलें तरी कित्येकदां प्रत्यक्ष तसें करण्याचा त्यांचा विचार नसतो. केव्हां केव्हां एखाद्या सरकारमधल्या मुत्सद्यांना वाटतें की, आपल्या शेजाऱ्या-बरोबरचें आपलें भांडण आपण आतां इतक्यांतच मिटवूं नये, कारण तें आतांच मिटविण्यापासून आपला तसा कांही विशेष फायदा होणार नाहीं. तें आणखी चिघळेपर्यंत आपण वाट पाहूं या. जमल्यास तें चिघळायला

मदत करतां आली तर तीहि आपण करूं या. तें फारच चिघळलें तर आपले लोक आपल्या या शेजाऱ्यावर इतके उखडतील कीं आपण आपल्या लोकांना युद्धास प्रवृत्त करूं शकू आणि आपल्या शेजाऱ्याचा सगळाच्या सगळा मुलूख जिंकू शकू. मुत्सदी लोकांच्या मनांत पुष्कळदां असले विचार आलेले आहेत. भांडणाऱ्या दोन पक्षांना तुम्हीं आपले भांडण मिटवा असें सुरक्षा-मंडळ सांगू शकेल, असें यूनो-सनदेच्या ३३ व्या कलमांत म्हटलेलें आहे. 'तुमचें भांडण जुंपणार आहे. सावध व्हा. तें टाळण्यासाठीं कांहीं तरी करा,' असेंहि सुरक्षा-मंडळ राष्ट्रांना सांगू शकतें.

यूनोचे सभासद नसलेल्या अशा दोन राष्ट्रांचें जरी भांडण जुपलें असलें तरी त्यांनाहि 'तुमचें भांडण मिटवा' असें सुरक्षा-मंडळ सांगू शकतें. कारण यूनो ही एक जागतिक संघटना आहे, आणि तिच्या सनदेचें कलम २, परिच्छेद ६ याच्या आधारें--यूनोंत सामील झालेल्या राष्ट्रांवर सुरक्षा-मंडळाचा जेवढा अधिकार चालतो तेवढाच तिच्यांत सामील न झालेल्या राष्ट्रांवरहि चालतो.

शांततेचें, मैत्रीचें निदर्शन असें लिली पुष्प एका हातांत पुढें धरून, आणि पाठीमागें धरलेल्या दुसऱ्या हातांत एक जडसा दंडुका घेऊन सुरक्षा-मंडळ भांडणाऱ्या दोन राष्ट्रांजवळ जातें आणि गोड भाषेंत म्हणतें, 'आपण सर्वच जण मित्र आहोंत – नाहीं का ? मग तुम्हीं आपलें हें भांडण कोणत्या तरी मित्रत्वाच्या मार्गानें मिटवा. तसें न कराल तर '



दोन राष्ट्रांनीं मित्रत्वाच्या नात्यानें आपलें भांडण कसें मिटवावयाचें

त्याच्या मार्गाची ३३ व्या कलमांत एक लांबलचक यादी दिलेली आहे.

वाटाघाटींनीं—– म्हणजे आपसांत चर्चा करून.

चौकशीद्वारा—–जेथें प्रत्यक्ष गडबड उत्पन्न झाली असेल त्या जागीं आपली माणसें पाठवावीं आणि खरोखर काय घडत आहे तें पाहावें असें दोघांपैकीं प्रत्येकाला वाटेल.

मध्यस्थीने—–भांडणारीं दोन राष्ट्रें तिसऱ्या एखाद्या राष्ट्रानें त्यांच्या वादाचा निर्णय द्यावा असें कबूल करतात.

तडजोडीनें—–पुन: मैत्रीचे संबंध प्रस्थापित होण्यासाठीं एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रांसाठीं आपलें असें कांहीं सोडावयाला तयार होतें.

लवादामार्फत—–पॅराग्वे व बोलीव्हिया यांनी तीन वर्षेपर्यंत चॅको वॉर नांवाचें युद्ध लढल्यानंतर शेवटीं ६ जणांच्या लवादमंडळानें त्यांचा वाद तोडण्याला संमति दिली. हे सहाजण म्हणजे अमेरिकेंतील सहा लोकसत्ताक राज्यांचे अध्यक्ष. फ्रँकलिन डी. रूझवेल्ट हे एक त्यांत होते. या सहाजणांनीं वादाच्या मुद्यांचा खोल अभ्यास केला आणि शेवटीं तो मिटविला. चॅको लँड नांवांच्या मुलखांतला बराचसा भाग त्यांनी पॅराग्वेला दिला पण एका नदीकडे जातां येण्यासाठीं बोलीव्हियाला त्यांनीं मार्गहि काढून दिला. बोलीव्हियाला खरोखर जें काय पाहिजे होतें तें हेंच. लवादाचा हा निकाल १९३५ साली दोन्हीं राष्ट्रांनी मान्य केला. त्यानंतर त्यांजमध्यें पुन: केव्हां युद्ध झालें नाही.

न्यायालयीन मार्गानें मिटविणें—–म्हणजे आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे नेऊन, किंवा छोटीं छोटीं अशीं जीं अनेक आंतरराष्ट्रीय न्यायालयें आहेत त्यांजकडे नेऊन (उदाहरणार्थ, अमेरिका व कॅनडा यांजमध्यें केव्हां मतभेद झाला तर तो मिटविण्यासाठीं त्या दोघांचेंच असें एक खास न्यायालय आहे).

प्रादेशिक व्यवस्थांच्या द्वारा—–उत्तर किंवा दक्षिण अमेरिकेंतील कोणत्याहि राष्ट्रानें उपद्रव देण्यास सुरवात केली तर बाकीच्या राष्ट्रांनीं ताबडतोब एकमेकांचा सल्ला घ्यावा असें १९४५ सालच्या मार्च महिन्यांत मेक्सिको सिटीमध्यें एका करारावर सह्या करणाऱ्या २१ राष्ट्रांनीं कबूल केलें. हा करार ॲक्ट ऑफ चापुलटेपेक या नांवानें प्रसिद्ध आहे. आतां एखाद्या राष्ट्रानें उपद्रव देण्यास सुरवात करतांच तीं एकमेकांना तारा करतील किंवा टेलिफोननें संदेश पाठवितील किंवा प्रत्यक्ष चर्चा करण्यासाठीं एखाद्या ठिकाणीं बैठक भरविण्याचें ठरवून तिच्यासाठीं आपले प्रतिनिधीहि पाठवितील. हे प्रतिनिधी प्रत्यक्ष काय करतील तें कोणत्या बाबतींत त्यांचें एकमत होतें त्यावर अवलंबून राहील. त्यांचें एकमत झाल्यास ते कांहीं

करूं शकतील, फक्त जें काय करावयाचें ते ठरवितील तें शांततामय असलें म्हणजे झालें.

आणि जर वर दिलेले हे मार्गहि पुरेसे नाहींत असें वाटलें तर किंवा त्यांना पसंत अशा अन्य शांततामय उपायांनीं असा आणखी एक मार्ग कलम ३३ मध्यें सांगितलेला आहे.

जेव्हां भांडणाऱ्या दोन राष्ट्रांचें भांडण कसें मिटवावयाचें त्याच्या मार्गाबद्दलच एकमत होत नाहीं, तेव्हां एक राष्ट्र म्हणतें, 'हा प्रश्न आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडेच नेला पाहिजे'. दुसरें राष्ट्र म्हणतें, 'छट. हें भांडण मिटविण्यासाठीं ६ निरनिराळया राष्ट्रांच्या अध्यक्षांचें लवादमंडळच आपण नेमूं या'.

ज्या भांडणामुळें किंवा ज्या परिस्थितिमुळें युद्ध उद्‌भवेल अशी शक्यता असते तें भांडण किंवा ती परिस्थिति मिटविण्याच्या अनेक शांततामय मार्गापैकीं कोणता मार्ग भांडणाऱ्या राष्ट्रांनी स्वीकारावा तें सुरक्षा-मंडळ ठरवूं शकतें. आपण वर ज्या शांततामय मार्गांची चर्चा केली त्यांतल्या कोणत्याहि मार्गाची सुरक्षा-मंडळ निवड करील.

पण तुम्हीं हाच मार्ग स्वीकारला पाहिजे, असें तें म्हणूं शकणार नाहीं. तें फक्त त्या मार्गाची शिफारस करूं शकेल. पण त्याचबरोबर तें पुढें दिली आहे तशा प्रकारें त्यांना सौम्य शब्दांत ताकीदहि देऊं शकेल. या पद्धतीनेंच तुम्हीं आपला वाद मिटवावा हें बरें. कारण तो फार चिघळेपर्यंत जर वाट पहात बसाल तर मग पुढें आम्हांला स्वतःलाच त्यांत लक्ष घालावें लागेल व तुमच्या-ऐवजीं आम्हांला त्याचा निकाल ठरवावा लागेल. मग तुम्हांला वाईट वाटेल.

जा, तुमचें भांडण मिटवून देण्यासारख्या कोणाचा तरी शोध करा, असें सांगून सांगून सुरक्षा-मंडळ दमलें... तर इकडे या बघूं, आम्ही तुमचा वाद मिटवून देतो, असेंहि तें म्हणूं शकतें. त्यानें एकदां तसें करावयाचें ठरविलें कीं मग तें सगळ्या कारणांचा अभ्यास करतें, साक्षीदार बोलावूं शकतें, दोन्हीं बाजूंचें म्हणणें ऐकून घेऊं शकतें. 'अ' नांवाच्या राष्ट्रानें 'ब' नांवाच्या राष्ट्राला १० लक्ष डॉलर्स द्यावेत, किंवा अमुक एका राष्ट्रानें तें सध्यां पत्र्याच्या डब्यांवर जी जकात आकारित आहे त्याच्या निम्मेच आकारावी अशा किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या शिफारशी तें करूं शकतें. वर निर्देश केला तशा प्रकारें वागण्याची तें कोणा राष्ट्रावर सक्ती करूं शकत नाहीं, पण तें तशी शिफारस मात्र करूं शकतेंच.

दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर भांडणाऱ्या दोन राष्ट्रांनीं त्यांचा वाद मिटवावा म्हणून त्यांना आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे पाठविण्याऐवजीं किंवा

एखाद्या लवादमंडळापुढें उभे राहा म्हणण्याऐवजीं, सुरक्षा-मंडळ स्वतःच त्यांचें भांडण तोडणारें न्यायालय बनण्याचें ठरवूं शकतें.

एखाद्या वेळीं एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला स्वतःच असें सुचवूं शकेल, आपला वाद ऐकून घेण्याची व त्यावर तोडगा सुचविण्याची आपण सुरक्षा-मंडळालाच विनंति करूं या.

एखाद्या वेळीं तें दुसरें राष्ट्र हें आव्हान स्वीकारीलहि.

कांहीं हरकत नाहीं. आपण सुरक्षा-मंडळाकडेच जाऊं या. बराच वेळ आपण इतर उपाय योजले; ते यशस्वी झाले नाहीत.

या दुसऱ्या उपायांनी भांडण न मिटण्याचें कारण, त्या दोन राष्ट्रांत पूर्वी झालेला कोठला तरी एखादा जुना तह्च होय, असेंहि कित्येकदां आढळून येतें. तसें असलें तर मग हा वाद बहुधा आमसभेपर्यंत जातो.

उदाहरणार्थ एकदां एक मनुष्य दक्षिण अमेरिकेंतील एका राष्ट्राचा डिक्टेटर झाला आणि त्याला जें हवें असेल तेंच करण्याची प्रत्येकावर तो सक्ती करूं लागला. त्यानें इंग्लंडशी एक तह केला. त्याच्या देशांतील सगळें तेल इंग्लंडनें विकत घ्यावें असें त्या करारामुळें ठरलें. नंतर त्यानें त्याच्या देशांतील सर्व तेल अगदीं स्वल्प भावांत विकलें. कारण प्रत्येक गॅलनमागें एक टक्का प्रमाणें व्यक्तिशः त्यालाच लांच देण्याबद्दल एका इंग्लिश कंपनीशीं त्यानें गुप्तपणें करार केला होता. ही त्याला जी लांच द्यावयाची तिचा मुख्य तहांत उल्लेख नव्हता पण कंपनी मात्र दरवर्षी त्याला ती देतच असे. लवकरच जगांतल्या अति श्रीमंत माणसांत त्याची गणना होऊं लागली.

त्यानंतर पुष्कळ वर्षांनी त्या डिक्टेटरच्या राष्ट्रांतील लोकांनीं त्याला देशाबाहेर हांकलले आणि लोकमतानुवर्ती सरकारची निवड केली. आपल्या देशानें आपल्याकडचें सर्व तेल अगदीच स्वल्प किंमतींत इंग्लंडलाच विकलें पाहिजे असें कबूल करणारा तह आपल्या देशानें इंग्लंडशी केलेला आहे असें जेव्हां त्या देशाच्या नव्या अध्यक्षाला आढळून आलें तेव्हां त्याला भयंकरच आश्चर्य वाटलें. पण तो काय करूं शकणार? तह म्हणजे तह. आंतरराष्ट्रीय कायदाच तो. त्याला मान दिलाच पाहिजे. पण तो जर वाईट, अपायकारक तह असेल तर ?

तर अशा वेळीं तें राष्ट्र आमसभेकडे तक्रार करूं शकतें. कारण तिच्याकडे एक महत्वाचें असें सामाजिक कार्य सोंपविलेले आहे. कोण्या राष्ट्रांतला एखादा तह अन्याय्य आहे आणि त्यामुळें कोण्या राष्ट्रांतले मैत्रीचे संबंध बिघडण्याचा संभव आहे असें तिला वाटलें तर तो तह बदलून टाका

अशी शिफारस करण्याचा सनदेच्या १४ व्या कलमानें तिला अधिकार दिलेला आहे.

न्यायासाठीं तो तह बदलून टाका अशी जर का आमसभेनें शिफारस केली तर तें छोटें राष्ट्र मोठ्या राष्ट्राला संदेश पाठवितें आणि तहांत फेरफार करावयाला संमति द्या असें सांगतें. त्याप्रमाणें करण्यास मोठें राष्ट्र नैतिक दृष्टचा बांधलेलें आहे.

पण केव्हां असेंहि होतें कीं हा तह बदलला गेलाच पाहिजे, नाहींतर, आम्हीं लढाई करूं, असें एखादें राष्ट्र म्हणूं लागतें. लढाया होऊं न देणें हें सुरक्षा-मंडळाचें कार्य आहे. त्यामुळें तें त्या तहविषयक भांडणाचा अभ्यास करतें, आणि तो तह बदलला गेला पाहिजे अशी शिफारस करूं शकतें.

मागें १९३० सालीं जर्मनींत जेव्हां लोकशाहीवादी सरकार होतें तेव्हां, व्हर्सायच्या तहानें जर्मनीची गळचेपी होत आहे, तो तह बदलला गेला पाहिजे असें पुष्कळ जर्मन्स म्हणत होते. इंग्लंडमधल्या व अमेरिकेमधल्या कांहीं लोकांनाहि तसेंच वाटत होतें. पण त्या बाबतींत कांहींच करण्यांत आलें नाहीं, आणि मग जर्मन लोक इतके संतापले कीं, जेव्हां हिटलरनें मी व्हर्सायचा तह तुम्हाला बदलून दाखवितों, असें त्यांना सांगितलें तेव्हां त्यांनीं त्याला व त्याच्या नाझी लोकांना जर्मनीचा कारभार बहाल केला, आणि त्यांना युद्धाची तयारी करूं दिली.

तेव्हां सुरक्षा-मंडळ अस्तित्वांत असतें व अमेरिका त्याचा सभासद असती आणि तो तह बदलला गेला पाहिजे अशी सुरक्षा-मंडळानें शिफारस केली असती तर कदाचित दुसरें महायुद्ध टळलें असतें.

## प्रकरण १०

# सैन्यबलाचा उपयोग करण्यापूर्वींच्या पायऱ्या

एथिओपिया आपल्या घशांत घालायचाच, असें इटलीचा हुकूमशहा मुसोलिनी यानें ठरविलें. त्यानें इटालियन सैन्याला फक्त युद्धाच्या तयारीत ठेवलें आणि वृत्तपत्रांतून मात्र एथिओपियावरच्या जोरदार (शाद्बिक) हल्ल्यांचीं वर्णनें प्रसिद्ध होतील अशी व्यवस्था केली. पण त्यानंतर १९३४ सालच्या डिसेंबरांत एथिओपियाचे व इटालीचे सैनिक यांमध्यें, एथिओपिया व सोमाली लॅंड नांवाची इटालीची एक वसाहत यांच्यामधील सरहद्दीवर खरोखरच लढाई जुंपली. यांत कोणाचा गुन्हा आहे तें ठरविण्यासाठीं राष्ट्रसंघानें कांहीं न्यायाधीशांची नेमणूक केली, पण त्या न्यायाधीशांनीं केव्हांच कांहींच निर्णय दिला नाहीं. एथिओपियनांनींच इटालियनांवर हल्ला केला, अशी मुसोलिनीनें ओरड सुरू केली.

याच सबबीवर त्यानें सैन्य, रणगाडे, तोफा, बॉंब, विमानें व विषारी वायु यांनीं भरलेल्या बऱ्याचशा बोटी रवाना केल्या. या बोटी जेव्हां सुवेझच्या कालव्यांतून गेल्या तेव्हां, तो कालवा ब्रिटिशांचा असल्यामुळें त्या बोटींत काय भरलेलें आहे त्याचा आधीं ब्रिटिश अधिकाऱ्यांना पत्ता लागला, आणि मग वृत्तपत्रांनीं तें सर्व जगाला सांगितलें. त्याच इटालियन फौजांनी एथिओपियावर स्वारी केली.

इतकें झालें तेव्हां कुठें राष्ट्रसंघानें कांहीं हालचाल सुरू केली. पण वेळ निघून गेलेली होती. मुसोलिनीच्या सैन्याची मुसंडी चालूच राहिली आणि त्यानें सबंध एथिओपिया काबीज केला.

जोपर्यंत प्रत्यक्ष लढाई चालू झालेली नाहीं तोपर्यंत कांहीं करण्याचा राष्ट्रसंघाला अधिकारच नव्हता, आणि जो कांही होता तो सुद्धां कांहीं विशिष्ट प्रकारच्या युद्धांपुरताच होता. एखाद्या राष्ट्रानें खरोखरच लढाई —म्हणजे गोळीबार, कापाकापी, बॉंबफेक वगैरे—सुरूं केल्याखेरीज राष्ट्रसंघाला कांहीं करतां येत नसे.

अशा तऱ्हेचा कांहीं प्रकार पुनः घडण्यास जर सुरवात झाली तर वेळ निघून जाईपर्यंत थांबण्याची सुरक्षा-मंडळावर पाळी येणार नाहीं. त्यावेळीं जर सुरक्षा-मंडळ असतें तर, मुसोलिनीनें त्याचें सैन्य सज्ज केल्याबरोबर

आणि वृत्तपत्रद्वारा एथिओपियाबद्दल अपमानकारक लिखाण प्रसिद्ध करण्यास सुरवात केल्याबरोबर, त्यानें हालचाल सुरू केली असती. हा शांततेला धोका आहे, असें सुरक्षा-मंडळानें ठरविलें असतें. तो खरोखरच शांततेला धोका होता हें आपणाला आतां माहीत आहेच.

एथिओपिया आम्हांला दम देत आहे असें मुसोलिनी म्हणत असे. हें त्याचें म्हणणें अगदीं बाष्कळपणाचें होतें हें आपल्याला समजतें. पण प्रत्येक भांडणाचे वेळीं एक बाजू दुसऱ्या बाजूचा अपराध आहे असेंच म्हणत असते. पण त्या दोन बाजूंपैकीं खरोखर कोणती एक बाजू अपराधी आहे कीं दोन्हीं बाजूंचा अपराध आहे तें सुरक्षा-मंडळ ठरवीत असतें.

मनांत आणलें तर ताबडतोब कांहींही करण्याचा सुरक्षा-मंडळाला अधिकार आहे. शांततेला धोका देणारें पहिलें चिन्ह दिसतांच, तें पोलीस अधिकाऱ्याची आपली टोपी डोक्यावर चढवितें, शांततेचें द्योतक असलेलें लिली पुष्प तें एका कोपऱ्यांत फेंकून देतें, सगळ्यांना स्पष्ट दिसेल अशा रीतीनें टेबलावर आपला दंडुका ठेवतें, आणि अस्तन्या सारावयाला सुरवात करतें.

सुरक्षा-मंडळाला त्याचा शांतिपाठ बंद ठेवणें भाग पडेल अशा आणखीहि दोन घटना असतात.

१९३४ सालच्या डिसेंबरमध्यें एथिओपिया व इटालियन सोमालीलँड यांच्या सरहद्दीवर जेव्हां ती लढाई झाली, तेव्हां सुरक्षा-मंडळ जर अस्तित्वांत असतें, तर त्या लढाईमुळें शांतताभंग झाला कीं काय तें त्यानें ठरविलें असतें. ज्यामुळें शांतता भंग पावते अशा कोणत्याहि कृत्याला शांतता-भंगाचें कृत्य असें म्हणतात, आणि ती लढाई म्हणजे शांतताभंगाचेंच कृत्य होतें हें निश्चितच.

त्यानंतर अखेरीस, अिटालियन सैन्य जेव्हां सुवेझ कालव्यामधून एथिओपियाकडे गेलें तेव्हां, हें आक्रमणाचें कृत्य झालें कीं नाहीं तेंहि सुरक्षा-मंडळाला ठरवावें लागलें असतें. अर्थात तें तसें होतेंच.

आक्रमण म्हणजे भांडणाचा आरंभ असें शद्बकोशांत सांगितलेलें आहे, आणि तें दोन निरनिराळ्या प्रकारें करतां येतें. आधीं आपल्यावर हल्ला झालेला असल्याशिवाय किंवा आपणच हल्ला करावा असें आधीं कांहीं कारण झालेलें असल्याशिवाय जर कोणा एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर हल्ला केला तर त्याला आक्रमण म्हणतात. किंवा एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला चिडविलें तरीहि त्याला आक्रमण म्हणतात. म्हणून विशिष्ट प्रकरणाच्या वेळीं कशाला आक्रमण समजावें व कशाला आक्रमण समजूं नये तें ठरविण्याचा यूनोच्या सनदेनें सुरक्षा-मंडळाला अधिकार दिला आहे.

सुरक्षा-मंडळाला जेव्हां एखादा धोका दिसतो तेव्हां तें मग दुसऱ्या कशाची वाट पहात बसत नाहीं. एखादा वाद आंतरराष्ट्रीय न्यायालया-पुढें किंवा आर्थिक व सामाजिक मंडळापुढें किंवा आमसभेमध्यें चर्चिला जात असला, आणि त्याच वेळीं त्यांतून युद्ध उद्‌भवेल असें दिसू लागलें तर, दुसरें काय ठरवितात तें पाहाण्यासाठीं न थांबतां सुरक्षा-मंडळ स्वतःच त्याबद्दलची उपाययोजना सुरू करूं शकतें.

एक प्रकारचें युद्ध मात्र केव्हां केव्हां सुरक्षा-मंडळाच्या अधिकारक्षेत्रा-बाहेरचें असतें. एकाच देशांतल्या लोकांचे दोन गट जेव्हां एकमेकांविरुद्ध लढूं लागतात तेव्हां त्या युद्धाला यादवी युद्ध म्हणतात. प्रत्येक देशांत असलीं युद्धें झालेलीं आहेत. एका राष्ट्रांतल्या यादवी युद्धामुळें जर दोन निरनिराळ्या राष्ट्रांमध्येंच युद्ध जुंपण्याची भीति नसेल तर सुरक्षा-मंडळाला त्यांत हात घालतां येत नाहीं. कांहीं यादवी युद्धें अधिक पसरतात आणि राष्ट्रांराष्ट्रांतील युद्धाचें स्वरूप पावतात, आणि कांहीं यादवी युद्धांत तसें कांहीं घडत नाही. एखाद्या देशांत यादवी युद्ध सुरू झालें असलें तर सुरक्षा-मंडळानें त्याच्यावर चर्चा करावी लागते व त्याच्यासंबंधाचें धोरण ठरवावें लागतें.

एखादें राष्ट्र

शांतताभंग करण्याचा धाक दाखवीत आहे कीं काय ?

शांतताभंग करीत आहे कीं काय ?

आक्रमणाचें कृत्य करीत आहे कीं काय ?

या प्रश्नांवर मत देण्याचा सुरक्षा-मंडळावर जेव्हां प्रसंग असतो तेव्हां त्याला अतिशयच महत्वाचा निर्णय घ्यावयाचा असतो. 'नाहीं' असें जर त्याचें मत पडलें तर वाद मिटविण्यासाठीं तें फक्त शांततामय उपायच अंमलांत आणूं शकतें. पण जर 'होय' असें त्याचें मत पडलें तर तो तंटा मिटविण्यासाठीं तें स्वतःच शस्त्रबलाचा उपयोगहि करूं शकतें. हा निर्णय इतका महत्वाचा आहे कीं, बड्या पांच राष्ट्रांपैकीं कोणतेंहि एक राष्ट्र त्याचाच त्या वादाशीं संबंध असतांनाहि आपला नकार-हक्क ऊर्फ व्हेटो वापरून सुरक्षा-मंडळाला तसें कांहीं करण्यास प्रतिकार करूं शकतें.

पण, 'होय' असें जर एकदां सुरक्षा-मंडळाचें मत पडलें तर पुढें काय करावयाचें तें त्यानें ठरविलें पाहिजे.

अमूक अमूक उपाय योजावा अशी तें शिफारस करू शकतें.

त्याला वाटेल ते उपाय तें लगेच योजूंहि शकतें.

किंवा त्या दोन्हीं गोष्टी एकाच वेळीं तें करू शकतें.

पहिली गोष्ट म्हणजे अगदीं ताबडतोब करण्यासारख्या कांहीं गोष्टींची शिफारस करूनहि तें पुष्कळदां बरेंच चांगलें कार्य करतें.

एखाद्या सरहद्दीवरच जर एखादी लढाई सुरू झाली तर, तुमचा हा तंटा तोडण्याचा योग्य उपाय कोणता याबद्दल आम्हीं चर्चा करतो, पण तोपर्यंत तुम्हीं दोघांनीं आपापलीं सैन्यें सरहद्दीपासून तीन तीन मैल मागें घ्या, असें तें दोन्ही राष्ट्रांना सुचवितें.

एका राष्ट्रानें दुसऱ्या एका राष्ट्राच्या कांही नागरिकांना धरलें आहे व तें त्यांना गोळ्या घालून मारणार आहे, आणि दुसरें राष्ट्र त्याबद्दल युद्ध करण्याची धमकी देत आहे, तर अशा वेळीं सुरक्षा-मंडळ त्या पहिल्या राष्ट्राला म्हणेल, या लोकांना तुम्हीं गोळ्या घालूं नका. या प्रकरणातील मुद्यांचा आम्हांला विचार करतां येण्यासाठी त्यांना तुम्हीं नुसते आपल्या ताब्यांत ठेवा.

अशाच तऱ्हेच्या आणखी किती तरी युक्त्या सुरक्षा-मंडळांतल्या त्या अकरा सभासदांना सुचवितां येतात.

या तात्पुरत्या शिफारशींचा राष्ट्रें गंभीरपणें विचार करतात. कारण त्या सुचनांमागें सुरक्षा-मंडळाचें सामर्थ्य उभें राहूं शकेल याची त्यांना जाणीव असते.

अर्थात एखाद्या राष्ट्रावर जर कोणी तोफा व बाँब यांच्या सहाय्यानेंच हल्ला केला तर, पुढें काय करावें याचा सुरक्षा-मंडळ विचार करूं लागलें असलें तरीहि स्वतःच्या रक्षणासाठीं जितक्या प्रखरपणें लढणें शक्य असेल तितक्या प्रखरपणें लढण्याचा त्या राष्ट्राला हक्क आहे. इतकेंच नव्हे तर हल्ला थांबविण्याच्या कामीं व सर्व हल्लेखोरांना दूर निघून जायला लावण्याचे कामीं सुरक्षा-मंडळाला यश येईतों, स्वतः हल्लेखोराचा प्रतिकार करण्याचा व त्या कामी इतर राष्ट्रांचीहि मदत घेण्याचा त्या राष्ट्राला हक्क आहे.

तथापि तोफा, रणगाडे व बाँब यांच्या सहाय्यानें हल्ला झाला असेल तरच हा स्वसंरक्षणार्थ लढण्याचा अधिकार पोंचतो. शाद्बिक किंवा पैशांच्या रूपानें, किंवा व्यापारी मार्गांनी हल्ला केला गेला असतां हा अधिकार पोंचत नाहीं.

आपण स्वतः एखाद्या वादांत पडावयाचें असें जरी सुरक्षा-मंडळानें ठरविलें तरी त्याचा अर्थ तें लगेच माणसें मारायला सुरवात करील असा होत नाहीं. त्याखेरीज दुसरे परिणामकारक उपायहि तें योजूं शकतें.

पहिल्या प्रथम, गुन्हेगार राष्ट्रांशीं असलेले तुमचे सर्व राजनैतिक संबंध तोडा, असा आदेश तें प्रथम यूनोच्या सर्व सभासद राष्ट्रांना देईल.

आपण ज्याला शांततामय उपाय योजणें म्हणतों त्यांतला हा उपाय

नव्हे. असले उपाय योजण्याचा जेव्हां सुरक्षा-मंडळ निर्णय ठरवितें तेव्हां पुरुष, स्त्रिया व मुलें मिळून सबंधच्या सबंध राष्ट्राला तें शासन करीत असतें.

आपण एखाद्या राष्ट्राशीं असलेले आपले राजनैतिक संबंध जेव्हां तोडतों तेव्हां तेथल्या आपल्या वकीलाला आपण स्वदेशी परत यावयाला फर्मावितों. त्या राष्ट्राच्या वकीलालाहि आपण परत जावयाला लावतों. त्याच्याशी कोणत्याहि प्रकारचा तह करण्याबाबत बोलणें करण्याचाहि त्याला अधिकार उरत नाही. तसेंच आपण त्याच्याशीं केलेला एखादा जुना तह जरी मोडला तरी त्या बाबत आपल्याकडे तक्रार करणें त्यास कठीण होतें. आपल्याकडे कर्ज मागण्याची त्याला इच्छा असली तरी प्रत्यक्ष तशी मागणी करणें त्यास कठीण होतें, किंवा आपण त्याच्याकडून ज्या वस्तू विकत घेतल्या असतील त्यांचीहि किंमत तो मागू शकणार नाहीं. जर कोणत्या एखाद्या राष्ट्राशी असलेले आपले संबंध इतर सगळ्याच राष्ट्रांनीं अशा प्रकारें तोडले तर त्या राष्ट्राला पुष्कळच अडचण सोसावी लागेल.

हा उपायहि जर पुरेसा झाला नाहीं तर मग सुरक्षा-मंडळ दंडयोजना अंमलांत आणण्याचें ठरवील. तुम्हीं जर दांडगाई करूं लागलांत, तर शाळा सुटल्यावरहि मास्तर तुम्हांला शाळेंतच थांबावयाला लावतील, किंवा तुमच्या वर्गातर्फे होणार असलेल्या खेळांत ते तुम्हांला खेळूं देणार नाहीत, किंवा तुमची आई तुम्हांला सिनेमाला जाऊं नको म्हणेल किंवा तुमचे वडील तुम्हांला खर्चाला पैसे देणार नाहींत. याचा अर्थ तीं तुमच्या विरुद्ध दंडयोजना अंमलांत आणीत आहेत. तुम्हीं कांहीं गैरवर्तन केल्यास तुमच्या कांही सवलती काढून घेणें याला दंडयोजना असें म्हणतात.

(किंवा तीं तुमच्या थोबाडीतहि मारतील. म्हणजे तुमच्या विरुद्ध बलप्रयोग करणें होय. पुढल्या प्रकरणांत त्याच विषयाचा विचार आहे.)

एकाद्या राष्ट्रानें सुरू केलेली दांडगाई त्याला थांबवावयाला लावण्यासाठीं त्याच्याविरुद्ध दंडयोजना अंमलांत आणण्याचें जेव्हां सुरक्षा-मंडळ ठरवितें तेव्हां त्या राष्ट्रांकडून कांही विकत घेऊं नका किंवा त्याला कांहीं विकू नका असा आदेश तें सर्व सभासद राष्ट्रांना देतें. केव्हां केव्हां तोफा, पेट्रोल, कोळसा, व रबर टायर्स वगैरे सारखा कांहीं मालच तेवढा त्या राष्ट्राकडे जाण्याचें थांबविण्याचा तें प्रयत्न करतें, किंवा कोणतीहि वस्तु त्या राष्ट्राला मिळू नये असा सुद्धां तें आदेश देऊं शकतें. किंवा तशीच जरुरी भासली तर त्या राष्ट्रांतल्या कोणालाहि कर्ज देण्याची किंवा कोणाकडून घेतलें असल्यास तें परत देण्याची सर्वांना मनाई करा असाहि तें सर्व सभासद-राष्ट्रांना आदेश देऊं शकतें.

तसेंच त्या राष्ट्राजवळ जी राष्ट्रें असतील त्यांनीं त्या राष्ट्रांत जाणाऱ्या सर्व आगगाड्या, बसेस, मोटारी व लॉऱ्या यांना पुढें जाऊं देऊं नये असेंहि तें त्या राष्ट्रांना सांगूं शकतें. तसेंच त्या राष्ट्रांकडे बोटी व विमानें जाऊं देऊं नका, आणि तिकडे जाणारी सर्व पत्रें, तारा, व रेडिओ संदेश अडवून ठेवा असेंहि तें सभासद राष्ट्रांना सांगूं शकतें. याशिवाय दळणवळणाची आणखी जर कोणतीं साधनें असतील तर तींहि तें बंद पाडूं शकतें.

इ. स. १९३५ सालीं, इटालीनें एथिओपियावर स्वारी केलेली असल्यामुळें तिच्याविरुद्ध दंडयोजना अंमलांत आणण्याचें राष्ट्रसंघानें ठरविलें. तथापि, लीग असेंब्लीच्या ५१ सभासदांचेंच या बाबतींत मत घेतलें गेलेलें होतें. पण सर्वानुमतें ठराव मंजूर झालेला असल्याखेरीज दंडयोजनेचा अंमल करतां येत नाहीं आणि तींत ज्या गोष्टीचा समावेश करावयाला सर्वांची संमति मिळणार नाहीं त्यांचा समावेशहि करतां येत नाहीं. इटालीला कोणत्याहि



प्रकारच्या तोफा किंवा हत्यारें विकण्याची किंवा कोणत्याहि तऱ्हेचा कच्चा माल म्हणजे कोळसा व जळाऊ लांकडे तीस विकण्याची किंवा इटालीला पैसा कर्जाऊ देण्याची आपल्या सर्व लोकांना बंदी करा असा राष्ट्रसंघानें त्याच्या सर्व सभासदांना आदेश दिला होता. पण रणगाडे व विमानें यांना

उपयोगी पडणारें असें जें पेट्रोल तें इटालीला न मिळूं देण्याच्या अत्यंत महत्वाच्या अशा मुद्यांचें मात्र त्या आदेशांत नांवहि नव्हतें, कारण त्याचा त्या आदेशांत समावेश करण्याच्या बाबतींत त्या ५१ राष्ट्रांमध्यें एकमत झालें नव्हतें.

अमेरिका तर त्या राष्ट्रसंघाचा सभासद नव्हती, आणि जर्मनीनें नुकताच त्याच्या सभासदत्वाचा राजीनामा दिलेला होता.

त्यामुळें इटालीला पेट्रोल मिळत राहिलें, आणि त्याची मोहीम चालू राहिली व त्यानें सबंध एथिओपिया जिंकून घेतला.

राष्ट्रसंघाला जास्त कांहीं करतां आलें नाहीं.

पण आजची आपली यूनो जुन्या राष्ट्रसंघासारखी नाहीं. तसेंच जिच्यामध्यें जवळजवळ निरनिराळ्या ५१ राष्ट्रांचे प्रतिनिधी आहेत त्या आमसभेकडे दंडयोजनेवर मत देण्याचा प्रश्न जातहि नाहीं. दंडयोजनेवर मतप्रदर्शन करण्याचा अधिकार सुरक्षा-मंडळाकडेच आहे. त्यांत फक्त ११ च सभासद असून त्यांतल्या (बड्या पांच राष्ट्रांसकट) केवळ ७ च सभासदांचें जरी दंडयोजनेंत समाविष्ट करावयाच्या वस्तूंबद्दल एकमत झालें तरी चालतें. दंडयोजनेचा अंमल केल्यानंतरहि जर गुन्हेगार राष्ट्राचे चाळे थांबले नाहींत तर आणखी अनेक उपाय सुरक्षा-मंडळाच्या कक्षेंत असतात.

## प्रकरण ११

# शस्त्रास्त्र बळ वापरण्याची वेळ आल्यास

आजपर्यंत सबंध इतिहासांत आतांच्याच वेळी जगामध्यें अशी एक जागतिक संघटना निर्माण झालेली आहे कीं जिच्याजवळ सैन्य आहे, युद्धबोटी आहेत व बाँब आहेत, आणि युद्ध थांबविण्यासाठी या सर्वांचा उपयोगहि ती करूं शकते. या सर्व शस्त्रास्त्रांचा सगळ्यांत मोठा उपयोग हा आहे कीं त्यांचा प्रयोग करण्याचा नुसता धाक घालण्यानेंहि राष्ट्रें एकमेकांशीं वागतांना शांततामय मार्गांचाच अवलंब करण्यास तयार होतात. कारण हें शस्त्रास्त्र बळ जरी प्रत्यक्ष कधीं दाखविलें जात नाहीं तरी तें तयार आहे याची राष्ट्रांना जाणीव असते.

यूनो सनदेची शब्दरचना अशी आहे कीं, तिचें हें सैन्य छोटया छोटया राष्ट्रांवरच, किंवा कदाचित् एखाद्या वेळीं जर्मनी व जपान या आपल्या माजी दोन शत्रूंविरुद्धच पाठवितां येईल. पण बडया पांच राष्ट्रांपैकीं एकाहि विरुद्ध तें पाठवितां येणार नाहीं.

असें ठरविण्याला एक तसेंच फार चांगलें कारण आहे. यूनो सैन्याच्या कांहीं तुकडया जर एखाद्या लहान राष्ट्राविरुद्ध वापरल्या, तर एखादें मोठें युद्ध सुरू होण्याला प्रतिबंध करतां येईल. पण जर यूनोचें हें सैन्य बडया पांच राष्ट्रांपैकींच एखाद्या राष्ट्रावर पाठविलें तर यूनोचें सगळेंच्या सगळें सैन्य व तिच्या जवळचीं सगळींच्या सगळीं आयुधें यांचा उपयोग करावा लागेल. आणि मग त्यामुळें आपण महायुद्धांतच सांपडूं. तसें झाल्यास आपल्या संस्कृतीचाच कदाचित् निकाल लागेल आणि आपल्यापैकीं पुष्कळशा लोकांना मरावेंहि लागेल.

बडया पांच राष्ट्रांपासून स्वत:चें संरक्षण करण्याची छोटया राष्ट्रांना कांहींच सोय ठेवलेली नाही असें मात्र नाहीं. बडया पांच राष्ट्रांपैकीं प्रत्येकानें भूतकाळांत छोटया राष्ट्रांच्या आगळिकी केलेल्या आहेत. उदाहरणार्थ, अमेरिकेनें १८९८ सालीं जबरदस्तीनें फिलिपाईन बेटें घेतलीं, आपल्या नाविक दलाच्या जोरावर नायकाराग्वेंत घुसली, हैति या देशाचा आर्थिक कारभार तिनें आपल्या ताब्यांत घेतला. अशा तऱ्हेचीं कृत्यें प्रत्येक मोठ्या देशानें केलेलीं आहेत.

पण एखाद्या छोटया राष्ट्राविरुद्ध आतां जर अशा तऱ्हेचा गुन्हा कोणी केला, तर, तें आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे किंवा आमसभेकडे न्याय मागूं शकेल. बडया राष्ट्रांना या दोन संस्थांत नकार हक्क (व्हेटो) नाहीं.

किंवा तें छोटें राष्ट्र सुरक्षा-मंडळाकडेहि मदत मागूं शकेल. एखाद्या मोठया राष्ट्राविरुद्धच जर तक्रार असेल, तर, सुरक्षा-मंडळ शांततामय उपायच योजीत असेपर्यंत, तेथें त्या बडया राष्ट्राला मत देण्याचा मुळींच अधिकार नसतो.

पण जर शांततामय उपाय थकले तर मात्र त्या छोटया राष्ट्राचा निरुपाय होतो, कारण त्याच्यासाठीं बडया पांच राष्ट्रांपैकीं कोणत्याहि एकाविरुद्ध सुरक्षा-मंडळ आपल्या सामर्थ्याचा उपयोग करूं शकत नाही.

प्रत्येक राष्ट्रापाशीं युनोच्या सैन्याचा थोडथोडा भाग असतो. यूनोच्या प्रत्येक सभासद राष्ट्राशीं सुरक्षा-मंडळानें एक एक खास तह केलेला असतो आणि त्या त्या राष्ट्रानें सुरक्षा-मंडळासाठीं किती सैन्य, किती युद्धबोटी व विमानें, आणि कोणत्या प्रकारच्या तोफा व बॉंब हीं आपल्यापाशीं नेहमीं तयार ठेवलीं पाहिजेत तें त्यांत सांगितलेलें असतें.

प्रत्येक राष्ट्रांत त्याच्या सैन्यांतील व आरमारांतील वरिष्ठांत वरिष्ठ अधिकाऱ्यांची एक कमिटी असते, तिला त्या राष्ट्राचा 'जनरल स्टाफ' म्हणतात आणि कोणत्याहि युद्धसंबंधांत विचार करणें व योजना आंखणें हें तिचें काम असतें. या कमिटीचा जो प्रमुख असेल त्या माणसाला 'चीफ ऑफ स्टाफ' म्हणतात. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकन चीफ ऑफ स्टाफच्या जागीं जनरल ड्‌वाइट डी. आयसेनहॉवर हे होते.

पांचहि बडया राष्ट्रांपैकीं—अमेरिका, सोव्हिएट रशिया, चीन, इंग्लंड, व फ्रान्स—प्रत्येक राष्ट्राचा चीफ ऑफ स्टाफ आपलीं तीन-तीन माणसें न्यू यॉर्कला पाठवितो. तीं त्याच्या सैन्याचीं, आरमाराचीं व विमानदलाचीं प्रतिनिधी असतात. अशीं मिळून हीं जीं १५ माणसें जमतात त्यांची मिळून 'मिलिटरी स्टाफ कमिटी' बनते. ही कमिटी म्हणजे सुरक्षा-मंडळाचीच एक शाखा होय, पण तिच्या बैठकी नेहमींच गुप्तपणें होत असल्यामुळें ती तुम्हांला कधींच पाहायला मिळणार नाहीं.

बडया पांच राष्ट्रांना जर तशी जरुरी वाटली तर, मिलिटरी स्टाफ कमिटीवर आपले प्रतिनिधी पाठविण्याबद्दल इतर राष्ट्रांनाहि तीं विनंति करूं शकतात, पण त्यांनीं इतर राष्ट्रांचे प्रतिनिधी त्या कमिटींत घेतले पाहिजेतच असें मात्र नाहीं.

यूनोच्या मिलिटरी स्टाफ कमिटींत बड्या पांच राष्ट्रांचेच अधिकारी आहेत, आणि तींत दुसऱ्या छोट्या राष्ट्रांच्या सैन्यांतले अधिकारी घेतलेच पाहिजेत असा नियम नाहीं, याचें कारण या जगांत आज खरेंखुरें लष्करी सामर्थ्य फक्त बड्या पांच राष्ट्रांच्याजवळच आहे हें होय.

कोणत्या राष्ट्रानें कोणकोणतें युद्धबळ सुरक्षा-मंडळासाठीं तयार ठेवावें याच्याबद्दलचा तह करण्याचें जेव्हां घाटत असतें तेव्हां ही मिलिटरी स्टाफ कमिटीच त्यासंबंधांत विचार करते आणि सुरक्षा-मंडळाला अधिकारी वाणीनें सल्ला देते.

जगांतल्या कोठल्याहि एखाद्या भागांत यूनोच्या बळाचा उपयोग करण्याची वेळ जर चुकून आलीच तर त्यावेळीं पूर्ण योजना आंखलेली असावी म्हणून, सुरक्षा-मंडळ या मिलिटरी स्टाफ कमिटीच्या सहाय्यानें (कलम ४६) काय काय करावयाचें त्याचे आधींच नकाशे काढवून तयार ठेवीत असतें.

जर तो दुःखद दिवस उजाडलाच, तर त्यावेळीं या मिलिटरी स्टाफ कमिटीला एकाएकीं भलतेंच महत्व येईल. कोणत्या राष्ट्राविरुद्ध आपलें सैन्य पाठवावयाचें व त्या सैन्यांत कशाकशाचा समावेश करावयाचा तें सुरक्षा-मंडळ ठरवील. त्यानंतर तें या मिलिटरी स्टाफ कमिटीकडे वळेल व तिला म्हणेल, "आतां त्याची रवानगी करणें हें तुमचें काम."

ज्या माणसांनीं यूनोची ही सनद लिहिली त्यांनीं, ही कार्यपद्धति खात्रीनें यशस्वी होण्यासाठीं जें जें तींत लिहिलेलें असणें अवश्य आहे असें त्यांना वाटलें तें तें सर्व तींत लिहिलें आहे. 'वेळ आली हो आली,' असें सुरक्षा-मंडळानें म्हणतांच तिच्या जवळ येऊन उभे राहाण्याचें आणि मदत करण्याचें सर्व राष्ट्रांनीं वचन दिलें आहे (कलम २ व ४९).

अगदीं एकाएकीं सुरक्षा-मंडळाकडून त्या सर्वांना आदेश जाईल असें नव्हे. जावा बेटामध्यें जर कांहीं गडबड उत्पन्न झाली तर भारत व ऑस्ट्रेलिया हीं राष्ट्रें त्या भागाच्या नजीक असल्यामुळें सुरक्षा-मंडळाकडून त्याच दोघांना मदतीसाठीं बोलावणें जाईल. फार दूर अंतरावर असणाऱ्या चिलीला किंवा ब्राझीलला बोलावणें जाणार नाहीं. पण जर ती गडबड अर्जेण्टिनामध्यें असेल तर भारत किंवा ऑस्ट्रेलिया यांना बोलावणें न जातां तें चिली व ब्राझील यांनाच जाईल.

आपल्या सैन्याची मदत पाठविण्याबद्दल सुरक्षा-मंडळाकडून ज्या राष्ट्राला निरोप जाईल तें जर त्याचें (सुरक्षा-मंडळाचें) सभासद नसलें, तर तें असें म्हणूं शकेल, "तुमच्यासाठीं सैन्य व जीं विमानें तयार ठेवण्याचें मी वचन दिलेलें आहे तें सैन्य व तीं विमानें तुमच्याकडे पाठविण्याबद्दल तुम्हीं मला

सांगण्यापूर्वी, मला या प्रश्नासंबंधांत जें कांहीं बोलावयाचें आहे तें बोलूं देण्याबद्दल काय?" आणि मग तें राष्ट्र आपला एक माणूस सुरक्षा-मंडळाच्या बैठकीचे वेळी त्या बैठकींत भाग घ्यावयाला पाठवील. आपल्या देशाच्या सैन्याचा उपयोग करण्याची कां वेळ आली व कोणत्या कामासाठीं त्याचा उपयोग केला जाणार आहे याबद्दल तो मनुष्य खुलासा विचारील आणि मग त्यावर होणाऱ्या मतदानांत तो भागहि घेईल: त्या देशाच्या सैन्याचा उपयोग केला जावा कीं काय या प्रश्नाचा निर्णय ठरविण्यासाठी घेतल्या जाणाऱ्या मतांचे वेळीं फक्त एक मत देण्याचा त्या राष्ट्राला अधिकार असेल.

समजा, सुरक्षा-मंडळाच्या कामासाठीं आपलें सैन्य देण्याचें आधीं वचन दिलेलें असतांहि, तसें करण्याचें एखाद्या राष्ट्रानें आयत्या वेळीं नाकारलें? असें घडणें अगदीं शक्य आहे.

——बडया पांच राष्ट्रांपैकी कोणतेंहि राष्ट्र असा नकार देणार नाहीं. त्याला तसेंच जर करायचें असलें तर 'विरुद्ध मत दे' असें सुरक्षा-मंडळांतल्या आपल्या प्रतिनिधीला तें आधींच कळवील. तसें त्यानें केलें कीं तो सगळाच प्रश्न तेथेंच अडेल, आणि मग कोणाचेंच सैन्य बोलावलें जाणार नाहीं——

पण प्रत्यक्ष कृति करावयाचीच असें ठरवून सुरक्षा-मंडळानें सैन्यांची मागणी केली, आणि छोटया राष्ट्रांतल्या कांहीं जणांनी 'आम्हीं सैन्य पाठवीत नाहीं,' असें म्हटलें तर तेवढयानें कांहीं बिघडत नाहीं. कारण जरूर पडली तर असल्या बारीक राष्ट्रांच्या मदतीशिवायहि हव्या त्या संकटाला तोंड देण्याइतकें सामर्थ्य बडया पांच राष्ट्रांत आहे.

निरपराधी अशा तटस्थ राष्ट्रांना मदत करण्याची सोय सनदेच्या ५० व्या कलमांत आहे. ग्रीसच्या शेजारीं असलेल्या एखाद्या राष्ट्राविरुद्ध यूनोनें आपलें सैन्य, आपले रणगाडे व आपल्या तोफा पाठविल्या आणि तीं सर्व ग्रीसमधून पुढें गेलीं तर ग्रीक लोकांचें थोडें फार तरी नुकसान होणार हें निश्चित. त्यांच्या व्यापारधंद्याची घडी विस्कटेल. कदाचित् तेथले शेतकरी लोक त्यांच्याजवळचें सर्व धान्य त्या सैनिकांना विकून टाकतील आणि तेथल्या लोकांवर उपासमारीची पाळीहि आणतील.

अशा प्रकारें एखाद्या राष्ट्राचें जर नुकसान झालें तर, तें स्वतः यूनोचा सभासद नसलें तरीहि, सुरक्षा-मंडळाकडे मदत मागूं शकतें. सुरक्षा-मंडळ देऊं शकेल अशा मदतीचे पुष्कळ प्रकार आहेत. अडचणींत सांपडलेल्या त्या राष्ट्राला कोणातरी बडया राष्ट्राकडून तें कर्जाऊ पैसे देववील, अथवा बोटीच्या बोटी भरून अन्नहि देववील.

उदाहरणार्थ, शांततेच्या काळांत इटाली तिला लागणारा बहुतेक सर्व

कोळसा जर्मनीकडूनच खरेदी करतें असें आपण गृहीत धरूं. पण, कांहीं कारणामुळें 'जर्मनीकडून कोणत्याहि राष्ट्रानें कांहींहि विकत घेऊं नये'. असें सुरक्षा-मंडळानें ठरविलें. तसें झाल्यास इटालीला कोळसा मिळणार नाही आणि त्यांचे कारखाने बंद ठेवण्याची वेळ येईल. अशा वेळीं अमेरिका पेन्सिल्व्हानियामधून इटालीला कोळसा पाठवूं शकेल. तेथून कोळसा आणायचा म्हणजे खूप लांब अंतर तोडायचें हें खरें, पण अशा गोष्टी दुसऱ्या महायुद्धांत केल्या गेल्या आहेत, आणि त्याचा अपराध नसतांहि जर एखाद्या राष्ट्राला दुःख पोचेल तर यापुढेंहि तशा गोष्टी करतां येतील.

कोणकोणत्या सभासद-राष्ट्रांकडून आणि किती किती सैन्याची मदत मागविणें जरूर आहे तें, मिलिटरी स्टाफ कमिटीच्या मदतीनें सुरक्षा-मंडळ ठरवितें.

ज्यांच्याकडे मदतीची मागणी केली गेली असेल त्या राष्ट्रांनाहि एकदम सगळेच सैन्य पाठवावें लागेल असें नाहीं. साधारणतः, धोका उत्पन्न झालेल्या ठिकाणाच्या आसपासच्या भागांतील ५–६ राष्ट्रांकडूनच कांहीं शेंकडा विमानें, दहा-बारा युद्धबोटी व कदाचित् तीन एक डझन पाणबुड्या मागविल्या जातील. एवढें बळ पुरेसें व्हायला हरकत नाही.




बॉंब टाकण्याची त्यांना कदाचित् गरज पडणारहि नाहीं. हे यूनोचे लोक आपल्या सामर्थ्याचें 'प्रदर्शन' करण्याचा प्रयत्न करतील. ज्या शहरांतले

पुष्कळसे लोक पाहूं शकतील अशा शहरांजवळच्या समुद्रकिनाऱ्यानें लोक भर दिवसा आपल्या युद्धबोटी फिरवितील, बाँबफेकीं विमानें रात्रीच्या वेळीं त्या शहरांवर फिरवितां येतील आणि सर्व लोकांना दिसतील अशा प्रकारें मोठमोठे प्रकाशझोत खालीं सोडतां येतील. एवढें केलें तरी त्या शहरांतले लोक असा विचार करूं लागतील की, "उद्यां रात्रीं या विमानांनीं बाँबच टाकले तर काय होईल?" तुम्हीं जर त्या युद्धबोटी पाहिल्यात, आणि तुमच्या घरांवर पसरणारे ते झगझगीत प्रकाशाचे झोत पाहिलेत तर स्वत: तुम्हालाच काय वाटेल याचा तुम्हीं विचार करा. "तुमच्या सरकारनें दांडगाई करण्याचें थांबविलें नाहीं तर तुमची अशी-अशी अवस्था होईल." अशा प्रकारची त्या शहरांतल्या लोकांना ताकीद देणारी लक्षावधि पत्रकेंहि विमानांतून त्या शहरांत इतस्तत: टाकतां येतील.

किंवा, सुरक्षा-मंडळ त्या राष्ट्राची कोंडी घडवून आणील. त्या राष्ट्राकडून येणाऱ्या सगळ्या बोटी पकडा, आणि कोणतीहि बोट अथवा विमान तिकडे जाऊं देऊं नका असा तें आपल्या पाणबुड्या बोटींना, विमानांना व युद्धबोटीना हुकूम करील. तसेंच त्या देशांत आगगाड्या जाऊं देऊं नका, मोटारी जाऊं देऊं नका, आणि लॉऱ्याहि जाऊं देऊं नका असा तें आपल्या सैन्याला हुकूम करील.

एखाद्या राष्ट्राला कोळसा, गॅसोलाईन, तोफा, आणि इतर वस्तु मिळूं नयेत म्हणून दंडयोजना अंमलांत आणण्यासारखाच हा प्रकार आहे. पण, दंडयोजनेचा अंमल केला असतांहि, उपरिनिर्दिष्ट वस्तु त्या राष्ट्राला मिळण्याचें जर कांहीं कारणामुळें थांबलें नसलें तर कोंडी केल्यामुळें तरी तें थांबतेंच.

सरतेशेवटी, त्या राष्ट्रावर हल्ला करण्याचा सुरक्षा-मंडळ आपल्या सैन्याला हुकूम करील. तें सैन्य त्या राष्ट्राच्या हद्दीत शिरलें आणि त्यानें तेथलें महत्वाचें असें एक जरी शहर काबीज केलें तरी तेवढ्यानेंहि काम भागण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, यूनोचें सैन्य जर अर्जेण्टिनावर पाठविलें गेलेलें असलें आणि त्यानें जर ब्यूनोस एअर्स शहर व्यापलें तर तेथली गडबड निश्चितपणें थांबेल. कारण ब्यूनोस एअर्स म्हणजे त्या देशाचें जणुं हृदय किंवा मर्मस्थान आहे.

किंवा, आडदांडपणा करणाऱ्या त्या राष्ट्रांत लष्करी साहित्य तयार करणारे जे कारखाने असतील त्या सर्वांवर अतिशय मोठे स्फोट करणारे व आगी लावणारे बाँब टाकणें जरूर आहे असेंहि कदाचित् सुरक्षा-मंडळाला वाटेल.




पण, सुरक्षा-मंडळानें गुन्हेगार राष्ट्रापुढें आपल्या सामर्थ्याचें नुसतें प्रदर्शन चालविलेलें असो, किंवा त्यानें त्याची कोंडी केलेली असो, किंवा त्या राष्ट्रावर त्यानें आपलें सैन्य व बॉंबफेकी विमानें पाठविलेलीं असोत—त्या राष्ट्रासंबंधांत शिफारशी करण्याचें, त्याला वळविण्याचा प्रयत्न करण्याचें आणि वाटाघाटी करण्याचें त्याचें काम चालू राहायला हवेंच. सुरक्षा-मंडळाच्या फौजांची स्वारी अगदीं यशस्वी जरी झाली असली आणि हल्ले थांबले असले तरी मूळचें भांडण खरोखर मिटेपर्यंत, त्यानें शिफारशी व मनधरणी करण्याचें काम चालू ठेवायला पाहिजेच.

सुरक्षा-मंडळाला त्याच्या बळाचा उपयोग करतां येण्याला तीन विचित्र प्रकारें मर्यादा घातली गेलेली आहे.

**एक**: दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी ज्या राष्ट्रांनीं जर्मनी व जपान यांचा पराभव केला तीं राष्ट्रें त्या दोन देशांचें काय हवें तें करूं शकतील, आणि सुरक्षा-मंडळ त्यांना आडवूं शकणार नाहीं. (कलम १०७) महायुद्ध ज्यांनीं जिंकलें त्या राष्ट्रांनीं तें युद्ध हरलेल्या राष्ट्रांचें कांहीं बरेंवाईट केलें तरी यूनोला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं.

तरीपण, तीं पराभूत राष्ट्रें पुन्हां कधीं दुसरें युद्ध सुरू करणार नाहींत अशी खबरदारी घेण्याचें काम दोस्त राष्ट्रें केव्हांतरी एखादा करार करून सुरक्षा-मंडळाकडे सोपवितील अशी शक्यता असल्याचें कलम ५३ मध्यें म्हटलेलें आहे.

**दोन:** सुरक्षा-मंडळ एखाद्या राष्ट्राविरुद्ध आपलें बळ वापरूं शकेल, पण एखाद्या माणसाविरुद्ध वापरूं शकणार नाहीं. कारण एखाद्या राष्ट्रानें जर युद्ध सुरू करण्याची धमकी दिली, किंवा प्रत्यक्ष युद्धहि सुरू केलें, तरी सर्वसाधारणत: त्या राष्ट्रांतलीं १०–१२ माणसेंच त्याबद्दल खरोखर गुन्हेगार असतात. या मूठभर लोकांनींच त्यांच्या देशाला संकटांत पाडण्याची वेळ आणलेली असते, आणि सर्वसाधारणत: बहुसंख्य लोकांना युद्धांत पडायला नकोच असतें व त्यांचें सरकार काय करतें आहे त्याचीहि त्यांना फारशी माहिती नसते. पण त्या १०–१२ गुन्हेगार माणसांना पकडण्याचा सुरक्षा-मंडळाला अधिकार नाहीं. बळाचा उपयोग करायचा तर तें त्या संबंध राष्ट्राविरुद्धच करूं शकतें.

याचा कांहीं तसा फारसा उपयोग होत नाही. सुरक्षा-मंडळाच्या युद्धबोटी व विमानें आपल्या राष्ट्रावर चालून आलेलीं पाहातांच, त्या देशांतल्या लोकांनीं वास्तविक त्या १०–१२ जणांना अटकच करायला पाहिजे, किंवा निदान त्यांना मंत्रीपदांवरून हांकलून, त्यांच्या जागीं दुसऱ्या जरा जास्त समंजस असलेल्या माणसांना नेमावयाला पाहिजे. पण पुष्कळदां त्या १०–१२ माणसांनी आपल्या भोंवतीं मशीन गन्स तयार ठेवलेल्या असतात आणि त्यांचे लोक त्यांना अधिकारच्युत करूं शकत नाहींत.

**तीन:** सुरक्षा-मंडळानें एखाद्या राष्ट्राला कांहीं करण्याची शिफारस केली असतां त्याला तसें करणें भाग पाडण्यासाटीं सुरक्षा-मंडळ बळाचा उपयोग करूं शकत नाहीं. एखादें राष्ट्र युद्ध घडवून आणीत असेल तर तें थांबविण्यासाठींच फक्त त्याच्याविरुद्ध बळ वापरण्याचा सुरक्षा-मंडळाला अधिकार आहे.

कोठें तरी कोणता तरी एक मुलुख जिंकण्याच्या उद्देशानें १० लाख माणसांना शिक्षण देऊन चांगले सैनिक बनविण्याचें काम एखाद्या राष्ट्रानें सुरू केलें आहे अशी आपण कल्पना करूं या. 'तुमची ही सैनिक संख्या कमी करून फक्त एक लाखावर आणा,' अशी सुरक्षा-मंडळानें त्या राष्ट्राला शिफारस केली. पण त्या राष्ट्राच्या सरकारनें १० लाख माणसांना सैनिकी शिक्षण देण्याचा आपला उद्योग चालूच ठेवला. त्याच वेळीं, 'माझा लोकशाहीवर विश्वास आहे' असें म्हणणाऱ्या प्रत्येक माणसाला तुरुंगांत टाकण्याचा त्या सरकारनें सपाटा चालविला, त्या देशांतल्या गुंडांनींहि त्यांच्यापेक्षां निराळा धर्म असलेल्या लोकांच्या दुकानांच्या कांचा फोडल्या आणि त्यांतला सर्व माल चोरून नेला तरी पण तेथले पोलीस नुसते बघत व हंसत उभे राहिले.

तेव्हां सुरक्षा-मंडळानें त्या राष्ट्राकडे पुढील प्रमाणें दुसरा संदेश पाठविला, "तुम्हीं आपलें सैन्य १ लक्षाइतकें ठेवा, ज्यांचा लोकशाहीवर विश्वास आहे अशाची तुरुंगांतून मुक्तता करा, दुकानाच्या खिडक्या फोडल्या जाणें थांबवा, आणि तुमच्या सरकारसारखेंच सरकार तुमच्या लोकांना हवें आहे कीं काय तें पाहाण्यासाठीं पूर्ण मोकळ्या वातावरणांत निवडणुकी होऊं द्या." हा निरोप पाठविल्यानंतर लगेच आपल्या युद्धबोटी व बॅांबफेंकी विमानेंहि त्यानें त्या राष्ट्राकडे पाठविलीं आणि आपल्या सामर्थ्याचें त्या राष्ट्रापुढें प्रदर्शन केलें.

त्यामुळें त्या राष्ट्राचें सरकार मनांत चरकलें. "आम्ही आमच्या सैन्याची संख्या तीन लाखावर आणली आहे," असा उलट निरोप त्यानें सुरक्षा-मंडळाला पाठविला.

त्यावर सुरक्षा-मंडळानें प्रत्युत्तर पाठविलें, "तुम्हीं तुमच्या सैन्याची संख्या तीन लक्षांइतकी उतरविली आहे म्हणतां, पण त्या बाकीच्या ७ लक्ष लोकांना तुम्ही अजून सरहद्दीजवळच्या कॅंपांत ठेवलें आहे; आणि आम्हीं दुसऱ्या ज्या कांही शिफारशी केल्या होत्या त्यांतली एकहि तुम्ही अंमलांत आणलेली नाही." या प्रत्युत्तरामागोमाग तें सदरहू राष्ट्राची कोंडी करण्याचा हुकूम करतें आणि कोणत्याहि बोटी, आगगाड्या, व मोटारी त्या राष्ट्रांत जाऊं देत नाही.

थोडासुद्धां कोळसा, किंवा गॅसोलाईन, किंवा गहूं बाहेरून देशांत आणतां येत नाहीं असें पाहिल्यावर त्या राष्ट्राच्या सरकारमधील मंत्र्यांनी आपलीच जिरली हें ओळखलें आणि सुरक्षा-मंडळाकडे पुनः आणखी एक निरोप पाठविला, "आम्हीं आमचें सैन्य तीन लाखांवरच आणलें आहे. बाकीचे ७ लाख लोक आपापल्या घरीं गेले आहेत. एखादें युद्ध सुरू करण्याचा आमचा विचार नाही."

सुरक्षा-मंडळानें या नव्या परिस्थितीचाहि विचार केला . त्यानें ज्या शिफारशी केल्या होत्या त्यांतली एकहि त्या राष्ट्रानें अंमलांत आणली नव्हती. पण युद्ध सुरू करण्याच्या धमक्या देणें मात्र त्या राष्ट्रानें बंद केलें होतें.

अशा वेळीं, त्या राष्ट्राची केलेली कोंडी उठविणें आणि यूनोच्या युद्धबोटी व विमानें परत घरीं पाठविणें सुरक्षा-मंडळाला भाग पडतें.

# प्रकरण १२

# राष्ट्रांना निःशस्त्र करणें व अणुबॉंबचें नियंत्रण करणें

प्रत्येक राष्ट्राच्या प्रत्येक सरकारनें आजपर्यंत असें सांगितलें आहे कीं, "आम्हांला दोन कारणांसाठीं सैन्य बाळगलें पाहिजे. एक कारण म्हणजे आमच्या स्वतःच्या प्रदेशांत शांतता राखणें---एखाद्यानें कोणी येथें राज्यक्रांति घडवून आणण्यास आरंभ केला, किंवा लोकांच्या मोठ्या जमावानें पोलिसांना आवरतां न येण्याएवढी मोठी दांडगाई सुरू केली तर आमच्या लोकांना नीट वागायला लावण्यासाठीं आम्हांला सैन्याची जरूर आहे; दुसरें कारण म्हणजे दुसऱ्या कोणी राष्ट्रानें आमच्यावर हल्ला केला तर आम्हांला स्वसंरक्षणासाठीहि सैन्य पाहिजे."

पण कित्येकदां आणखीहि एक तिसरें कारण असतें. तें म्हणजे, एखाद्या राष्ट्राजवळ सैन्य असलें तर तें युद्ध सुरू करूं शकतें आणि दुसऱ्यांचा मुलूख जिंकून घेऊं शकतें, हें होय.

पण सैन्यें ठेवणें व शस्त्रें बाळगणें हें मोठ्या खर्चाचें काम आहे. त्याच्यासाठीं जगाला दरवर्षी परार्धावधि रुपये खर्च करावा लागतो. पण लोकांच्या खिशांतून तितके पैसे करांच्या रूपानें काढून घेतले, आणि तोफा, काडतुसें व बॉंब यांच्यासाठीं खर्च केले, तर, अन्न, कपडे, घरें, शाळा, पोहण्याचे तलाव वगैरेसाठीं, जीवन सुखी व आनंददायक करणाऱ्या साधनांसाठीं खर्चायला लोकांना तेवढे पैसे कमी पडतात. तुमचे पैसे सैन्यें पोसण्यासाठीं व शस्त्रास्त्रें बनविण्यासाठीं खर्च न होतील तर तुमची -- यांत तुमचे मित्र व जगांतले इतर सर्व लोकहि येतात---परिस्थिति आज आहे त्यापेक्षां कितीतरी पटीनें चांगली राहिली असती. या परिस्थितीबद्दलच यूनो सनदेच्या २६ व्या कलमांत उहापोह आहे.

शिवाय, शस्त्रास्त्रें हीं भयंकर धोकेबाज आहेत. ज्यांच्यापाशीं बंदुका आहेत असे लोक केव्हां केव्हां रागावतात आणि मग त्यांना त्यांच्या बंदुका कोणावर तरी रोखण्याचा साहजिकच मोह होतो. तसेंच आपल्यापाशीं जबरदस्त फौज आहे अशी जाणीव असलेली सरकारें केव्हां केव्हां अधीर होतात आणि दुसऱ्या राष्ट्रांबरोबर त्यांचे वाद तोडण्यासाठीं त्या फौजेचा उपयोग करण्याचा त्यांना मोह होतो.



एखाद्या राष्ट्राला जर एक नव्या जातीचें लढाऊ विमान मिळालें तर आपल्याजवळहि तसेंच नव्या जातीचें लढाऊ विमान असावें असें दुसऱ्या राष्ट्राला वाटूं लागतें. एका राष्ट्राला जर एक सुधारलेल्या प्रकारचें अग्न्यस्त्र मिळालें तर दुसऱ्या राष्ट्रालाहि तसलेंच किंवा त्याहून अधिक आग ओकणारें अस्त्र मिळविण्याची ईर्षा उत्पन्न होते. या प्रकाराला "शस्त्रास्त्रांची चढाओढ" म्हणतात आणि तींत सर्वांच्या पुढें जाण्यासाठीं प्रत्येक राष्ट्र अतोनात पैसा खर्च करीत असतें.

तेव्हां, सशस्त्र राष्ट्रांचें निःशस्त्र राष्ट्रांत परिवर्तन करणें आपणाला कधीं शक्य होईल काय ? कोणाचाहि कोणताहि प्रदेश जिंकण्याचा प्रयत्न करण्यासाठीं आम्हीं कधीहि सैन्याचा उपयोग करणार नाहों असें जें वचन यूनोंतील राष्ट्रांनीं स्वतःच्या सहीनिशीं दिलें आहे — सनद कलम २, परिच्छेद ४——त्याप्रमाणें खरोखरच वागण्याचा जर त्यांचा विचार असेल तर त्यामुळें सैन्य ठेवण्याला जें तिसरें कारण असतें तें नाहींसें होतें.

सुरक्षा-मंडळ यशस्वी होतें आणि कोण्या राष्ट्राचा दुसऱ्या कोणावर हल्ला आल्यास त्यापासून खरोखरच त्या राष्ट्राचें संरक्षण करूं शकतें असें जर प्रत्ययास आलें तर मग सैन्य ठेवण्याला जें दुसरें एक कारण असतें तेंहि नाहीसें होईल. सुरक्षा-मंडळाला गरज पडेल तेव्हां त्यास देतां येण्यासाठीं म्हणून जेवढे सैनिक किंवा जेवढी शस्त्रसामुग्री तयार ठेवण्याचें एखाद्या राष्ट्रानें कबूल केलेलें असेल त्याच्यापेक्षां जास्त सैन्यबल व शस्त्रसामुग्री

स्वतःच्या संरक्षणासाटींसुद्धां त्या राष्ट्राला बाळगावी लागणार नाहीं; हीं तशीं कांहीं फार असावीं लागत नाहीत.

म्हणजे मग फक्त पहिलें कारण उरतें; तें म्हणजे राज्यक्रांत्या होण्याचें टाळणें व देशांत शांतता राखणें. पण ज्या सरकारच्या राज्यांतील लोकांना उपाशी राहाण्याची वेळ येत नाहीं, आणि त्यांना वाटेल तें बोलून दाखविण्याची व हवी असेल तर नोकरी करण्याची संधि मिळते त्या सरकाराला राज्यक्रात्यांची व दंगलींची भीति बाळगण्याचें कारण नसतें, आणि थोडचाशा सैन्याखेरीज जास्त सैन्याची त्याला गरजहि नसते.

आज जगांतली सर्व सरकारें शस्त्रास्त्रांसाठीं जेवढा पैसा खर्च करीत आहेत त्यापेक्षां त्यांनी बराच कमी खर्च करावा यासाठीं यूनोनें प्रयत्न केलाच पाहिजे असें यूनो-सनदेनें त्रिवार म्हटलेलें आहे.

राष्ट्रांनीं कसकसें निःशस्त्रीकरण घडवून आणावें त्याबद्दलच्या सर्वसाधारण नियमांवर आमसभेनें चर्चा करावी असें या सनदेंत म्हटलेलें आहे. कोणत्या चांगल्या नियमांच्या बाबतींत आमसभेचें जर एकमत झालें तर ती त्या नियमांच्या प्रती सर्व राष्ट्रांकडे पाठवील व त्या नियमांचा स्वीकार करण्याबद्दल त्यांना कळवील.

किंवा, निःशस्त्रीकरण करण्याच्या तहावर सर्वच राष्ट्रांनीं सह्या कराव्या असेंहि आमसभा सुचवूं शकेल. त्या तहांत असें म्हटलें असेल, "यूनोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांनीं जर या तहाला मान्यता दिली तर, दरवर्षीं एक-दशांश या प्रमाणांत येतीं पांच वर्षेंपर्यंत आम्हीं सर्वजण आमचीं शस्त्रास्त्रें कमी करूं."

कांहीं राष्ट्रांमध्यें कोणीहि तरुण १८ वर्षें वयाचा झाला कीं त्यानें लष्करी शिक्षण घेतलेंच पाहिजे असा कायदा आहे. दुसऱ्या कांहीं राष्ट्रांमध्यें प्रत्येक तरुणाला त्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें निवड करण्याचें स्वातंत्र्य असतें, आणि त्याला हवें असल्याशिवाय लष्करी शिक्षण घेणें त्याला भाग पडत नाहीं. जेव्हां एखादें राष्ट्र आपल्या सर्व तरुणांना सक्तीनें लष्करी शिक्षण घ्यायला भाग पाडतें तेव्हां लवकरच त्याच्यापाशीं लढाईवर जायला लायक अशा तरुणांची खूप मोठी संख्या तयार होते. त्यामुळें मग इतर राष्ट्रें घाबरतात, आणि तींहि लगेच तसल्या तयारीला लागतात.

'सक्तीच्या लष्करी शिक्षणाची पद्धत सोडून द्या आणि तरुणांना त्यांच्या आवडीप्रमाणें निवड करूं द्या,' अशी आमसभेनें सर्वच राष्ट्रांना शिफारस करावी असें बऱ्याच राष्ट्रांनीं तिला कळविलें आहे.

जगाचें निःशस्त्रीकरण घडवून आणण्याबद्दलचे सर्वसाधारण नियम

तयार करण्याचें महत्कार्य अगदीं पहिल्या असेंब्लीनें सुरू केलें. सगळ्याच राष्ट्रांनी आपापलीं सैनिक, नाविक, वैमानिक वगैरे शस्त्रदलें कमी करावींत अशी या असेंब्लीला आलेल्या प्रतिनिधींनीं अगदीं एकमतानें शिफारस केली, आणि या शिफारशीप्रमाणें सर्व राष्ट्रें खरोखर आपापलीं सशस्त्रदलें कमी करताहेत की नाहींत तें पाहाण्यासाठीं व त्यांच्याकडून तसें करून घेण्यासाठीं सर्व राष्ट्रांमध्यें कमिटचा पाठविण्यांत याव्यात असेंहि त्यांनीं सुचविलें. कमिटचांमार्फत करवावयाचें हें पाहाणीचें काम कसें केलें जावें तें ठरवून देण्याचें काम आमसभेनें सुरक्षा-मंडळावर सोंपविलें.

सुरक्षा-मंडळानें, त्याच्या मिलिटरी स्टाफ कमिटीच्या सहाय्यानें या प्रश्नाचाहि अभ्यास करणें, आणि लढाऊ दलें कमी करण्यासंबंधांतल्या निश्चित योजना तयार करणें आतां भाग झालें. सर्वसाधारण नियमांपेक्षां निश्चित योजना फार निराळ्या असतात. "अमक्या एका राष्ट्राजवळ सहा युद्धबोटी, दोन पाणबुड्या, आणि दोनशें लढाऊ विमानें असावींत, याच्यापेक्षां जास्त युद्धबळ त्याच्याजवळ असूं नये, पण जरा धोक्याच्या अशा भागांत असणाऱ्या त्या तमक्या राष्ट्राला आठ युद्धबोटी, १० पाणबुड्या आणि दोनशें लढाऊ विमानें ठेवतां यावीत, याच्यापेक्षां जास्त युद्धबळ मात्र त्याच्याजवळ असूं नये," अशा किंवा अशाच प्रकारच्या गोष्टी प्रत्येक राष्ट्राबद्दलच्या त्या निश्चित योजनामध्यें सुचविलेल्या असतील.

किंवा, त्या याच्यापेक्षांहि एक पायरी पुढें जातील, आणि प्रत्येक राष्ट्राजवळ यंदाच्या वर्षीं किती शस्त्रास्त्रें असावींत, पुढच्या वर्षीं किती असावींत, त्याच्या पुढच्या वर्षीं किती असावींत असें ठरवून दरवर्षीं प्रत्येक राष्ट्राजवळचीं शस्त्रास्त्रें कमी कमी करविण्याचें ठरवितील.

नंतर सुरक्षा-मंडळ आपल्या या योजनांची सर्व राष्ट्रांकडे शिफारस करील.

त्या योजनांना जर पुरेसा पाठिंबा मिळाला तर मग मात्र आपल्या बळाच्या जोरावर सुरक्षा-मंडळ त्यांचा अंमल करूं लागेल. बड्या पांच राष्ट्रासकट एकूण ४५ राष्ट्रांनीं त्याच्या योजना मान्य केल्या आहेत अशी आपण कल्पना करूं या—तसें झालें तर मग, ज्यांनी त्या योजना मान्य करण्याचें नाकारलें अशा, उरलेल्या राष्ट्रांना सुरक्षा-मंडळ म्हणेल, "विचार करा ! तुम्हीं जर या योजनांना मान्यता देणार नाहीं तर तुमच्याजवळचीं शस्त्रास्त्रें शांततेला धोका देणारीं आहेत असें कदाचित् मानलें जाईल, आणि ती तशी आहेतच असें जर आम्ही ठरविलें तर आम्हीं आमचें सर्व प्रकारचें सामर्थ्य तुमच्याविरुद्ध वापरूं शकूं."

पण एखाद्या चांगल्या योजनेला सुरक्षा-मंडळांतील राष्ट्रांची संमति कशी मिळवावयाची हाच खरा प्रश्न असतो. योजना चांगली असली, आणि सुरक्षा-मंडळानें तिच्यावर पसंतीचा शिक्काहि मारला, तर मग बाकीच्या सर्व राष्ट्रांनीहि तिचा स्वीकार करावा म्हणून तें त्यांचीं मनें वळवूं शकतें.

या सर्व शस्त्रांपैकीं अणुबाँब हें फारच महत्वाचें अस्त्र आहे ही अगदीं उघड गोष्ट आहे.

लहान राष्ट्रें अणुबाँबचा उपयोग न करतां आपापसांत लहान लहान लढाया करण्याचा जेव्हां प्रयत्न करतात तेव्हां सुरक्षा मंडळ-त्यांना त्या थांबविणें भाग पाडूं शकतें. पण जर एखाद्या मोठ्या राष्ट्रानें अणुबाँबचा पुरवठा मिळविला आणि त्यांच्या मदतीनें महायुद्ध सुरू केलें तर तें तिसरें जागतिक युद्ध ठरेल, आणि सुमारें १५ च मिनिटें तें टिकेल.

सगळ्या राष्ट्रांचें मिळून एक जग व्हावयाचें की नाहीं तें अॅटमिक एनर्जी कमिशनला मिळणाऱ्या यशापयशावर अवलंबून आहे.

सुरक्षा-मंडळात जीं जीं राष्ट्रें आहेत त्या त्या प्रत्येकाचा एक एक प्रतिनिधी, आणि पहिला अणुबाँब शोधून काढण्याच्या कामीं ज्याची मदत झाली त्या कॅनडाचा एक प्रतिनिधी असे मिळून हें कमिशन बनलेलें आहे.

सुरक्षा-मंडळाच्या बैठकी ज्या बड्या महोगनी टेबलाभोंवती भरतात तेथेंच या कमिशनच्याहि बैठकी आजपर्यंत भरत आल्या आहेत. या कमिशनमधला प्रत्येक प्रतिनिधी त्याच्या पाठीमागें बसण्यासाठीं तीन किंवा चार मदतनीस आणीत असतो. या मंडळाच्या काहीं सभांना हजर राहाण्याची प्रेक्षकांनाहि परवानगी दिली गेली होती.

या अॅटमिक एनर्जी कमिशनला कोणत्याहि प्रकारची सत्ता अशी नाहीं. सुरक्षा-मंडळाची तें म्हणजे एक शाखा आहे इतकेंच. सुरक्षा-मंडळानें ठरवून दिलेल्या नियमांप्रमाणें तें चालतें. अभ्यास करणें, चर्चा करणें, आणि सुरक्षा-मंडळाला शिफारशी करणें एवढ्याच गोष्टी तें करूं शकतें.

पण यूनोला करतां येण्यासारख्या इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां, या कमिशनच्या मुख्य कार्याचाच तुमच्या-आमच्या जीवनावर जास्त परिणाम होणार आहे. तें कार्य म्हणजे 'अॅटमिक चार्टर' लिहून काढण्याचें, अणुशक्तीच्या उत्पादनासाठीं सर्व राष्ट्रांच्या अधिकार क्षेत्राखालील 'इंटरनॅशनल अॅटमिक डेव्हलपमेंट अॅथॉरिटी' नांवाची संघटना कशी अस्तित्वांत आणावी याबद्दलची योजना ठरविण्याचें.

ही योजना लिहून काढून, अणुशक्तीचा उपयोग मनुष्यजातीच्या विनाशासाठीं करण्याऐवजीं तिच्या कल्याणासाठी कसा कसा करतां येईल तें

सुचविणाऱ्या दुसऱ्या कांहीं शिफारशी कराव्याशा वाटल्या तर त्याहि हें कमिशन करूं शकेल.

ही योजना आंखण्याचें काम इतकें महत्वाचें आहे कीं अमेरिकेनें तिच्या प्रतिनिधीच्या मदतीसाठीं साठ मदतनीस पाठविले आणि त्यांच्या पगाराची सोय करण्यासाठीं सालीना ६ लक्ष ६० हजार डॉलर मंजूर केले.

आपल्या या भांडखोर जगानें पूर्वीं कधीं पाहिली नव्हती अशी एक मोठी सत्ताधारी संस्था निर्माण करण्याबद्दलची एक अतिशय धाडशी योजना अमेरिकेनें या कमिशनपुढें ठेवली.

श्री. लाटेगंगाजी यांनीं त्यांच्या शेजाऱ्याच्या बिऱ्हाडापैकीं एखादी खोली लाटली तर, आजपर्यंत अनेक राष्ट्रांनीं जें केलें त्यापेक्षां त्यांनीं कांहीं निराळें केलें असें म्हणतां येणार नाहीं. पण या जगांतल्या सगळ्या अणुशक्तीचें या सत्ताधारी संस्थेकडे जर नियंत्रण आलें तर कोणत्याहि राष्ट्राला यापुढें तसें वागतां येणार नाहीं.

ही सत्ताधारी संस्था कोणत्याहि राष्ट्रापेक्षां सामर्थ्यवान व प्रत्येक राष्ट्राकडून अगदीं अलग अशी असेल. बड्या पांच राष्ट्रांसकट जगांतल्या एकूण एक सर्व राष्ट्रांत शांतता नांदविण्यास खरोखर समर्थ अशी हीच पहिली सत्ता ठरेल.

ती तशी ठरेल काय? होय, तिच्या निर्मितीबद्दलची योजना स्वीकारली जाईल तरच ठरेल.

ही योजना अशी आहे: अनेक राष्ट्रांच्या प्रतिनिधींची मिळून बनलेली 'इंटरनॅशनल ॲटमिक डेव्हलपमट ॲथॉरिटी' या नांवाची एक संस्था असेल. या संस्थेच्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल, आणि त्यापैकीं कोणालाहि नकार हक्क अथवा व्हेटोचा अधिकार असणार नाहीं.

ज्यांच्यापासून जगामध्यें अणु-स्फोटक बॉंब तयार करतां येतील अशा प्रकारच्या जगामध्यें ज्या ज्या कोणत्या वस्तू—युरेनियम, थोरियम, वगैरे—असतील त्या त्या सर्वांची ही संस्था संपूर्ण माहिती मिळवील. प्रत्येक खाणींत काय काय आहे तें पाहाण्यासाठीं ती आपले इंजीनियर पाठवील. अणुसंबंधाचें अधिक ज्ञान मिळविण्यासाठीं अभ्यास व संशोधन करण्याकरितां शास्त्रज्ञ लोकांना पगार देऊन ती त्यांना आपल्या पदरीं ठेऊन घेईल. अणुशक्तीचा कोणकोणत्या शांततामय कार्यांकडे उपयोग करून घेतां येईल त्या बाबतींत संशोधन व्हावें म्हणून ही संस्था इतर शास्त्रज्ञांनाहि मदत देईल, व त्यांच्या त्या कामासाठीं त्यांना जरूर पडणारा खास नमुन्यांचा भयंकर मालहि ती त्यांना फुकट किंवा विकत देईल. पण कोणालाहि या

संस्थेकडून खास परवाना काढल्याखेरीज अशा प्रकारचें संशोधन करतां येणार नाही.

ही संस्था इतर लोकांपासून फारशी रहस्यें चोरून ठेवणार नाहीं, आणि दुसऱ्या लोकांना तसें करतां येणार नाहीं अशी ती खबरदारी घेईल. लोकवस्तीपासून खूप लांब अशा डोंगरांतील गुहेमध्यें एखाद्या बुद्धिमान् पण मूर्ख माणसानें अत्यंत भयंकर असा अणुबॉंब बनविला आणि जगाला आश्चर्यचकित करण्यासाठीं त्याच्यावर त्यानें तो टाकला असें ती घडूं देणार नाहीं. त्यासाठी ती अगदीं डोळ्यांत तेल घालून पहारा करील.

युरेनियम, थोरियम किंवा अशाच प्रकारचीं फुटल्यावर अगदीं अणूअणू एवढाले तुकडे होणारीं सर्व द्रव्यें यांचें उत्पादन करणाऱ्या प्रत्येक कारखान्यावर याच संस्थेची मालकी असेल, आणि या कारखान्यांमध्यें तयार होणाऱ्या सर्व भयंकर मालावर याच संस्थेचें नियंत्रण अथवा मालकी असेल.

सरकारांनीं व खासगी कंपन्यांनी या संस्थेकडून जर आधी परवाने काढले तर त्यांना अणुशक्तीचा उपयोग करून वीज बनविणारीं इंजिनें आणि अशींच दुसरीं उपयुक्त साधनें तयार करण्याची मुभा मिळेल. त्यासाठी त्यांना लागणारी विशेष प्रकारची अणुशक्ति-सामुग्री ही संस्था स्वतः त्यांना देईल. दुसरी कोठूनहि ही सामुग्री मिळविण्याची त्यांना मोकळीक असणार नाहीं.

असल्या भयंकर साहित्याचा उपयोग करून त्यावर चालणाऱ्या एखाद्या कारखान्यानें, ज्यांचा स्फोट होईल अशा जर कोणत्या वस्तु तयार करण्यास आरंभ केला तर ही सभा ताबडतोब तो कारखाना आपल्या ताब्यांत घेईल. नंतर तो कारखाना चालविण्यासाठीं ही सभा आपलीं माणसें निवडील व त्यांनीं काय काय करावें तेंहि तीच त्यांना सांगेल.

दुसऱ्या कोणालाहि कोठेंहि असला कारखाना चालविण्याची मोकळीक मिळणार नाहीं. अमेरिकेच्या, सोव्हिएट रशियाच्या किंवा दुसऱ्या कोठल्याहि देशाच्या सरकारपेक्षां या संस्थेला अधिक सत्ता असेल, आणि ती या सरकारांनाहि अणुशक्तीचीं कांहीं साधनें बनवूं देणार नाहीं.

कोठें कोणत्या देशांत अणुशक्तीपासून कसलें एखादें भयंकर साधन निर्माण केलें जात आहे कीं काय याची पाहाणी करण्यासाठीं सर्व कारखान्यांत, 'पॉवर हौसेस' मध्यें व संशोधन शाळांमध्यें आपलीं माणसें पाठवून पाहाणी करण्याचा या संस्थेला अधिकार असेल.

या 'इंटरनॅशनल ॲटमिक डेव्हलपमेण्ट ॲथॉरिटी'च्या यशाचें मर्म

अगदीं सोपें आहे. कायदे मोडणाऱ्या कोणालाहि सुरक्षा-मंडळ अटक करील व शिक्षा करील. यांतच त्या यशाची गुरुकिल्ली आहे.

या संस्थेकडून खास परवानगी न घेतां, ज्यांच्यापासून अणुबाँब तयार करतां येतात अशीं भयंकर द्रव्यें संग्रहीं ठेवण्याची, ते बाँब तयार करतां येतील असा कारखाना उभारण्याची, किंवा त्या प्रकारचा कारखाना उभारतां येईल असा अभ्यास करण्याची अगर अणुशक्तीबद्दलचें कोणत्याहि प्रकारचें संशोधन करण्याची बंदी करणें असें या संस्थेचे नियम असतील.




या संस्थेची मालकी असलेल्या किंवा या संस्थेच्या परवानगीनें चालणाऱ्या एखाद्या कारखान्याचा किंवा प्रयोगशाळेचा कोणी ताबा घेतला, किंवा तिच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा कोणी प्रयत्न केला तर ते कोणाहि सरकारचे सैनिक असले अथवा अधिकारी असले तरीसुद्धां सुरक्षा-मंडळ त्यांना अटक करूं शकेल, आणि व्हेटोचा अधिकार काढून घेतला गेलेला असल्यामुळें कोणतेंहि राष्ट्र त्याला या कामीं अडथळा करूं शकणार नाहीं.

म्हणजे एकंदर परिस्थितींत काय फरक पडलेला दिसेल पहा: यूनोच्या सध्यांच्या सनदेप्रमाणें सुरक्षा-मंडळ एखाद्या संबंध राष्ट्राला शासन करूं शकतें, पण त्या राष्ट्रांतल्या विशिष्ट व्यक्तींचें कांहींसुद्धां पारिपत्य करूं

शकत नाही. या नव्या योजनेमुळें कोणाहि गुन्हेगार व्यक्तीला शासन करण्याचा तिला अधिकार प्राप्त होतो.

अमेरिकेनें पुढें ठेवलेली योजना ही अशी आहे. ॲटमिक एनर्जी कमिशननें या योजनेचा अभ्यास करणें आणि ही नवी आंतरराष्ट्रीय सत्ता स्थापन करण्याबद्दलची 'ॲटमिक सनद' तयार करणें ही पहिली पायरी आहे. नंतर सुरक्षा-मंडळांत त्या सनदेवर मतें घेतलीं जातील. त्या मंडळांतील राष्ट्रांनीं जर तिचा स्वीकार केला तर 'इंटरनॅशनल ॲटमिक डेव्हलपमेण्ट ॲथॉरिटी' ही सत्ताधारी संस्था अस्तित्वांत येईल व काम करूं लागेल. तसें जेव्हां घडून येईल तेव्हा पुढील तीन गोष्टी करण्याचें अमेरिकेच्या सरकारनें वचन दिलें आहे : अणुबाँब तयार करण्याचें बंद करणें, अणु-सनदेंत सांगितलें जाईल त्या कोणत्याहि प्रकारें तिच्याजवळ सध्यां असलेल्या अणुबाँबची वासलात लावणें, आणि ज्या वेळी ही सत्ताधारी संस्था अणुशक्तीचा ताबा घेण्यास तयार होईल त्यावेळीं आपल्याजवळचें सर्व अणुविषयक ज्ञान तिच्या स्वाधीन करणें.

ॲटमिक एनर्जी कमिशनवरील अमेरिकेचा प्रतिनिधी अमेरिकेचे अध्यक्ष सीनेटच्या संमतीनें नियुक्त करतात व त्याला महिन्याला १,००० डॉलर पगार दिला जातो.

## प्रकरण १३

# यूनोचें स्वरूप कसें बदलतां येईल?

यूनोचें सध्यां जें स्वरूप आहे तें तुम्हांला समाधानकारक वाटतें काय? तिच्या हातून कांहीं कामगिरी होईल असें तुम्हांला वाटतें काय? जगांतल्या सगळीकडच्या भागांतील माणसांचें जीवन अधिक सुखी आणि समृद्ध होण्यासाठीं आवश्यक तें तें कार्य ती करूं शकेल काय? एखाद्या अणुयुद्धांत मरण पावण्यापासून ती आपणा सर्वांना वांचवूं शकेल काय?

सध्यांच्या यूनोच्या सनदेंत नवीन दुरुस्त्यांची भर घालून आपण म्हणजे जगांतील सर्व लोक – तिला आपणास हवें तसें स्वरूप देऊं शकूं.

अशी दुरुस्ती कोणीहि सुचवूं शकेल. यूनोचेंहि एखादें मंडळ किंवा कमिशन, एखादी दुरुस्ती करण्याची शिफारस करूं शकेल. तुम्हीं सुद्धां यूनोंतल्या तुमच्या प्रतिनिधींना पत्र लिहून कोणत्या प्रकारचे फेरफार करवून घेण्यासाठीं त्यांनीं त्यांच्या मतांचा उपयोग करावा असें तुम्हांला वाटतें तें त्यांना कळवूं शकाल.

यूनोच्या सनदेंत सुचविण्यांत येणाऱ्या कोणत्याहि दुरुस्ती-सूचनेवर आमसभेंत चर्चा व्हावी लागते. तेथें ती उपसूचना कदाचित बदलली जाईल, कदाचित सुधारली जाईल. यूनोचे सभासद असलेल्या सर्वच राष्ट्रांचे प्रतिनिधी या आमसभेंत असल्यामुळें कोणत्या उपसूचनांना त्या राष्ट्रांचा कदाचित पाठिंबा मिळेल आणि कोणत्या उपसूचना खात्रीनें फेटाळल्या जातील तें त्यांना माहीत असतें.

आमसभेमध्यें दोन-तृतियांश मतें पडून एखादी उपसूचना मंजूर झाली म्हणजे तिच्या प्रती तयार करवून त्या सर्व सरकारांकडे पाठविल्या जातात व त्यांना त्या दुरुस्तीवर पसंतीचें शिक्कामोर्तब करण्यास सांगण्यांत येतें. कोणत्याहि राष्ट्राच्या सरकारनें अधिकृत रीत्या त्या उपसूचनेचा स्वीकार केला कीं त्यानें तिच्यावर शिक्कामोर्तब केलें असें ठरतें.

अशा प्रकारें यूनोच्या एकूण सभासदांपैकीं दोन-तृतियांश (बड्या पांचासकट) सभासदांनीं एखाद्या दुरुस्तीवर शिक्कामोर्तब केलें कीं मग ती उपसूचना यूनोच्या सनदेचाच एक भाग बनते. यूनोच्या सनदेंतील पहिल्या एखाद्या वाक्यामध्यें आणि या नव्या दुरुस्तीमध्यें विरोध असला तर

तें पहिलें वाक्य निरुपयोगी ठरतें आणि नवी उपसूचनाच ग्राह्य धरली जाते.

' बड्या पांच राष्ट्रांपैकीं कोणत्याहि एका राष्ट्रानें संकलिपत दुरुस्तीवर शिक्कामोर्तब करण्याला नकार दिला म्हणजे ती सनदेमध्यें घालतां येत नाहीं. यूनो सनदेमध्यें केल्या जाण्यासारख्या कांहीं दुरुस्त्या पुढें दिल्या आहेत:

अमेरिकेच्या राज्यघटनेमध्यें करण्यांत आलेल्या दहा दुरुस्त्यांनीं तेथल्या सर्व जनतेला भाषण-स्वातंत्र्य, धर्म-स्वातंत्र्य, ज्यूरीपुढेंच कोणाचाहि खटला चालविला जाणें हे, आणि असेच दुसरे अनेक अधिकार बहाल केले आहेत. जगांतल्या प्रत्येक माणसालाहि हेच अधिकार मिळावेत म्हणून यूनोचें 'मानवी हक्कां' संबंधाचें कमिशन यूनोच्या सनदेला कांहीं उपसूचना सुचविण्याचा संभव आहे.

सुरक्षा-मंडळांत असलेल्या बड्या पांच राष्ट्रांना जो नकार हक्क आहे तो अजिबात काढून घ्यावा, किंवा कोणतेंहि एखादें भांडण शांततामय मार्गानींच सोडविण्याचा तें मंडळ प्रयत्न करीत असतांना तरी त्या पांच राष्ट्रांपैकीं कोणाला तो वापरतां येऊं नये यासाठीं ऑस्ट्रेलिया व दुसरीं अनेक छोटीं राष्ट्रें यांनीं एक उपसूचना सुचविली आहे.

बड्या पांच राष्ट्रांचा हा नकार हक्क बदलण्याचा दुसरा एक, पण जरा चमत्कारिक वाटणारा असा, मार्ग आहे. दोन राष्ट्रांनी जर मनांत आणलें तर तीं एकमेकांत मिसळून एकच राष्ट्र बनूं शकतील असें अमेरिकेच्या सीनेटर्सनीं दाखवून दिलें आहे. लॅटिन अमेरिकेमधल्या, स्पॅनिश भाषाभाषी अशा १८ लोकसत्ताक राज्यांना जर वाटलें तर तीं सर्व एकमेकांस जोडून घेऊन 'युनायटेड स्टेटस् ऑफ स्पॅनिश अमेरिका' या नांवाचें एक राष्ट्र बनतील. मग तीं लहान लहान राष्ट्रें उरणार नाहींत. साडेसात कोटी लोकसंख्या असलेलें असें एक बडें राष्ट्र तीं बनूं शकतील. त्यानंतर, त्या नव्या राष्ट्राला सुरक्षा-मंडळांत कायमची जागा, आणि बाकीच्या बड्या राष्ट्रांसारखाच त्यालाहि नकार हक्क मिळण्याकरितां यूनोच्या सनदेंत दुरुस्ती करण्याची तें मग मागणी करूं शकेल. लहान लहान राष्ट्रांनीं कायमचे लहानच राहिलें पाहिजे असें नाहीं. तीं एकजूट करून मोठें राष्ट्र बनूं शकतील.

यूनोचे प्रतिनिधी निवडण्याची आज जी पद्धति आहे तीहि आपल्याला बदलतां येईल. अमेरिकेच्या सीनेटचे सभासद जनतेनें निवडलेले नसत; ते निरनिराळ्या संस्थानांतील कायदेमंडळांनी नेमलेले असत. या सभासदांची निवड करण्याचा जनतेलाच अधिकार द्यावा असें १९०४ मध्यें ऑरेगॉन या संस्थानानें ठरविलें. पुढें लवकरच इतर संस्थानांनींहि तसेंच ठरविलें. इ. स. १९१० सालापर्यंत अमेरिकेच्या संस्थानांपैकीं तीन-चतुर्थांश संस्थानांतर्फे

सभासद कायदे मंडळांकडून नेमले जाण्याऐवजीं लोकांकडून निवडले जाऊं लागले होते. त्यानंतर तीनच वर्षांनीं अमेरिकेच्या राज्यघटनेमध्यें 'एक दुरुस्ती करण्यांत आली व सीनेटचे सगळे सभासद जनतेनें निवडलेलेच असले पाहिजेत असें ठरविण्यांत आलें.

कदाचित् याच मार्गानें यूनो ही संघटनाहि मोठी होत जाईल. सध्यां यूनोच्या आमसभेचे सर्व सभासद ते ज्या ज्या राष्ट्रांतून येतात त्या त्या राष्ट्रांच्या सरकारांनी नेमलेले असतात. पण ते जर त्यांच्या त्यांच्या देशांतल्या मतदारांनी निवडलेले असले तर त्यांजवर त्यांच्या त्यांच्या लोकांचा जास्त विश्वास बसेल.

तुमच्या देशातर्फेच्या सभासदांची तुम्हीच निवड करावी असें तुमची लोकसभा ठरवूं शकेल. त्याच्यासाठीं यूनोच्या सनदेमध्यें दुरुस्ती करण्याची कांहीं आवश्यकता उत्पन्न होणार नाहीं. दुसऱ्या राष्ट्रांनाहि तसेंच करतां येईल. आणि असें होतां होतां एक दिवस असा उजाडेल कीं ज्या दिवशी, 'यूनोच्या आमसभेचे सर्व सभासद त्यांच्या त्यांच्या देशांतील जनतेनेंच निवडलेले असले पाहिजेत,' अशी यूनोच्या सनदेमध्यें दुरुस्तीहि केली जाईल. ब्रिटिश सरकारनें अधिकृतरीत्या तशी सूचना पुढें ठेवलेलीच आहे.

आमसभा कायदे करूं शकेल असा तिला अधिकार देण्याकरितां सनदेमध्यें तशी दुरुस्ती करण्यांत आली पाहिजे असें इक्वेडॉर व फिलिपाईन्स या देशांच्या प्रतिनिधींनीं सुचविलें आहे. कांही अमेरिकन सीनेटर्सहि या सूचनेला अनुकूल असें बोलले आहेत. तसें घडून आलें तर, कोणाहि राष्ट्रानें शांततेच्या काळांत आपल्या तरुणांना लष्करी शिक्षण घ्यावयाला लावण्यास आमसभा बंदी करूं शकेल. यूनोच्या सबंध जगाचें सरकार बनविण्याच्या कार्याचा हा आरंभच होय.

युद्ध उपस्थित करण्याचा प्रयत्न करणाऱ्या कोणाहि माणसाला अटक करण्याचा व त्याला शिक्षा करण्याचा यूनोला अधिकार दिला जावा असें पुष्कळच लोक म्हणत आहेत. यूनोच्या सनदेंत तशी दुरुस्ती करून हा अधिकार तिला देतां येणें शक्य आहे.

यूनोच्या सनदेमध्यें कोणत्या दुरुस्त्या आवश्यक आहेत तें पाहाण्यासाठीं त्या सबंध सनदेवर चर्चा करावी असें एकूण सभासदांपैकीं, बड्या पांचासकट, दोन-तृतियांश सभासद राष्ट्रांना वाटलें तर सॅन फ्रॅन्सिस्को येथें भरलेल्या परिषदेसारखी आणखी एक परिषद तीं बोलावूं शकतील (कलम १०९). अशी परिषद भरण्याचा पुष्कळच संभव आहे, कारण अशी परिषद भरविण्याबाबतींत नऊ वर्षांच्या अवधींत जर केव्हांच दोन-तृतियांश राष्ट्रांचें

एकमत झालें नाहीं तर दहाव्या वर्षी सगळ्या राष्ट्रांपैकीं नुसत्या बहुसंख्य राष्ट्रांच्या (यांत सुरक्षा-मंडळांतील कोणतीं तरी ७ राष्ट्रें पाहिजेत) पाठिंब्यावर अशी परिषद बोलावतां येईलच.

यूनो संघटनेमध्यें मोठेसे कांहीं फेरबदल करण्याच्या बाबतींत राष्ट्रांचें एकमत होऊं शकेल कीं काय तें पाहाणें हा या परिषदेचा उद्देश असेल. तथापि त्या परिषदेनें कोणतेहि फेरफार करण्याला जरी अनुमति दिली तरी दुसऱ्या कोणत्या दुरुस्त्या सुचविल्या गेल्यास त्या जशा सर्व राष्ट्रांच्या सरकारांकडे पाठविल्या जातात, तसेंच हे सूचित फेरफारहि पाठवावे लागतील. यूनोच्या एकूण सभासद राष्ट्रांपैकीं बड्या पांच राष्ट्रांसकट दोन-तृतियांश राष्ट्रांना जे फेरफार मान्य होतील तेच फक्त सनदेला जोडले जातील.

# प्रकरण १४

## इशाऱ्याचा एक शब्द

एका फुटलेल्या बोटींतले दोन इसम वाहात वाहात एका निर्जन किनाऱ्याला लागले. त्यांना जरा विश्रांति मिळाल्यावर आणि चालतां येऊं लागल्यावर ते जमिनीवर फिरायला व कोठें काय मिळेल तें पहायला निघाले. पण शेवटी त्यांना तो भूप्रदेश वाटोळा आहे असेंच आढळून आलें. कारण तें एक बेटच होतें. तेव्हां मात्र त्यांचा धीर खचला. वारे सुटले, त्यांच्या अंगावर पाऊस पडला, आणि रात्र पडल्यावर त्या बेटांत थंडीचा कडाका भासूं लागला.

घाईघाईनें ते आपापल्यासाठी एक एक घर बांधूं लागले. पण तें काम कठीण होतें, कारण एकटचा माणसानें एक एक बहाल उचलणें क्वचितच शक्य आहे.

ते जेव्हां त्यांच्या पोटासाठीं कांहीं अन्न शोधूं लागले तेव्हां तेंहि त्यांना कठीण वाटूं लागलें, कारण तेथें फारसें अन्नच नव्हतें. जें कांहीं त्यांच्या हातीं लागे तें ते ओढून घेत आणि आपल्या तोंडात कोंबीत. एकानें तर एका ओढयांत पकडलेले लहानसे मासे एकटयानेंच घेतले आणि तसेच कच्चे खाल्ले. त्याबरोबर "तूं अगदींच जंगली आहेस" असें दुसरा त्याच्या अंगावर ओरडून म्हणाला.

पहिल्याला त्याचा फार राग आला, पण तो त्याला कांहीं बोलला मात्र नाहीं.

शेवटीं जरा इकडे तिकडे नजर टाकायला जेव्हां त्यांना फुरसत मिळाली तेव्हां, आपल्या हातांनी जें काय काम आपल्याला करतां येईल त्याच्याशिवाय आपल्याजवळ दुसरें कांहीहि नाहीं, इतके आपण गरीब आहोंत असें त्यांना आढळून आलें. पण त्या दुसऱ्या माणसानें त्याच्या मनाची खिन्नता जरा कमी करण्याचा प्रयत्न चालविला. त्यानें किनाऱ्यावर पडलेलीं पक्ष्यांचीं अनेक-रंगी पिसें गोळा केलीं आणि त्यांच्यामुळें आपण सुंदर दिसतों अशी कल्पना करून त्यानें ती त्याच्या डोक्याला बांधलीं.

"अरे मूर्खा!" ओरडून तो पहिला मनुष्य म्हणाला, "आपला मुखडा तर बघ! किती मूर्ख मनुष्य आहेस तूं!"

"जंगली माणसानें मला मूर्ख म्हटलेलें मी मुळींच सहन करणार नाही." रागारागाने तो दुसरा ओरडला.

"एखाद्या मूर्खानें मला जंगली म्हटलेलें मीहि ऐकून घेणार नाही," आपण किती रागावलों आहोंत तें दाखवीत तो पहिला गुरगुरला.

प्रत्येकजण दुसऱ्यानें बांधलेल्या घराकडे धांवला आणि त्यानें तें तें घर कोसळून टाकलें.

आणि मग पुन्हां त्यांची हृदयें भीतीनें भरून आलीं; कारण वारे वाहूं लागले, पावसानें त्यांना भिजविलें व रात्री तेथें थंडीहि खूप कडक पडली.

हळूहळू त्यांच्या रागाचा पारा खालीं आला.

शेवटीं त्यांतला एकजण स्वत:साठीं घर बांधण्याची पुन्हा खटपट करूं लागला. दुसरा तें नुसतें पाहात उभा होता. पण पहिल्या माणसाला एकट्यानेंच एक बहाल उचलतां येईना, तें त्याला कठीण पडूं लागलें.

तेव्हां तो दुसऱ्याला हांक मारून म्हणाला, "ये मला मदत कर! तुझें घर बांधण्यासाठीं तुला मी मदत करीन."

अशा रीतीनें दोघांनीं एकजुटीनें काम केलें तेव्हां तें सोपेहि झालें. थोड्याच अवधींत पहिल्यापेक्षां जास्त चांगलीं घरें त्यांना मिळालीं.



"आपण एकमेकांना मदत करायला नेहमी असेच तयार राहूं या," पहिला म्हणाला, "अशा रीतीनें राहिलों तरच या बेटावर आपल्या जीवनांत कांही सुख लाभेल. तू तुला पाहिजे त्या तऱ्हेनें मासे खा. मला त्याच्याशीं कांही कर्तव्य नाहीं."

"बरें आहे तर," दुसरा संमति देत म्हणाला, "आणि तूं कांहीं जरी ल्यालास तरी तूं मूर्ख आहेस असें मीहि मानणार नाहीं. आपल्याला जर मित्र बनावयाचें आहे तर आपण एकमेकांना सांभाळून घेतलें पाहिजे."

ते दोन इसम म्हणजे तुम्हीं आणि मी, आणि तें बेट वाटोळें कां तर हें जगच वाटोळें आहे. म्हणून आपल्यापैकीं पुष्कळच लोक खायला पुरेसें अन्न नाहीं, ल्यायला पुरेसें वस्त्र नाहीं इतके गरीब आहेत. आपल्यापेक्षां निराळ्या असलेल्या लोकांच्या भीतीनें, त्यांना नष्ट करण्यासाठीं, बॉंब तयार करण्यासाठीं आपल्यांतला प्रत्येकजण पैशांची उधळपट्टी करीत राहिला आहे.

आपण एकमेकांचीं घरें बांधण्याच्या कामीं जर एकमेकांना मदत करूं तरच या आपल्या वाटोळ्या बेटावरचें आपलें जीवन सुधारेल. आपल्याजवळ जें कांहीं थोडेंफार आहे तेंहि एकमेकांच्या रागानें नष्ट करून आपलें भागणार नाहीं.

# भाग ४ था

## वस्तुस्थितिनिदर्शक गोष्टी व कागदपत्रें

प्रस्तावना :—कोणत्या प्रकारें उल्लेख करावा.

यूनोमध्यें अनेक राष्ट्रें असलीं तरी तिचा संयुक्त राष्ट्रें असा अनेव वचनी उल्लेख करूं नये. ती एक संघटना असल्यामुळें तिचा एकवचर्न उल्लेख करावा. उदाहरणार्थ, जगांत शांतता नांदविण्याचा आणि जगांतील माणसांच्या राहाणीचें मान वाढविण्याचा यूनोचा दृढ निश्चय आहे.

सनदेमध्यें यूनोचा ही संघटना असाच उल्लेख करण्यांत आला आहे.

सभासद म्हणजे यूनोचा सभासद झालेलें कोणतेंहि राष्ट्र पण यूनोच्य सुरक्षा-मंडळ, आर्थिक व सामाजिक मंडळ वगैरे शाखांचे सभासद असलेल्य राष्ट्रांचा उल्लेख करतांना तसा नांवनिशीवार उल्लेख करावा लागेल.

## प्रकरण १५

# कोणकोणतीं राष्ट्रें यूनोचीं सभासद आहेत

दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं जर्मनी व जपान यांजविरुद्ध जीं एक्कावन राष्ट्रें लढत होती तींच यूनोची अगदीं प्राथमिक सभासद झाली. त्या सर्वांनीं यूनोच्या सनदेवर सह्या केल्या, आणि त्यांच्या सरकारांनीं अधिकृतरीत्या त्या सनदेला मान्यता दिल्यानंतर ती सर्व राष्ट्रें यूनोची सभासद बनली. त्या सर्व राष्ट्रांचीं नांवें इंग्रजी अक्षरानुक्रमानें पुढें दिली आहेत :—

अर्जेंटिना
ऑस्ट्रेलिया
बेल्जियम
बोलीव्हिया
ब्राझिल
बायलोरशिया (श्वेतरशिया)
कॅनडा
चिली
चायना
कोलंबिया
कोस्टा रिका
क्यूबा
झेकोस्लोव्हाकिया
इराक
लिबेनॉन
लायबेरिया
लक्झेंबर्ग
मेक्सिको
नेदर्लंडस
न्यू झीलंड
नायकाराग्वा
नॉर्वे
डेन्मार्क
डोमीनिकन रिपब्लिक
इक्वेडोर
इजिप्त
एल साल्व्हाडॉर
एथिओपिया
फ्रान्स
ग्रीस
ग्वाटेमाला
हैती
होंडुरास
इंडिया (भारत)
इराण
पोलंड
सौदी अरेबिया
सीरिया
टर्की (तुर्कस्तान)
युक्रेन
युनियन ऑफ साऊथ आफ्रिका
युनियन ऑफ सोव्हिएट सोशालिस्ट रिपब्लिक्स
युनायटेड किंग्डम (इंग्लंड)

| | |
|---|---|
| पनामा | युनायटेड स्टेट्स् (अमेरिका) |
| पॅराग्वे | युरूग्वे |
| पेरू | व्हेनेझुएला |
| फिलिपाईन कॉमनवेल्थ | यूगोस्लाव्हिया |

दुसऱ्या एखाद्या राष्ट्राला जर यूनोमध्यें सामील होण्याची इच्छा झाली तर सनदेवर सही करतांना दुसरें कोणतेंहि राष्ट्र जी जी वचनें देत असेल तीं ती सर्व वचनें देण्याला आमची तयारी आहे, आणि प्रत्येक सभासदानें ज्या गोष्टी केल्याच पाहिजेत असें सनदेमध्यें म्हटलेलें आहे त्या त्या सर्व गोष्टी करायची आमची इच्छाहि आहे, असें या संघटनेच्या सेक्रेटरी-जनरलला पत्र लिहून त्यानें कळविलें पाहिजे.

ही अतिशय गंभीर बाब आहे. सनदेवर सही करणारें प्रत्येक राष्ट्र त्या सनदेच्या पहिल्या कलमांतील उद्दिष्टें साध्य होण्यासाठी झटण्याचें, आणि दुसऱ्या कलमांतील तत्वांना मान देण्याचें कबूल करीत असतें. तें आपले वाद शांततामय मार्गांनीच मिटविण्याचे आणि दुसऱ्या कोणाजवळचें कांहीं हिसकावून घेण्यासाठीं कधींहि शस्त्रबळाचा उपयोग न करण्याचें वचन देत असतें. सुरक्षा-मंडळाच्या उपयोगासाठीं कांही सैन्यबळ तयार ठेवण्याचें, आणि एखाद्या आक्रमक राष्ट्राला कोणी कांहीं विकत देऊं नये वगैरेसारखे सुरक्षा-मंडळाचे निर्णय अंमलांत आणण्याचे कामी त्याला (सुरक्षा-मंडळाला) मदत करण्याचें अथवा दुसऱ्या कोणाला त्या आक्रमकाशी व्यापार करूं न देण्याकरितां आपलें सैन्यहि पाठविण्याचें तें वचन देत असतें. तसेंच त्यानें कोणाशीं कांहीं करारमदार केले तर त्या सर्व करारमदारांच्या नकला, छापविल्या जाऊन कोणालाहि पहातां येण्यासाठीं, सेक्रेटरिएटकडे पाठविण्याचेंहि तें कबूल करीत असतें. त्यानें जेवढी रक्कम दिली पाहिजे असें आमसभा ठरवून देईल तितकी रक्कम यूनोला देण्याचेंहि तें कबूल करतें. प्रत्येक माणसाचें जीवन अधिक स्वतंत्र व सुखी करण्याचें आर्थिक व सामाजिक मंडळानें जें कार्य अंगिकारलेलें आहे त्या कार्यात त्याला मदत करण्याचेंहि तें कबूल करतें. कोणाहि माणसाला केवळ त्याच्या धर्माच्या अगर वंशाच्या कारणामुळें वाईट रीतीनें वागविणार नाहीं (कलम १, परिच्छेद ३), असेंहि तें वचन देतें.

यूनोचा सभासद होण्याची परवानगी मागणारें राष्ट्र शांततेची आवड असणारेंच राष्ट्र आहे त्याला आपणांत सामील करून घ्यावें असें सुरक्षा-मंडळांतील बड्या पांच सभासद-राष्ट्रांसह निदान सात सभासदांनीं जर मत दिलें (कलम ४), आणि आमसभेंतील एकूण सभासदांपैकी

दोन-तृतियांश सभासदांनींहि जर तसेंच मत दिलें तर तें राष्ट्र यूनोचा सभासद बनतें.

एखाद्या राष्ट्रानें अशी परवानगी मागितली, आणि सुरक्षा-मंडळ किंवा आमसभा यांपैकींहि कोणीहि जर त्याला सामील करून घेण्यास नकार दिला तर तें राष्ट्र कांहीं दिवस वाट पाहून, पुनः तशीच परवानगी मागूं शकेल. किती वेळां त्याला अशी परवानगी मागतां येईल याला कांहीं मर्यादा नाहीं.

पुढें नांवें दिलेलीं राष्ट्रें सभासद होण्याचा संभव आहे. यांतील कांहीं राष्ट्रें युद्धांत तटस्थ होती, कांही शत्रुपक्षांत होतीं.

तटस्थ राष्ट्रें :—जीं महायुद्धांत सामील नव्हतीं अशीं सबंध जगांत एकूण ५–६ राष्ट्रेंच आहेत.

| | |
|---|---|
| अफगाणिस्तान | स्पेन |
| आयर (आयर्लंड) | स्वीडन |
| पोर्तुगाल | स्वित्झर्लंड |

शत्रु राष्ट्रें :—हिटलरच्या बाजूनें युद्धांत पडण्याची या नऊ राष्ट्रांनाच दुर्दैवानें बुद्धि झाली होती.

| | |
|---|---|
| ऑस्ट्रिया | इटाली |
| बल्गेरिया | जपान |
| फिन्लंड | रूमानिया |
| जर्मनी | सयाम (थाईलँड) |
| हंगेरी | |

या नऊ राष्ट्रांपैकीं कोणाहि राष्ट्रानें दोस्तांशीं शांततेच्या तहावर सही केली कीं मग तें यूनोमध्यें प्रवेश मागूं शकेल.

वसाहतींना आणि ज्यांना स्वराज्याचे अधिकार नाहींत अशा इतर देशांना यूनोचे सभासद होतां येणार नाहीं. पण ज्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें होतें अशीं बरींच राष्ट्रें–उदाहरणार्थ, अल्बानिया, ट्रान्सजॉर्डन, आइसलँड, कोरिया (चोसेन) आणि मंगोलिया वगैरे—नुकतींच स्वतंत्र झालीं आहेत अगर लवकरच स्वतंत्र होतील. स्वतंत्र होणाऱ्या प्रत्येक राष्ट्राला मला यूनोचा सभासद करून घ्या असें म्हणतां येईल.

आमसभेनें (ता. ८ फेब्रुवारी १९४६ रोजीं) एक ठराव मंजूर केला, त्यांत जनरल फ्रँको हे जोंपर्यंत स्पेनचे डिक्टेटर (सर्वसत्ताधारी) आहेत तोंपर्यंत त्या देशाला यूनोचा सभासद होऊं दिलें जाणार नाहीं, असें म्हटलेलें आहे.

वर नांवें दिलेल्या राष्ट्रांपैकीं अफगाणिस्तान, आइसलँड व स्वीडन याच

तीन राष्ट्रांना यूनोस प्रथम येऊन मिळण्याचा मान मिळाला, आणि त्याच्यामागून लगेच सयामनेंहि तसेंच केलें. १९४६ सालच्या नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यांत प्रथम सुरक्षा-मंडळानें व मग आमसभेनें त्यांना सभासद करून घेतलें.

एखाद्या राष्ट्राला यूनोचें सभासदत्व सोडावयाचें असेल तर—सभासदत्व टाकून देण्यासंबंधांत यूनो सनदेमध्यें कांहींच उल्लेख नाही.

आपण राष्ट्रसंघ सोडावा असें जर एखाद्या राष्ट्राला वाटलें तर मग त्याचें कारण योग्य असो अगर नसो—त्याला तो संघ सोडण्याचा अधिकार आहे, असें जुन्या राष्ट्रसंघाच्या करारपत्रांत (कॉव्हेनंट) म्हटलेलें होतें. त्याचा प्रत्यक्ष परिणाम असा झाला कीं जेव्हां त्यानें (राष्ट्रसंघानें) एखाद्या राष्ट्रावर त्याच्या गैरवागणुकीबद्दल टीका केली तेव्हां तें राष्ट्र लगेच राष्ट्रसंघांतून बाहेर पडलें. सबंध जग जिंकावें असें जेव्हां जर्मनीला वाटूं लागलें तेव्हां जर्मनीनें प्रथम राष्ट्रसंघाचा राजीनामा दिला.

पण आतां, एखाद्या राष्ट्रानें यूनोचा राजीनामा दिला तरी त्याचें कांहीं भलें होणार नाही. कारण, या संघटनेला तिचे सभासद असलेल्या राष्ट्रांवर जेवढी सत्ता गाजवितां येईल तेवढीच सभासद नसलेल्या राष्ट्रांवरहि गाजवितां येईल असें कलम २, परिच्छेद ६ मध्यें म्हटलेलें आहे. युद्ध सुरू करण्याचा धाक घालणाऱ्या कोणाहि राष्ट्राविरुद्ध, त्यानें यूनोचें आपलें सभासदत्व परत घेतलें असलें तरी, सुरक्षा-मंडळ आपल्या युद्धबोटी व आपलीं बाँबफेकी विमानें पाठवूं शकेल.

असें असलें तरीहि एखाद्या राष्ट्राला वाटलें तर तें यूनोबाहेर पडूं शकेल. यूनो जर लढाया टाळू शकली नाहीं, किंवा जर तिनें कपटी मार्ग अनुसरले आणि दुष्ट कृत्यें केली तर पुष्कळच राष्ट्रें तिचें सभासदत्व सोडतील.

कांहीं कांहीं कारणासाठीं एखाद्या राष्ट्राला यूनोमधून काढूनहि टाकतां येईल. युद्ध सुरू करण्याचा धाक दाखविण्यापासून किंवा प्रत्यक्ष लढाई करण्यापासून एखाद्या राष्ट्राला परावृत्त करण्यासाठीं सुरक्षा-मंडळानें त्याच्या विरुद्ध कृति सुरू केल्यावर, सदरहु राष्ट्राचें सभासदत्व तात्पुरतें रद्द करावें असें सुरक्षा-मंडळ व आमसभा हीं ठरवूं शकतील. तसें झाल्यास तें राष्ट्र तात्पुरतें यूनोच्या बाहेर असेल.

त्यानें युद्धाच्या धमक्या देणें जर बंद केलें तर, एकटच्या सुरक्षा-मंडळाच्या ठरावानें त्याचें पूर्ण सभासदत्व त्याला परत देतां येईल.

पण जर, एखादें राष्ट्र, न्याय्य वागणूक आणि माणुसकीचा आचार यांजबद्दलच्या यूनोच्या कल्पनाविरुद्ध एकसारखें वागत राहील तर,

सुरक्षा-मंडळ व आमसभा अशी दोघे मिळून त्या राष्ट्राची यूनोंतून पूर्णपणें हकालपट्टी करतील.

तसे घडल्यानंतर, त्या राष्ट्रानें जर आपली वागणूक बदलली आणि यूनोच्या सभासदत्वाची पुनः त्याला जरुरी वाटूं लागली तर, जणु कांहीं तें कधीच यूनोचा सभासद नव्हतें अशा प्रकारें अगदीं नव्यानेंच सभासद होऊं इच्छिणारांसारखी त्याने विनंति केली पाहिजे.

# प्रकरण १६

## खास कामासाठीं खास संघटना

या पुस्तकांतील आर्थिक व मामाजिक मंडळाबद्दलच्या प्रकरणांत (दुसऱ्या भागाचे पांचवें प्रकरण) खास संघटना म्हणजे काय आहे, त्यांना काय करतां येईल, आणि यूनोशी त्यांचा कोणत्या प्रकारचा संबंध आहे तें सांगितलेले आहे.

सध्यां ज्या संघटना काम करूं लागल्या आहेत त्यांची माहिती या प्रकरणांत सांगितलेली आहे. अशाच आणखी कांही संघटना निर्माण करण्याच्या योजना ठरल्या असून, अशाच आणखी कांही संघटना निर्माण करण्याबद्दलच्या कल्पना लोक बोलून दाखवीत आहेत.

**फाओ (FAO)**: आतां नव्या अशा ज्या कांही कायम टिकणाऱ्या संघटना निर्माण झाल्या आहेत त्यांतली अगदीं पहिली संघटना म्हणजे यूनोची अन्न व शेतकी संघटना होय. हीच प्रथम निर्माण होण्याचें कारण अन्न हा आपला मूलभूत प्रश्न आहे हें होय. प्रत्येकाला अन्न मिळेलच असें करण्याकडे जर आपण लक्ष दिले नाही तर आपणाला फारसें कार्य करतांच येणार नाहीं.

१९४३ साली मे महिन्यांत व्हर्जीनिया संस्थानांतील हॉट स्प्रिंग्ज येथें ४४ राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या एका बैठकीमध्यें ही संघटना स्थापन करण्याची योजना आंखली गेली. या बैठकीमध्यें नेमल्या गेलेल्या एका समितीने 'फाओ'ची घटना लिहून तयार केली. जवळ जवळ यूनोच्या सनदेइतकीच ही घटनाहि लांबलचक आहे. पुढें लवकरच ४२ राष्ट्रांनीं तिला मान्यता दिली. अमेरिकेनें १९४५ सालच्या ४ ऑगस्टला तिचा स्वीकार केला. अजून तिचे सभासद न झालेल्या अशा अनेक (इटाली व हंगेरी यांच्यासह) राष्ट्रांना तिनें पुढल्याच वर्षीं आपलें सभासदत्व दिलें.

लोकांना पुरेसें अन्न खायला मिळत नसल्यामुळेंच फाओ ही संघटना स्थापन केली.

'फाओ'चा तीन 'फ'कारांशी संबंध आहे: फार्म्स (शेतें), फिशरीज (मासे व इतर जलचर), आणि फॉरेस्टस् (जंगलें). जमीनी, वृक्ष, तलाव आणि इतर नैसर्गिक साधनें यांचें संरक्षण करण्याचे व त्यांची सुधारणा करण्याचे प्रयत्न ही संघटना करते. गहूं, इतर धान्यें, मांस, लाकूड, कागद,

तागाचे दोर, कापूस आणि शेतांत उत्पन्न होणारा इतर माल यांच्या आंतरराष्ट्रीय व्यापारासंबंधाचे निरनिराळ्या राष्ट्रांतले कायदे सुधारावेत अशी ती त्यांच्याकडे खटपट करते. शेतांची मशागत करून धान्य पिकविण्याचे अधिक चांगले मार्ग ती शोधून काढते आणि जगांतील सर्व राष्ट्रांतल्या शेतकऱ्यांना ती ते नवे मार्ग शिकविते. लोकांनीं अन्न विकण्याचे नवे मार्ग स्वीकारावे, शहरांतल्या गरीब माणसांना अधिक अन्न मिळावें, आणि गरीब शेतकऱ्यांना जास्त पैसे मिळावे अशीहि ती खटपट करते.

या फाओची कार्यपद्धति जरा साधी अशीच आहे. जीं राष्ट्रें या संघटनेमध्यें सामील झालेली आहेत तीं तिच्या खर्चासाठीं पैसे देतात (वर्षाकाठीं सुमारें ५० लक्ष डॉलर्स). ती स्वतः अभ्यास करते, तिच्या सभासद राष्ट्रांना माहिती पुरविते (पुष्कळदां निरनिराळीं सरकारें स्वतःच तिच्याकडे माहिती मागवितात), आणि त्यांनीं काय करायला पाहिजे त्याची शिफारस करते. त्यानंतर, तिनें ज्या शिफारशी केलेल्या असतात त्याचें काय केलें त्याबद्दल ती अहवालहि मागविते. तिला कोणत्या राष्ट्रावर कसला अधिकार मात्र नाहीं.

खास कारणांसाठीं ती आंतरराष्ट्रीय परिषदहि भरविते. महायुद्धानंतर यूरोप व आशिया या खंडांत उत्पन्न झालेल्या दुष्काळाला तोंड देण्याचा प्रयत्न करण्यासाठीं १९४६ सालच्या जून महिन्यामध्यें, तिनें एक महत्वाची परिषद बोलाविली होती.

फाओची पहिलीच बैठक जेव्हां झाली तेव्हां त्या बैठकीला हजर राहण्यासाठीं अमेरिकेनें आपले सत्तावीस अधिकारी (यांत अमेरिकन काँग्रेसचेहि चार सभासद होते) आणि त्यांचे अकरा मदतनीस पाठविले होते. यावरून खास संघटनांच्या बैठकी कशा दिसत असतील त्याची तुम्हांला कांहींशी कल्पना येईल. तसें पाहिल्यास प्रत्येक राष्ट्राचा एकेकच अधिकृत प्रतिनिधी आणि त्याला एकच मत असतें, पण येणारा प्रत्येक प्रतिनिधी आपल्या बरोबर इतके मदतनीस आणतो कीं या खास संघटनांच्या सभा खूप मोठ्या, आणि पुष्कळदां आरडाओरडा व तावातावाचीं भाषणें यांनीं युक्त असतात.

या संघटनेच्या सर्व सभासद-राष्ट्रांच्या प्रतिनिधींची एक वार्षिक सर्वसाधारण परिषद तर भरतेच, पण तीशिवाय, पंधरा सभासद (निरनिराळ्या राष्ट्रांतील मिळून) असलेल्या तिच्या कार्यकारी मंडळाच्याहि वारंवार बैठकी होत असतात. त्याखेरीज तिचे डायरेक्टर-जनरल (पहिले

डायरेक्टर-जनरल सर जॉन ओर हे होते) व त्यांचा पगारी नोकरवर्ग हे सबंध वर्षभर वॉशिंग्टन, डी. सी. येथें राबत असतातच.

**यूनेस्को** (UNESCO): युनायटेड नेशन्स एज्युकेशनल, सायंटिफिक ॲण्ड कल्चरल ऑर्गनायझेशन असें या संघटनेचें इंग्रजी नांव असून, सहा शब्दांतील पहिलें-पहिलें अक्षर मिळून यूनेस्को (UNESCO) हा शब्द बनलेला आहे. ही संघटना वृत्तनियंत्रण रद्द व्हावें असा प्रयत्न करीत असून प्रत्येक राष्ट्रांतील लोकांना दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांबद्दल माहिती करून घेण्याच्या कामीं ती मदत करीत आहे. दुसऱ्या राष्ट्रांतल्या लोकांना जितकी तुमची जास्त ओळख असेल तितक्या कमी सहज त्यांना तुमच्याविरुद्ध लढण्यास प्रवृत्त करतां येईल. दुसऱ्या लोकांबद्दलच्या अविश्वासामुळेंच आपणाला हें जग युद्धापासून अलिप्त ठेवणें कठीण पडत आहे असें या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणात म्हटलेलेंच आहे. ज्ञानामुळें तो अविश्वास पळवून लावतां येईल.

यूनेस्को म्युझियम्सना व कॉलेजांना मदत देते. एका राष्ट्राकडचें शास्त्रीय ज्ञान व दुसऱ्या राष्ट्रांकडे कोणतीं उपयुक्त पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत त्याची माहिती ती प्रत्येक राष्ट्रांतल्या विद्वानांना पुरविते.

वर्गात विद्यार्थ्यांना शिकविण्याचें काम कमी डोकेंफोडीचें होण्यासाठीं निरनिराळ्या राष्ट्रांतल्या शिक्षकांना एकमेकांपासून काय शिकण्यासारखें आहे तें पाहण्याकरितां निरनिराळ्या देशांत शिक्षणसंस्था चालविणाऱ्यांची ती संमेलनें भरविते. निरनिराळ्या राष्ट्रांकडून विद्यार्थ्यांच्या अदलाबदलीची ती व्यवस्था करविते.

परराष्ट्रांची उगीचच्या उगीच निंदा करणारे किंवा युद्ध ही एक फार चांगली गोष्ट आहे असें शिकविणारे असे शाळांच्या पाठ्य पुस्तकांत जे मजकूर असतील ते काढून टाकून, तीं पुस्तकें सुधारण्याबद्दल राष्ट्रांचीं मनें वळविण्याचें काम या संघटनेनें करावें असें कांहीं सभासद-राष्ट्रांनीं सुचविलें आहे.

जगांतल्या कोटयवधि लोकांना वाचतां व लिहितां येत नाहीं, त्यांना शिकविण्याच्या कामीं ही संस्था मदत करते.

फाओ प्रमाणेंच या संघटनेचीहि एक वार्षिक सर्वसाधारण परिषद भरते. त्यावेळीं तिचे सभासद बनलेल्या सर्व राष्ट्रांचे प्रतिनिधी यावयाचे असतात. त्याखेरीज निरनिराळ्या देशांतल्या मिळून १८ जणांचें तिचें एक जें कार्यकारी मंडळ आहे त्याच्याहि बऱ्याच वेळा बैठकी होतात. या संघटनेचें सेक्रेटरिएट पॅरिस येथें असतें आणि त्याच्या कचेऱ्यांत नेहमींच काम चालू असतें.

# संयुक्त राष्ट्र संघटनेची रचना



# संयुक्त राष्ट्र संघटनेची रचना

## सुरक्षा-मंडळ



११ सभासद--वडी ५ राष्ट्र कायम सभासद--बाकीचे ६ आमसभा प्रत्येक दोन वर्षांसाठी निवडते. आंतरराष्ट्रीय तंट्याची पहाणी करणे जरूर तर आक्रमणाविरुद्ध उपाययोजना करणे, इ० काम

## आंतरराष्ट्रीय न्यायालय



आमसभेने निवडलेले १५ न्यायाधीश राष्ट्राराष्ट्रांत निर्माण झालेल्या कायद्याच्या प्रश्नाचा निर्णय देण्यासाठी सतत बैठक चालू असते

## अणुशक्ति नियंत्रण मंडळ



सुरक्षा-मंडळाचे ११ सभासद व कॅनडाचा प्रतिनिधी यांचा यांत समावेश होतो अणुशक्तीबाबतच्या प्रश्नाचा विचार करते

## मिलिटरी स्टाफ कमिटी



बड्या पाचांचे 'चीफ्स् ऑफ स्टाफ' यांचा यांत समावेश होतो सुरक्षा-मंडळाच्या नियंत्रणाखाली आक्रमक राष्ट्राविरुद्ध लष्करी मोहीम करतील

## आंतरराष्ट्रीय सैन्य-दल



शांततेला निर्माण झालेला धोका नष्ट करण्यासाठी सभासदांनी दिलेले सैन्य-दल

## आंतरराष्ट्रीय बँक



ब्रेटनवुड करारानुसार स्थापना पुनर्रचना व विकास योजनांसाठी कर्ज देते

## आंतरराष्ट्रीय चलन निधि



ब्रेटनवुड योजनेचाच एक भाग चलनाच्या स्थैर्या-साठी सभासदांनी यांचा उपयोग करावयाचा

## जागतिक आरोग्य संघटना



जगातील वैद्यकीय प्रग-तीचे संशोधन व माहिती केंद्र म्हणून काम करते

## आंतरराष्ट्रीय निर्वासित समिति



'उनरा' च्या जागी या समि-तीची स्थापना होत आहे निर्वासितांना मदत करणे व त्यांच्या पुनर्वसाहतीची व्यवस्था करणे ही कामे

न्यू यॉर्क टाईम्स करिता ग्राफ तयार करणारी संस्था

शास्त्रीय विषयांतले प्रसिद्ध लेखक जॉन हक्स्ले हे या संघटनचे एक्झिक्यूटिव्ह सेक्रेटरी होते. या संघटनेची घटना १९४५ सालच्या नोव्हेंबरमध्यें तयार करण्यांत आली आणि पुढें लवकरच ४४ राष्ट्रांनीं ती मान्य केली.

**इलो** (ILO): दि इंटरनॅशनल लेबर ऑर्गनायझेशन असें इंग्रजी नांव असलेली ही संघटना असून तिच्या तीन शद्बांतील तीन अद्याक्षरांचा हा इलो (ILO) शद्ब बनलेला आहे. ही संघटना इ. स. १९२० सालापासून कार्य करीत असून, जुन्या राष्ट्रसंघाशीं तिचा संबंध होता. यूनोपैकीं अमेरिकेसकट सुमारें एकूणचाळीस राष्ट्रें या 'इलो' चीं सभासद आहेत.

हिचें स्वरूप जरा निराळें असें आहे. प्रत्येक राष्ट्रातर्फे या संघटनेमध्यें जे प्रतिनिधी पाठविले जातात त्यांत एक किंवा दोन प्रतिनिधी त्या राष्ट्राच्या सरकारतर्फें, एक तेथल्या मालकवर्गातर्फें असतो व मजूर युनियन्सचा एक प्रतिनिधी असतो. थोडयाथोडया महिन्यांच्या अवधीनें ही संघटना विशिष्ट प्रश्नांच्या विचारासाठीं मोठया खास बैठका भरवीत असते.

कामगारांना चांगला पगार मिळावा, आणि त्यांना काम करण्याच्या जागीं आधुनिक सुखसोयी असाव्यात या दृष्टीनें इलो प्रयत्न करीत असते. लहान मुलांचें आरोग्य जेणेंकरून बिघडेल अशा प्रकारच्या कामांवर त्यांना नेमूं नये, काम करीत असतां कामगाराला एखादी दुखापत झाल्यास त्याला योग्य औषधोपचार केला जावा आणि कोणाला फारच कमी पगार मिळत असल्यामुळें किंवा कोणाला शोधूनहि कामधंदा न मिळाल्यामुळें त्याची उपासमार होत आहे असें घडूं नये यासाठीं सर्व सरकारांनीं दक्षता घ्यावी असें ठरविणारे कायदे मंजूर करवून घेण्यासाठीं ही संघटना निरनिराळ्या राष्ट्रांकडे खटपट करते.

ता. २ ऑक्टोबर १९४६ रोजीं एक ठराव मंजूर करून स्वतः ही इलोच यूनोची एक खास संघटना बनली.

**फंड, बँक व इटो** (Fund, Bank and ITO): प्रत्येक राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्रांशीं व्यापार-व्यवहार करतां येण्याचे कामीं या तीन खास संघटना मदत करीत असतात. सन १९४४ सालीं ब्रेटन वुडस् (एन.एच.) येथें या तीन संघटनांच्या योजना निघाल्या. या फंडाची व या बँकेची अशा दोघांच्याहि मुख्य कचेऱ्या वाशिंग्टन येथें असून तेथें ता. २७ डिसेंबर १९४७ या दिवशीं त्यांनीं त्यांच्या कामाला आरंभ केला. लवकरच ४३ राष्ट्रें या फंडाचीं सभासद बनलीं आणि ३८ राष्ट्रें बँकेचीं सभासद बनलीं.

**दि इंटरनॅशनल मोनेटरी फंड** (The Fund): या संघटनेजवळ तिचे सभासद बनलेल्या राष्ट्रांनीं दिलेला सुमारें ८० कोटी डॉलर इतका

पैसा आहे. ही संघटना प्रत्येक राष्ट्राला त्याच्या त्याच्या चलनाची किंमत स्थिर राखण्याच्या कामीं मदत करते. म्हणजे एका ब्रिटिश पौंडाची किंमत आज जर अमूक एक डॉलर असली किंवा अमूक एक फ्रॅंक असली तर, खालीं न घसरतां अगर वर न चढतां, सहा महिन्यानंतरहि ती तशीच कायम राहूं शकते. चलनांच्या भावांतील या स्थिरतेमुळें दुसऱ्या राष्ट्रांकडून विकत घेतलेल्या कोणत्याहि वस्तूंची किंमत देणें लोकांना सोयीचें होतें. त्याचा परिणाम असा होईल कीं ते अधिकाधिक माल विकत घेत जातील, आणि मग जागतिक व्यापारहि वाढेल.

**दि बँक फॉर रीकन्स्ट्रक्शन ॲण्ड डेव्हलपमेंट** (The Bank) : या संघटनेजवळहि जवळ जवळ असेच ८० कोटी डॉलर असून ते तिला तिचे सभासद झालेल्या राष्ट्रांनीं दिलेले आहेत. धंदेवाल्यांनी त्यांच्याजवळचा पैसा कर्ज म्हणून दुसऱ्यांना द्यावा किंवा परराष्ट्रांमध्यें धंद्यांत गुतवावा यासाठी त्यांना मदत करणें हें हिचें काम आहे. श्रीमंत लोकांच्या एका गटाला ती म्हणते, युगोस्लाव्हियाला रेल्वे बांधण्यासाठी दोन कोटी डॉलर्स पाहिजे आहेत ते तुम्हीं द्या, आणि कदाचित् कांही नफ्यासह तुमचे पैसे तुम्हाला परत मिळतील. पण जर चुकून आमचा अदमास खोटा ठरला, आणि तुमच्या पैशांतले कांहीं पैसे बुडाले, तर तुमचें जेवढें नुकसान झालें असेल तेवढें आम्हीं भरून देऊं. केव्हां केव्हां ज्यांना गरज असेल अशा राष्ट्रांना ही बँक आपल्याजवळचे पैसेहि कर्जाऊ देते.

तिच्यापुढें दोन उद्देश आहेत. एक :—दुसऱ्या महायुद्धांत नष्ट झालेले कारखाने व इतर गोष्टी पुन: उभारण्याच्या कामीं राष्ट्रांना मदत करणें. दोन :—रेल्वे, खाणी, आणि ज्यांत बूट, कपडे, फर्नीचर व इतर उपयुक्त वस्तु तयार करतां येतील असे कारखाने उभारण्यासाठीं ज्या राष्ट्राला मदत पाहिजे असेल त्याला ती देणें. उदाहरणार्थ, जगांत असे अनेक देश आहेत कीं ज्यांच्यापाशीं गॅस स्टोव्ह नाहींत कीं रेफ्रिजरेटर्स नाहींत आणि ते तयार करण्याचे कारखानेहि नाहीत.

**दि इंटरनॅशनल ट्रेड ऑर्गनायझेशन** (ITO): या इंग्रजी नांवाच्या संघटनेच्या नांवांतील तीन शद्बांची तीन अद्याक्षरें मिळून 'इटो' हा शद्ब बनलेला आहे. ज्या एखाद्या कायद्यामुळें, एकमेकांजवळचा माल विकत घेणें राष्ट्रांना कठीण होतें तो बदलून घेण्याच्या बाबतींत ही इटो राष्ट्रांची मनें वळविते. ज्यांच्यामुळें आंतरराष्ट्रीय व्यापार दाबून टाकला जातो अशा जकाती, मक्तेदाऱ्या, वस्तुपुरवठ्यांतले वाटे (कोटाज) व तसलीच इतर बंधनें यांच्या विरुद्ध ही उपाय करीत असते.

**इकाओ** (ICAO): दि इंटरनॅशनल सिव्हिल एव्हिएशन ऑर्गनायझेशन या नांवाच्या संघटनेचें कार्य १९४५ सालच्या ऑक्टोबरमध्यें माँण्ट्रिएल येथें तिची पहिली बेठक झाली तेव्हां सुरू झालें. पुढें दिलेल्या प्रश्नासारख्या प्रश्नांच्या बाबतीत निरनिराळ्या राष्ट्रांचें एकमत होण्याच्या कामीं तिची मदत होते : कोणत्या देशांच्या विमान सर्व्हिसेस कोणत्या शहरांवरून उडाव्या, कोणत्या प्रकारच्या सिग्नल्सचा विमानासाठीं उपयोग केला जावा, विमानवाहतुकीच्या उद्योगांतील लोकांच्या सुरक्षिततेसाठी कोणती साधनें आवश्यक आहेत, विमान सर्व्हिसवाल्यांनीं उतारूंकडून काय भाडें घ्यावें, वगैरे. माणसें व माल यांची वाहतूक करणाऱ्या विमानांसाठी आणि खासगी मालकीच्या विमानांसाठीं नियम तयार करण्याच्या प्रश्नांचा ती विचार करते.

तसेंच वमानिक वाहतुकीच्या सुरक्षिततेसंबंधाचे नियम अंमलांत आणले जातील असाहि ती प्रयत्न करते.

**हू** (WHO): वर्ल्ड हेल्थ ऑर्गनायझेशन या नांवाची ही संघटना १९४६ सालच्या जून महिन्यांत आर्थिक व सामाजिक मंडळाच्या बोलावण्यावरून भरलेल्या परिषदेमध्यें निर्माण झाली. जगांतल्या एकूण सदुसष्ट राष्ट्रांचे (एकट्या स्पेनखेरीज जगातील बाकीचीं सर्व राष्ट्रें) प्रतिनिधी या परिषदेला आले होते.

कोणते नवीन वैद्यकीय शोध लागले आहेत, रोग बरे करण्यासाठी कोणत्या नवीन औषधांचा उपयोग होण्यासारखा आहे वगैरेसारखी माहिती ही हू संघटना गोळा करीत असते. अशा प्रकारची माहिती कोणत्याहि राष्ट्रानें मागितल्याबरोबर ती त्याला देतां यावी असा याचा उद्देश आहे. औषधांच्या असत्य जाहिराती रेडिओवर जाहीर केल्या जाण्याचें बंद पाडण्याचीहि ती खटपट करते.

या संघटनेनें मायक्रोब नांवाच्या जंतूविरुद्ध सबंध जगभर युद्ध पुकारलें आहे. रोग पसरविणाऱ्या जंतूंचा संहार करण्याचे कामी राष्ट्रांनीं एकमेकांशीं सहकार्य करावें अशी ती खटपट करते. उदाहरणार्थ, जगांतील दोन-पंचमांश माणसांना मलेरियाचा ताप कां बाधतो आणि त्याचा बंदोबस्त करण्याच्या कामीं त्यांना फारच थोडी शास्त्रीय मदत कां मिळते हें तिला कोडें पडलें आहे.

हू साथींचे रोग पसरूं नयेत असा प्रयत्न करते. केव्हां एखादा रोग एखाद्या देशांत इतका पसरतो कीं त्याला साथीचें स्वरूप येतें. अशा वेळीं ही संघटना इतर राष्ट्रांकडून डॉक्टर्स व औषधें यांची भराभर तिकडे रवानगी करते.

लहान मुलें भांडखोरपणानें वागली तर तेव्हां त्यांची प्रकृति जशी असते त्याच्यापेक्षां ती मित्रत्वानें एकमेकांशीं वागल्यास ती अधिक तजेलदार असतात. म्हणून मुलांना एकमेकांशीं मित्रत्वानें वागण्यास शिकविण्याचीहि ती खटपट करते.

या संघटनेच्याहि सभासद-राष्ट्रांच्या प्रतिनिधींची दरवर्षी एकदां सर्व-साधारण परिषद भरत असते. फाओ व यूनेस्को या संघटनांच्या प्रमाणें हिचेंहि कार्यकारी मंडळ आहे, डायरेक्टर-जनरल आहे, आणि त्यांचा नोकरवर्ग आहे. हिने केलेले नियम सभासद-राष्ट्रांवर बंधनकारक (त्यांनीं अमान्यता न कळविली तर) असल्यामुळें तिला एक प्रकारचा असाधारण अधिकारहि प्राप्त झालेला आहे.

**यूनरा** (UNRRA): दि युनायटेड नेशन्स रिलीफ ॲण्ड रिहॅबिलि-टेशन ॲडमिनिस्ट्रेशन या इंग्रजी नांवाच्या संघटनेंतील पांचहि शद्बांची अद्याक्षरें घेऊन हा यूनरा शद्ब बनविला गेलेला आहे. दुसऱ्या महायुद्धातील लढायांमध्यें ज्या शहरांचा व गांवांचा विध्वंस झाला तेथल्या रहिवाशांना या यूनरानें खूप मोठ्या प्रमाणांत अन्न, कपडे, आणि इतर वस्तू यांची मदत केली. यूनोची सनद लिहिली जाण्याआधींच तिनें आपलें कार्य सुरू केलें होतें. सत्तेचाळीस राष्ट्रें तिची सभासद बनलीं आहेत.

हिचें अस्तित्व तात्पुरतेंच असल्यामुळें, ती यूनोची खास संघटना बनली नाहीं, पण तिच्या कार्याला अत्यंत आवश्यक असा पैसा, जी राष्ट्रें देऊं शकतील त्यांच्याकडून मिळवून तिला मिळावा म्हणून आमसभेनें आपली एक खास समिती नेमली होती. यूनराकडून जें जें कोणतें कार्य होईल त्याचे अहवाल वेळोवेळीं मागविण्याबद्दल आपल्या सेक्रेटरी-जनरललाहि आमसभेनें सूचविलें होतें. १९४७ सालीं या संघटनेचें विसर्जन करण्याचें राष्ट्रांनी ठरविलें.

**इरो** (IRO): इंटरनॅशनल रिफ्यूजी ऑर्गनायझेशन या इंग्रजी संघटनेच्या नांवातील तीन आद्याक्षरें घेऊन हा 'इरो' शद्ब बनविलेला आहे. आजपर्यंत जीं युद्धें झालीं, ज्या यादव्या झाल्या किंवा ज्या क्रांत्या घडल्या त्यांनीं घातलेल्या हिंसेच्या थैमानामुळें आधींच दु:खी असलेल्या या जगांत कितीतरी माणसांना अगदीं केरकचऱ्याच्या लायकीला आणून बसविलें आहे. फ्रान्समध्यें गेलेले स्पॅनिश रिपब्लिकन्स, जर्मनी व इटालीमध्यें गेलेले पोलिश निर्वासित, इस्टोनिया-लाटव्हिया-लिथुआनियामधले बाल्टिक कामगार, नाझींनीं ज्यांचीं घरेंदारें व उद्योगधंदे नष्ट करून टाकले असे ज्यू, आपण आपल्या राष्ट्रांत परत गेलों तर आपल्या राजकीय मतांमुळें आपल्याला गोळ्या घालून ठारच मारलें जाईल अशी भीति वाटणारे इतर निर्वासित अशा

प्रकारचीं लक्षावधि पुरुष, स्त्रिया व मुलें आज घरदार नाहीं, दुसरीकडे कोठें जाण्याची सोय आणि चरितार्थ चालविण्याचें कांहीं साधनहि नाहीं अशा स्थितींत आहेत.

या सगळ्या लोकांची काळजी घेणें फ्रान्स, इंग्लंड व इतर दुसरीं राष्ट्रें यांना शक्य न झाल्यामुळें यूनोच्या आर्थिक व सामाजिक मंडळानें ही इरो संघटना निर्माण करण्यासाठी एक घटना लिहून काढली. यूनोच्या आमसभेनें त्या घटनेंत दुरुस्त्या करून मग तिचा स्वीकार केला आणि यूनोच्या सभासदांनी तिचे सभासद व्हावें अशी शिफारस केली.

ज्यांना स्वत:चा असा देश नाहीं अशा लोकांना ही इरो संघटना कायदेशीर व राजकीय दृष्टचा संरक्षण देते आणि त्यांना खास पासपोर्ट (प्रवासाचे) परवाने देते. ती पैसे जमविते आणि या लोकांना अन्न, वस्त्र व शिक्षण देण्यासाठीं ते खर्च करते. जगांतल्या निरनिराळ्या देशापैकीं कोणत्या तरी देशांत या लोकांना कायम वस्ती करायला जागा मिळेल, उदरनिर्वाहाची सोय लावतां येईल आणि कांहीं उपयुक्त काम करतां येईल असाहि तिचा प्रयत्न चालू असतो.

# प्रकरण १७

# आंतरराष्ट्रीय करारमदार

## अटलांटिक सनद्

अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांचे अध्यक्ष आणि युनायटेड किंग्डमचे पंतप्रधान मि. चर्चिल यांची भेट झाली असून, त्यांच्या त्यांच्या राष्ट्रांच्या ज्या धोरणामुळें जगाला बरे दिवस येतील अशी त्यांना आशा वाटते त्या धोरणांतील पुढें दिलेली कांहीं मूलभूत तत्वें तमाम लोकांस माहीत झालेलीं असल्यास बरें असें त्या दोघांना वाटतें.

(१) आपल्या देशांचा मुलूख वाढवावा अगर दुसऱ्या कोणत्या प्रकारें त्यांचें क्षेत्र वाढवावें असा त्यांचा मुळींच उद्देश नाहीं.

(२) ज्या त्या मुलखांतल्या लोकांच्या स्पष्टपणें व्यक्त झालेल्या इच्छांशीं जे जुळत नसतील असे कोणतेहि प्रादेशिक फेरफार घडवून आणण्याची त्यांची इच्छा नाहीं.

(३) आपल्याला कोणत्या प्रकारची राज्यपद्धति पाहिजे तें ठरविण्याचा सर्व देशांतल्या लोकांना जो अधिकार आहे तो ते दोघेहि शिरोधार्य मानतात, आणि ज्यांचे स्वराज्याचे व सार्वभौमत्वाचे अधिकार जबरदस्तीने काढून घेतलें गेले आहेत त्यांना ते परत मिळावेत अशीहि त्यांची इच्छा आहे.

(४) सध्यां त्यांच्यावर ज्या जबाबदाऱ्या आहेत त्या न विसरता, सर्वच राष्ट्रांना——मग ती मोठीं असोत अगर लहान असोत, विजयी असोत अगर पराभूत असोत——त्यांच्या आर्थिक उन्नतीला अत्यावश्यक अशा जागतिक व्यापाराच्या आणि कच्चा माल मिळण्याच्या बाबतींत समानतेच्या हक्कानें संधि मिळेल असा ते प्रयत्न करतील.

(५) सर्वच राष्ट्रांमध्यें कामगारांच्या राहणीचें मान सुधारावें, त्या राष्ट्रांची आर्थिक उन्नति व्हावी आणि त्यांना सामाजिक सुरक्षितता लाभावी यासाठी सगळ्या राष्ट्रांचे आर्थिक बाबतींत जास्तींत जास्त सहकार्य घडवून आणावें अशी त्यांची इच्छा आहे.

(६) नाझींच्या जुलुमांचा पूर्ण निःपात केल्यानंतर जीमुळें सर्व राष्ट्रांना त्यांच्या त्यांच्या भौगोलिक मर्यादांमध्यें निर्धास्तपणें नांदता येईल आणि कोणत्याहि प्रकारची भीति किंवा कसल्या वस्तुचें दुर्भिक्ष्य यांची बाधा

न होतां सर्व मुलुखांतल्या लोकांना त्यांचें जीवन व्यतीत करतां येईल अशी खात्री उत्पन्न होईल अशी शांतता निर्माण झालेली आपण पाहूं अशी त्यांना आशा वाटत आहे.

(७) अशा प्रकारच्या शांततेच्या काळांत सर्व लोकांना कोणत्याहि अडथळ्याशिवाय सर्व समुद्रांत आणि महासागरांत खुशाल हिंडतां आलें पाहिजे.

(८) आधिभौतिक त्याचप्रमाणें अध्यात्मिक अशा दोन्हीं प्रकारच्या कारणांसाठीं सबंध जगांतल्या सर्वच राष्ट्रांनी युद्धाच्या मार्गापासून परावृत्त व्हायला पाहिजे अशी त्यांची श्रद्धा आहे. आपापल्या राष्ट्रांच्या सरहद्दीबाहेर आक्रमण करणारी किंवा तसें आक्रमण करण्याचा धाक घालणारीं राष्ट्रें जर, भूमि, समुद्र व आकाश यांजमध्ये चालविण्यांत येणाऱ्या युद्धसाहित्याचा उपयोग करीत राहतील तर जगांत केव्हांहि शांतता नांदणें अशक्य असल्यामुळें, सार्वत्रिक सुरक्षिततेची मोठी व कायमची अशी कांही व्यवस्था घडून येईपर्यंत, अशा (म्हणजे आक्रमणशील) राष्ट्राना नि:शस्त्र करून ठेवणें आवश्यक आहे असें त्यांस वाटतें. शांततेची आवड असणाऱ्या अशा राष्ट्रांना आज शस्त्रास्त्रांसाठीं मोठ्या खर्चाचें जें डोईजड ओझें वाहावें लागत आहे तें कमी करतां येण्याच्या दृष्टीनें व्यवहार्य असे सर्व उपाय योजण्याला ते मदत करतील आणि उत्तेजनहि देतील.

फ्रँकलिन डी. रूझवेल्ट.
ऑगस्ट ता. १४, १९४१ विन्स्टन एस. चर्चिल.

# संयुक्त राष्ट्रांतर्फेची घोषणा

अमेरिका, ब्रिटन, सोव्हिएट रशिया, चीन, ऑस्ट्रेलिया, बेल्जियम, कॅनडा, कोस्टा रिका, क्यूबा, झेकोस्लोव्हाकिया, डोमिनिकन रिपब्लिक, एल साल्वाडोर, ग्रीस, ग्वाटेमाला, हैती, होंडुरास, इंडिया (भारत), लक्झेंबर्ग, नेदर्लंडस, न्यू झीलंड, नायकाराग्वा, नॉर्वे, पनामा, पोलंड, साऊथ आफ्रिका आणि यूगोस्लाव्हिया इतक्या राष्ट्रांनीं संयुक्तपणें पुढीलप्रमाणें घोषणा केली. आम्हीं खालीं सह्या करणारीं राष्ट्रें,

अमेरिकेचे अध्यक्ष व ब्रिटनचे पंतप्रधान यांनी ता. १४ ऑगस्ट रोजीं जाहीर केलेल्या व अटलांटिक सनद या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या त्यांच्या संयुक्त घोषणेंतील उद्दिष्टांशीं आणि तत्वांशीं सहमत असल्यामुळें, तसेंच

जीवित आणि राजकीय व धार्मिक स्वातंत्र्य यांच्या रक्षणासाठीं त्याचप्रमाणें दुसऱ्यांच्या व आपल्या मुलुखांत माणुसकीचे हक्क व न्याय शाबूत राखण्यासाठीं आपल्या शत्रूवर पुरेपूर विजय मिळविणें अत्यंत जरुरीचें आहे अशी आमची खात्री झालेली असल्यामुळें, आणि सबंध जगाला गुलाम बनवूं पाहणाऱ्या जंगली व पाशवी शक्तींविरुद्ध आम्ही संयुक्तपणें लढत असल्यामुळें, असें जाहीर करतों की :

(१) आमच्यांतील प्रत्येक राष्ट्र ज्यांच्याशीं त्याचें सध्यां युद्ध चालू आहे अशा त्या त्रिपक्षीय करारांतील राष्ट्रांविरुद्ध व त्यांच्या बाजूच्या लोकांविरुद्ध आपलें सर्व प्रकारचें—म्हणजे लष्करी अगर आर्थिक—बळ उपयोगांत आणण्याचें वचन देत आहे.

(२) या घोषणेंत सामील असणाऱ्या राष्ट्रांशीच सहकार्य करण्याचें, आणि शत्रूंशीं स्वतंत्रपणें युद्धतहकुबीचा तह किंवा शांततेचा करार करणार नाहीं असेंहि वचन या घोषणेंत सामील असलेलें प्रत्येक राष्ट्र देत आहे.

हिटलरशाही विरुद्ध जय मिळविण्यासाठीं सध्यां चालू असलेल्या युद्धांत जीं दुसरीं कोणी राष्ट्रें आम्हांला मदत करीत असतील किंवा पुढें करतील त्यांनींहि वरील घोषणेलाच चिकटून राहावें.

ही घोषणा वॉशिंग्टन येथें लिहिली.

१ जानेवारी १९४२

# संयुक्त राष्ट्रांची सनद

## उपोद्घात

आम्ही संयुक्त राष्ट्रांमधील सर्व जनता युद्धाच्या ज्या रोगानें आमच्या आयुष्यांतच दोन वेळां मनुष्य जातीला अतोनात दुःखांत लोटलें त्याचा पूर्ण निःपात करण्याचा निश्चय केला असल्यामुळें,

आणि

मनुष्यजातीचे मूलभूत हक्क, मनुष्य प्राण्याचा मान व योग्यता, पुरुष व स्त्रिया आणि मोठीं व लहान राष्ट्रें यांचे समान हक्क यांजवरील आमचा दृढ विश्वास जाहीर करण्याचा निर्धार केला असल्यामुळें, आणि न्याय व तह, करारमदार आणि इतर आंतरराष्ट्रीय कायदे यांचा मान राखला जाईल अशी परिस्थिति निर्माण करण्याचाहि आमचा निश्चय असल्यामुळें, तसेंच

सामाजिक प्रगति व जीवनरहाणीचें मान सुधारून व्यक्तिस्वातंत्र्याचा अधिक विकास घडविण्याचा निश्चय असल्यामुळें,
आणि हे सर्व उद्देश साध्य होण्यासाठीं
परमत सहिष्णुता दाखविण्याचा व चांगले शेजारी या नात्यानें एकमेकांशीं शांततेनें वागण्याचा, आणि आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता कायम राखण्यासाठीं आपलें सर्व बळ एकवटण्याचा, आणि सर्वांच्या सामुदायिक हिताच्या प्रश्नाखेरीज इतर कोणत्याहि कारणाकरितां लष्करी बळ वापरलें जाणारच नाहीं अशी, तद्विषयक तत्वें व पद्धति यांचा स्वीकार करून, आणि सर्व लोकांची आर्थिक व सामाजिक उन्नति साधण्यासाठीं आंतरराष्ट्रीय संघटनांचाच उपयोग करण्याचा आमचा निश्चय असल्यामुळें हे उद्देश साध्य होण्यासाठी परस्पर सहकार्यानें झटण्याचा आम्हीं निर्धार केला आहे.

त्या निर्धारानुसार, आमच्या प्रत्येकाच्या सरकारनें सॅन फ्रॅन्सिस्को येथें जमलेल्या आमच्या प्रतिनिधींच्या मार्फत संयुक्त राष्ट्रांच्या या सनदेला मान्यता दिली आहे आणि या लेखाद्वारें संयुक्त राष्ट्रें या नांवानें ओळखली जाणारी एक आंतरराष्ट्रीय संघटना निर्माण करीत आहोंत.

## प्रकरण १

# उद्देश आणि तत्वें

### कलम १ लें

या संयुक्त संघटनेचे उद्देश पुढील प्रमाणें आहेत :

(१) देशादेशांत शांतता आणि सुरक्षितता नांदविणें, आणि त्यासाठीं शांततेला धोका उत्पन्न होण्याचे टाळण्याकरितां किंवा धोका उत्पन्न झालाच तर तो दूर करण्याकरितां आणि आक्रमण व शांतताभंग करणारीं तशींच दुसरीं कृत्यें यांचा बीमोड करण्याकरितां परिणामकारक असे सामूहिक उपाय योजणें आणि शांततेच्या मार्गानें आणि न्याय व आंतरराष्ट्रीय कायदा यांना अनुसरून आंतरराष्ट्रीय तंटे व शांततेचा भंग करणारे प्रकार सोडविणें व मिटविणें.

(२) सर्व लोकांना सारखे अधिकार व स्वयंनिर्णयाची सत्ता असली पाहिजे या तत्वाला मान देऊन सर्व राष्ट्रांमध्यें मैत्रीचे संबध प्रस्थापित करणें, आणि जागतिक शांतता बळकट करण्यासाठीं आवश्यक असे इतर उपाय योजणें.

(३) आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक व माणुसकी विषयक दृष्टीचे सर्व आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्यासाठीं, आणि वंश, लिंग, भाषा, अगर धर्म यांच्यापुढें कोणताहि भेदभाव केला न जातां सर्व माणसांना माणुसकीचे अधिकार व मूलभूत स्वातंत्र्यें यांना मान देण्याची भावना उत्पन्न करण्यासाठीं व वाढविण्यासाठी सर्व राष्ट्रांराष्ट्रांत सहकार्य घडवून आणणें.

(४) या मामाईक उद्दिष्टांच्या मिद्धीमाठी सर्व राष्ट्रांनीं करावयाच्या कार्याचें केंद्र बनणें.

## कलम २ रें

कलम नं. १ मध्यें सांगितलेल्या उद्देशांच्या परिपूर्तीसाठीं ही संघटना आणि तिचे सभासद असलेलीं राष्ट्रें पुढें दिलेल्या तत्वानुसार आचरण करतील.

(१) सर्व सभासदांना एकसारखेच सार्वभौमत्वाचे अधिकार असले पाहिजेत या तत्वावर ही संघटना आधारलेली आहे.

(२) या संघटनेच्या सभासदत्वामुळें प्राप्त होणारे अधिकार व फायदे सर्व सभासदांना उपभोगतां येतीलच अशी हमी उत्पन्न होण्यासाठीं, या सनदेन्वयें स्वीकारलेल्या जबाबदाऱ्या सर्व सभासद-राष्ट्रांनी इमानेंइतबारें पार पाडाव्या.

(३) सर्व सभासद-राष्ट्रांनीं त्यांचे आपसांतील वाद, आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता आणि न्याय यांना धोका उत्पन्न होणार नाहीं अशा शांततामय मार्गानीच मिटवावेत.

(४) सर्व सभासद-राष्ट्रांनीं आपल्या आतरराष्ट्रीय संबंधांत कोणा राष्ट्राच्या प्रादेशिक अखंडत्वाविरुद्ध किंवा राजकीय स्वातंत्र्याविरुद्ध बळाचा उपयोग करूं नये अगर तसा उपयोग करण्याची धमकी देऊं नये किंवा संयुक्त राष्ट्रांच्या उद्दिष्टांशीं विसंगत असें कांहीं करूं नये.

(५) या सनदेच्या आधारें यूनो (संयुक्त राष्ट्रें) जी कोणती उपाययोजना करील तिला सर्व सभासद-राष्ट्रांनीं सर्व प्रकारें मदत करावी आणि ज्या कोणत्या राष्ट्राविरुद्ध यूनोनें आगाऊ खबरदारीची उपाययोजना किंवा शिक्षात्मक उपाययोजना सुरू केलेली असेल त्या

राष्ट्राला कसलीहि मदत करूं नये.

(६) आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता यांच्या दृष्टीनें जेवढी आवश्यकता भासेल तेवढयापुरतें तरी, या संघटनेचे सभासद नसलेलीं राष्ट्रेंहि या तत्वानुसार आचरण करतील अशी ही संघटना खबरदारी घेईल.

(७) या सनदेमध्यें कांहींहि लिहिलेलें असलें तरी त्यामुळें एखाद्या राष्ट्राच्या अंतर्गत कारभारामध्यें हस्तक्षेप करण्याचा यूनोला अधिकार प्राप्त होणार नाहीं, किंवा असले प्रश्न या सनदेप्रमाणेंच सोडविले पाहिजेत अशी सभासद-राष्ट्रांवर ती सक्तीहि करूं शकणार नाही. पण प्रकरण ७ मध्यें सांगितलेल्या शिक्षात्मक योजनांचा अंमल करतांना मात्र हें तत्व यूनोच्या आड येणार नाहीं.

## प्रकरण २

# सभासदत्व

### कलम ३ रें

आंतरराष्ट्रीय संघटना निर्माण करण्यासाठी सॅन फ्रॅन्सिस्को येथें भरलेल्या संयुक्त राष्ट्रांच्या परिषदेंत ज्यांनीं आधीं भाग घेतला अगर ता. १ जानेवारी १९४२ रोजीं संयुक्त राष्ट्रांनी केलेल्या घोषणेवर ज्यांनी आधी सही केली त्या राष्ट्रांनीं या सनदेवर सही केली म्हणजे आणि त्यांच्या सरकारांनी तिच्यावर शिक्कामोर्तब केलें म्हणजेच ती यूनोचे आद्य सभासद बनतील.

### कलम ४ थें

(१) या सनदेमध्यें समाविष्ट असलेल्या जबाबदाऱ्यांचा जी स्वीकार करतील आणि तसें करण्यास ती खरोखरच उत्सुक व समर्थ आहेत असें या संघटनेचें मत पडेल त्या सर्व शांतताप्रेमी राष्ट्रांना तिचे सभासद होतां येईल.

(२) सुरक्षा-मंडळानें शिफारस केल्यानंतर आमसभेनें तसाच निर्णय ठरविला कीं अशा कोणत्याहि राष्ट्राला यूनोचें सभासदत्व प्राप्त होईल.

### कलम ५ वें

यूनोचा सभासद असलेल्या एखाद्या राष्ट्राविरुद्ध सुरक्षा-मंडळानें जर प्रतिबंधक किंवा शिक्षात्मक स्वरूपाची अशी उपाययोजना सुरू केली असेल तर, यूनोचा सभासद या नात्यानें त्या राष्ट्राचे अधिकार व त्याच्या सवलती,

सुरक्षा-मंडळानें तशी शिफारस केल्यावर आमसभा तात्पुरते काढून घेऊं शकेल. सुरक्षा-मंडळ हे अधिकार व सवलती परत देऊं शकेल.

**कलम ६ वें**

यूनोच्या एखाद्या सभासदानें तिच्या तत्वांचा जर एकसारखा भंग करणेंच सुरू केलें तर सुरक्षा-मंडळानें शिफारस केल्यास आमसभा त्याला या संघटनेतून हांकलूनहि लावील.

## प्रकरण ३

# अंगभूत शाखा

**कलम ७ वें**

(१) यूनोच्या ज्या मुख्य अंगभूत शाखा स्थापन करण्यांत आल्या आहेत त्या या: आमसभा, सुरक्षा-मंडळ, आर्थिक व सामाजिक मंडळ, विश्वस्त मंडळ, आंतरराष्ट्रीय न्यायालय आणि सेक्रेटरिएट.

(२) आणखी कोणत्या दुय्यम शाखा निर्माण करण्याची आवश्यकता भासली तर त्या या सनदेनुसार स्थापन केल्या जातील.

**कलम ८ वें**

यूनोच्या कोणत्याहि मुख्यांगभूत किंवा दुय्यम शाखेंत भाग घेण्याच्या लायकीच्या बाबतींत व समानतेच्या अधिकारानें काम करण्याच्या बाबतीत पुरुष व स्त्रिया यांजवर कोणतेंहि नियंत्रण घातलें जाणार नाही.

## प्रकरण ४

# आमसभा व तिचें स्वरूप

**कलम ९ वें**

(१) यूनोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांची मिळून ही आमसभा बनेल.

(२) या आमसभेमध्यें प्रत्येक सभासद-राष्ट्राचे पांचपेक्षां अधिक प्रतिनिधी असणार नाहींत.

# कर्तव्यें व अधिकार

## कलम १० वें

या सनदेच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याहि प्रश्नावर अगर कोणत्याहि विषयावर, किंवा या सनदेनुसार निर्माण करण्यांत आलेल्या मुख्यांगभूत अथवा दुय्यम शाखांच्या कामकाजावर व अधिकारावर आमसभा चर्चा करील आणि, कलम नं. १२ मध्यें सांगितलेले अपवाद वगळून, असल्या कोणत्याहि प्रश्नाबाबत किंवा विषयाबाबत यूनोच्या सभासदांना, सुरक्षा-मंडळाला किंवा या दोघांनाहि शिफारशी करील.

## कलम ११ वें

(१) निःशस्त्रीकरण कसें करावयाचें किंवा शस्त्रास्त्रांवर मर्यादा कशी घालावयाची या संबंधांतील तत्वें व आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता कायम राखण्यासाठीं करावयाच्या सहकार्यांतील सर्वसामान्य तत्वें यांचा आमसभा विचार करील, आणि त्या बाबतींत यूनोच्या सभासदांना अगर सुरक्षा-मंडळाला अगर दोघांनाहि शिफारशी करीत जाईल.

(२) आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता नांदण्याशीं संबंध असलेला कोणताहि प्रश्न यूनोच्या एखाद्या सभासदानें किंवा सुरक्षा-मंडळानें किंवा यूनोचा सभासद नसलेल्या अशाहि एखाद्या राष्ट्रानें तिच्यापुढें आणला असतां, कलम ३५, परिच्छेद २ याला धरून आमसभा त्याच्यावर चर्चा करील, आणि कलम १२ मध्यें सांगितलेल्या अपवादांव्यतिरिक्त इतर बाबतींत त्या प्रश्नाशीं ज्या राष्ट्राचा किंवा राष्ट्रांचा संबंध येत असेल त्यांना, किंवा सुरक्षा-मंडळाला, किंवा दोघांनाहि शिफारशी करील. अशा कोणत्याहि प्रश्नांपैकी ज्या कोणत्या प्रश्नाचे बाबतींत कृति करण्याची आवश्यकता असेल तो प्रश्न चर्चेपूर्वी आमसभा सुरक्षा-मंडळाकडे रवाना करील.

(३) आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता यांना धोका उत्पन्न होण्यासारख्या परिस्थितीकडे आमसभा सुरक्षा-मंडळाचें लक्ष वेधील.

(४) या कलमामध्यें आमसभेचे जे अधिकार सांगितले आहेत त्यामुळें कलम नं. १० मधील तिच्या कोणत्याहि अधिकारांवर मर्यादा पडत नाही.

## कलम १२ वें

(१) या सनदेमुळें सुरक्षा-मंडळाला प्राप्त झालेल्या अधिकारांपैकीं कोणत्याहि अधिकाराची एखाद्या तंट्याच्या किंवा प्रकरणाच्या बाबतींत सुरक्षा-मंडळ उपाययोजना करीत असतां, सुरक्षा-मंडळानेंच तशी विनंति

केल्याखेरीज त्या तंट्याबाबत आमसभा स्वतः कांहींच शिफारशी करणार नाहीं.

(२) शांतता व सुरक्षितता यांच्याशी संबंध असलेल्या ज्या ज्या कोणत्या विषयासंबंधांत सुरक्षा-मंडळानें विचार वा उपाय चालविले असतील त्या त्या सर्वाबद्दल, सुरक्षा-मंडळाच्या संमतीनें सेक्रेटरी-जनरल हे आमसभेच्या प्रत्येक बैठकीचे वेळी तिला माहिती पुरवितील, आणि सुरक्षा-मंडळानें तसली आपली कारवाई थांबविली म्हणजेहि तसें ते लगेच आमसभेला अगर तिची बैठक चालू नसेल तर सभासदांना कळवितील.

## कलम १३ वें

(१) पुढें दिलेल्या उद्देशांच्या पूर्तीसाठीं आमसभा कोणाला विशेष अभ्यास करायला सांगेल किंवा त्यासंबंधांत कांहीं शिफारशी करील.

अ. राजकीय क्षेत्रांत राष्ट्रां-राष्ट्रांमध्यें सहकार्य वाढविणें आणि हळुहळू आंतरराष्ट्रीय कायद्यांची वाढ व्हावी व त्यांना सुस्पष्ट स्वरूप यावें (कोडीफिकेशन) यासाठीं त्या प्रकारच्या प्रयत्नास उत्तेजन देणें,

ब. आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, आणि आरोग्यविषयक क्षेत्रांत राष्ट्रां-राष्ट्रांमध्यें सहकार्य वाढविणें, आणि वंश, लिंग, भाषा किंवा धर्म या कारणांसाठीं कोणत्याहि प्रकारचा भेदभाव केला न जातां, सर्व लोकांना माणुसकीचे अधिकार व मूलभूत स्वातंत्र्यें यांचा लाभ होईलच असें करण्यांत मदत करणें.

(२) वर दिलेल्या परिच्छेद १ (ब) मध्यें ज्या विषयांचा उल्लेख केला आहे त्यांच्या बाबतींतल्या आमसभेच्या जादा जबाबदाऱ्या, कर्तव्यें व अधिकार प्रकरण ९ व १० यांत सांगितलीं आहेत.

## कलम १४ वें

कोणत्या उद्देशासाठीं व तत्वासाठी यूनो संघटना स्थापन झाली तें सांगणाऱ्या या सनदेंतील नियमांचा भंग केल्यामुळें किंवा दुसऱ्या कोणत्या कारणांमुळें उत्पन्न झालेल्या आणि एकंदर जगाच्या कल्याणाला किंवा राष्ट्रां-राष्ट्रांतील मित्रत्वाच्या संबंधांना जीं बाधा आणतील असें आमसभेला वाटेल त्या सर्व प्रकरणांचा शांततामय समेट घडून येण्यासाठीं कलम १२ ला अनुसरून आमसभा तिला योग्य वाटतील त्या शिफारशी करील.

### कलम १५ वें

(१) सुरक्षा-मंडळाकडून येणारे प्रतिवार्षिक व खास कारणामुळें केलेले अहवाल आमसभेपुढें येतील व आमसभा त्यांजबद्दल विचार करील, आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्याच्या दृष्टीनें सुरक्षा-मंडळ जे उपाय योजणार असेल अगर त्यानें जे उपाय योजले असतील त्यांची या अहवालांत माहिती दिलेली असेल.

(२) यूनोच्या इतर शाखांचे अहवालहि आमसभेपुढें येतील व आमसभा त्याचा विचार करील.

### कलम १६ वें

यूनो सनदेचें प्रकरण १२ वें व १३ वें यांनीं आंतरराष्ट्रीय विश्वस्त पद्धतिसंबंधानें आमसभेकडे जीं कर्तव्यें सोंपविली आहेत तीं ती पार पाडील, यांत युद्धदृष्टचा महत्वाचे नसलेले अशा प्रकारचे जे प्रदेश असतील त्यांजजवळ विश्वस्त म्हणून कोणाची नेमणूक करण्याबद्दलच्या करारांना मान्यता देण्याच्या कामाचाहि अन्तर्भाव असेल.

### कलम १७ वें

१. यूनो संघटनेचें अंदाजपत्रक आमसभेपुढें मांडलें जाईल व आमसभा त्यास मान्यता देईल.

२. ही संघटना चालविण्यासाठी येणारा खर्च आमसभा वांटून देईल त्या प्रमाणांत सभासद राष्ट्रें सोसतील.

३. कलम ५७ मध्यें यूनोच्या ज्या खास संघटनांचा उल्लेख केलेला आहे त्यांच्यासंबंधाच्या कोणत्याहि आर्थिक व अंदाजपत्रकविषयक व्यवस्थांचा आमसभा विचार करील व त्यांना मान्यता देईल. त्याचप्रमाणें अशा या खास संघटनांना कांहीं शिफारशी करतां येतात की काय तें पहाण्यासाठीं त्यांच्या एकंदर कारभाराबद्दलचीं अंदाजपत्रकेंहि ती तपासून पाहील.

## मतें

### कलम १८ वें

१. आमसभेच्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल.

२. महत्वाच्या प्रश्नावरचे आमसभेचे निर्णय बैठकीला हजर असणाऱ्या व मत नोंदविणाऱ्या एकंदर सभासदांच्या दोन-तृतियांश मतांनीं ठरतील.

या प्रश्नांत पुढें दिलेल्या विषयांचा समावेश असेल : आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता यांचें रक्षण करण्याच्या बाबतींतील शिफारशी, सुरक्षा-मंडळावरच्या अल्पमुदतीच्या सभासदांची निवड, आर्थिक व सामाजिक मंडळावरील सभासदांची निवड, कलम ८६ चा परिच्छेद १ (क) अनुसार विश्वस्त मंडळावरील सभासदांची निवड, यूनोमध्यें नवीन सभासदांना प्रवेश देणें, एखाद्या सभासदाचे हक्क व सवलती तात्पुरत्या रद्द करणें, सभासदांना यूनोंतून काढून टाकणें, विश्वस्त पद्धतीच्या अंमलबजावणीशीं संबंध असलेले प्रश्न, आणि अंदाजपत्रक विषयक प्रश्न.

३. याखेरीज इतर प्रश्नांबावत (यांत आणखी कोणत्या प्रश्नांबाबतचे निर्णय दोन-तृतियांश बहुमतानेंच केले जावेत ते ठरविण्याच्या आणखी एका प्रश्नाचाहि समावेश होतो.) करावयाचे निर्णय हजर असलेल्या व मत नोंदविणाऱ्या एकूण सभासदाच्या फक्त साध्या बहुमतानेच केले जातील.

**कलम १९ वें**

यूनोचा कारभार चालविण्यासाठीं प्रत्येक सभासद-राष्ट्रानें जी वर्गणी द्यावयाची असते ती जर एखाद्या सभासदाकडची यावयाची राहिली असली, आणि अशा रीतीनें त्याच्याकडे येणें असलेली रक्कम जर दोन वर्षाच्या एकूण वर्गणीइतकी किंवा त्यांहून जास्त असली तर त्याला आमसभेच्या बैठकीत मत देतां येणार नाही. तथापि त्या सभासदाकडची वर्गणी येण्याचें राहण्यास त्याच्या आवाक्याबाहेरच्याच गोष्टी कारण झाल्या आहेत अशी जर आमसभेची खात्री झाली तर ती त्यालाहि मत नोंदविण्याची परवानगी देईल.

# कामकाजाची पद्धति

**कलम २० वें**

आमसभेच्या दरवर्षी वार्षिक बैठका भरतील, आणि तसाच प्रसंग उद्‌भवल्यास तिच्या खास बैठकाहि भरतील. सुरक्षा-मंडळानें विनंति केल्यास, किंवा यूनोच्या बहुसंख्य सभासदांनीं तशी विनंति केल्यास सेक्रेटरी-जनरल हे अशा खास बैठका बोलावतील.

**कलम २१ वें**

आमसभाच तिच्या कामकाजाचे नियम तयार करील. प्रत्येक बैठकीसाठीं तीच आपला अध्यक्ष निवडील.

### कलम २२ वें

आमसभेला तिचीं कर्तव्यें बजावण्यासाठीं ज्या आणखी कांहीं दुय्यम संघटना असाव्यात असें वाटेल त्या तीच निर्माण करील.

## प्रकरण ५

## सुरक्षा-मंडळ

### रचना

### कलम २३ वें

१. यूनोच्या अकरा सभासदांचे मिळून सुरक्षा-मंडळ बनलेले असेल. चीनचें लोकसत्ताक राज्य, फ्रान्स, सोव्हिएट रशिया, ब्रिटन व अमेरिका ही पाच राष्ट्रें सुरक्षा-मंडळाचे कायमचे सभासद असतील. त्याखेरीज सुरक्षा-मंडळाच्या सहा अल्प मुदतीच्या सभासदांची निवड आमसभा तिच्या सभासदांतून करील, आणि तसें करतांना आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्याच्या कामीं आणि यूनो संघटनेच्या इतर उद्देशांच्या पूर्ततेच्या कामीं कोणाचें किती सहाय्य होते त्याकडे व निरनिराळ्या भूभागांत योग्य प्रतिनिधित्व देणें या गोष्टी प्राधान्येकरून लक्षांत घेतल्या जातील.

२. सुरक्षा-मंडळावरच्या मुदतीच्या सभासदांची निवड फक्त दोन वर्षाच्या मुदतीपुरती असेल. मुदतीच्या सभासदांच्या पहिल्या निवडणुकीचे वेळीं मात्र तीन सभासदांची निवड एक वर्षापुरती असेल. निवृत्त होणार असलेल्या मुदतीच्या सभासदाला पुन्हां लगेच निवडणुकीला उभे राहातां येणार नाही.

३. सुरक्षा-मंडळावरील प्रत्येक सभासद-राष्ट्राचा त्या मंडळांत एक प्रतिनिधी असेल.

## कर्तव्यें आणि अधिकार

### कलम २४ वें

१. यूनोला त्वरित व परिणामकारक उपाययोजना करतां यावी म्हणून शांतता व सुरक्षितता राखण्याबद्दलची प्राथमिक जबाबदारी आमसभेचे सभासद सुरक्षा-मंडळावर टाकतात, आणि या जबाबदारीनुसार सुरक्षा-मंडळ जेव्हां कोणती उपाययोजना करील तेव्हां त्यानें ती आपल्यातर्फेच —म्हणजे सभासदांतर्फेच—केली आहे असें मानण्याचें कबूल करतील.

२. अशा तऱ्हेनें सुरक्षा-मंडळावर टाकलीं गेलेलीं कर्तव्यें पार पाडीत असतां, तें यूनोचे उद्देश व तत्वें यांना अनुसरून वागेल. हीं कर्तव्यें कोणतीं तें यूनो-सनदेच्या सहा, सात, आणि बारा या प्रकरणांत सांगितलेलें आहे.

३. सुरक्षा-मंडळ आमसभेला आपले वार्षिक व जरूर तेव्हां खास अहवाल विचारासाठीं सादर करील.

### कलम २५ वें

सुरक्षा-मंडळानें केलेले निर्णय मान्य करण्याचें आणि ते अंमलांत आणण्याचें, या सनदेनुसार, आमसभेचे सभासद कबूल करतील.

### कलम २६ वें

जगांतील माणसें व पैसा या स्वरूपाची साधनसामुग्री शस्त्रास्त्रवाढीसाठी मुळींच वापरली न जातां, आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता प्रस्थापित करण्याचें व राखण्याचें कार्य करतां यावें यासाठीं, कलम ४७ मध्यें उल्लेख करण्यांत आलेल्या मिलिटरी स्टाफ कमिटीच्या मदतीनें योजना आंखण्याची आणि शस्त्रास्त्रनियंत्रणाची एक पद्धति निर्माण करण्याकरितां ती आमसभेच्या मंजुरीकरितां तिच्यापुढें ठेवण्याची सुरक्षा-मंडळावर जबाबदारी राहील.

## मतदान

### कलम २७ वें

१. सुरक्षा-मंडळाच्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल.

२. सुरक्षा-मंडळाचें कामकाज कशा रीतीनें चालावें या संबंधाच्या प्रश्नांचे निर्णय त्या मंडळांतील ७ सभासदांचीं मतें जशीं पडतील तसे ठरतील.

३. इतर सर्व प्रश्नांबद्दलचे निर्णय, सुरक्षा-मंडळांतील पांचहि कायम सभासदांसकट एकूण सात सभासदांचीं मतें जशीं पडतील त्याप्रमाणें ठरतील, मात्र प्रकरण ६ मध्यें सांगितलेल्या व कलम ५२, परिच्छेद ३ मध्यें सांगितलेल्या विषयांबाबत निर्णय ठरवितांना, तंटयाशीं संबंध असलेल्या राष्ट्रानें मतदानांत भाग घेतलेला असूं नये.

## कामकाजाची पद्धति

### कलम २८ वें

१. सुरक्षा-मंडळ असें बनविलें गेलेलें असावें कीं त्याला अखंड काम करीत राहातां येईल. यासाठीं, यूनोच्या मुख्य कचेरीच्या जागीं

सुरक्षा-मंडळांतील प्रत्येक सभासदाचा प्रतिनिधी कायमचा हजर असेल.

२. सुरक्षा-मंडळ कांहीं ठराविक मुदतीनें आपल्या बैठकी भरवील, आणि अशा बैठकींच्या वेळीं प्रत्येक सभासद-राष्ट्राला, त्याची इच्छा असल्यास, त्याच्या सरकारमधील एखादा मंत्री किंवा तसाच मुद्दाम पाठविलेला दुसरा खास अधिकारी त्या राष्ट्राचा प्रतिनिधी म्हणून बसूं शकेल.

३. सुरक्षा-मंडळाला त्याच्या कार्याच्या दृष्टीनें जास्त सोयीस्कर वाटल्यास तें, यूनोच्या मुख्य कचेरीच्या ठिकाणाखेरीज दुसऱ्याहि कोणत्या जागीं, आपल्या बैठकी भरवूं शकेल.

### कलम २९ वें

सुरक्षा-मंडळाला त्याचीं कर्तव्यें बजावण्याच्या कामीं जशी गरज भासेल त्याप्रमाणें तें आपल्या दुय्यम शाखा निर्माण करूं शकेल.

### कलम ३० वें

सुरक्षा-मंडळ स्वतःच त्याच्या कामकाजाचे नियम ठरवील. त्या मंडळाचा अध्यक्ष कसा कसा निवडावयाचा त्या संबंधाची पद्धतीहि तेंच नक्की करील.

### कलम ३१ वें

सुरक्षा-मंडळापुढें चर्चेस आलेल्या एखाद्या प्रश्नांत आपलेच हितसंबंध मुख्यतः गुंतलेले आहेत असें जर, त्या मंडळाचा सभासद नसलेल्या अशा यूनो-सभासदाला वाटलें तर तें त्या विषयासंबंधाच्या सुरक्षा-मंडळांतील चर्चेंत भाग घेऊं शकेल ; फक्त त्याला मत देण्याचा तेवढा अधिकार असणार नाहीं.

### कलम ३२ वें

सुरक्षा-मंडळापुढें चर्चेस आलेल्या एखाद्या वादाशीं ज्या राष्ट्राचा संबंध असेल तें यूनोचा सभासद असलें पण सुरक्षा-मंडळाचा सभासद नसलें, किंवा यूनोचाहि सभासद नसलें तरी, त्या वादासंबंधाच्या चर्चेमध्यें भाग घेण्यासाठीं सुरक्षा-मंडळ त्याला आमंत्रण देईल. अशा राष्ट्राला मताचा मात्र हक्क असणार नाहीं. यूनोचा सभासद नसलेल्या राष्ट्राला सुरक्षा-मंडळांतील चर्चेंत भाग घेऊं देण्याच्या बाबतींत त्या मंडळाला योग्य वाटतील त्या अटीहि तें घालील.

# प्रकरण ६

# तंट्यांचा शांततामय निकाल

## कलम ३३ वें

१. जो एखादा वाद तसाच चिघळत राहिल्यास त्यामुळें आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता यांना धोका उत्पन्न होण्याचा संभव असेल त्यांतील दोन्हीं पक्ष, पहिल्या प्रथम, त्या वादाचा निकाल लावण्यासाठीं वाटाघाटी, चौकशी, मध्यस्थी, तडजोड, लवाद, न्यायालय, प्रादेशिक व्यवस्था किंवा त्यांना पसंत असे दुसरे शांततामय मार्ग यांचा अवलंब करतील.

२. तशी जरूर दिसेल त्यावेळीं, सुरक्षा-मंडळच त्यांना या मार्गानीं आपला वाद मिटवायला सांगेल.

## कलम ३४ वें

ज्यामुळें राष्ट्रांराष्ट्रांत संघर्ष सुरू होण्याचा व वाद वाढण्याचा संभव असेल अशा सर्व प्रकरणांबाबत — तीं तशीच चिघळत राहिलीं तर खरोखरच आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता बिघडेल कीं काय तें ठरविण्याच्या दृष्टीनें—सुरक्षा-मंडळ चौकशी करील.

## कलम ३५ वें

१. आमसभेचा कोणीहि सभासद कोणताहि वाद किंवा कलम ३४ मध्यें निर्देश केलेल्या प्रकारचें कोणतेंहि प्रकरण सुरक्षा-मंडळाच्या अगर आमसभेच्या नजरेला आणूं शकेल.

२. यूनोचा सभासद नसलेलें असें कोणतेंहि राष्ट्र, तें स्वतः ज्या वादांतला एक पक्ष असेल, असा वाद सुरक्षा-मंडळाच्या अगर आमसभेच्या नजरेस आणूं शकेल, पण तसें करण्यापूर्वी, यूनोच्या सनदेमध्यें शांततामय समेटाबाबत ज्या जबाबदाऱ्यांचा उल्लेख केलेला आहे त्यांचा या वादापुरता तरी त्या राष्ट्रानें आधींच स्वीकार केला पाहिजे.

३. या कलमान्वयें जे विषय आमसभेच्या नजरेस आणले जातील त्यांच्या बाबतींतलें तिचें कामकाज कलम ११ व १२ यांजमधील नियमांना धरूनच असलें पाहिजे.

## कलम ३६ वें

१. कलम नं. ३३ मध्यें ज्यांचें वर्णन केलें आहे अशा प्रकारच्या कोणत्याहि वादांत किंवा प्रकरणांत—तें कोणत्याहि अवस्थेंत असो—तें कशा

प्रकारच्या कार्यपद्धतीनें मिटवावें याबद्दल सुरक्षा-मंडळ शिफारस करूं शकेल.

२. कोणत्याहि वादांतल्या दोन्ही पक्षांनीं, त्यांचा तो वाद मिटविण्यासाठीं, आधी जी कोणती कार्यपद्धति अवलंबिलेली असेल तीहि सुरक्षा-मंडळानें विचारांत घ्यावी.

३. या कलमान्वयें कोणत्याहि शिफारशी करतांना, कोणतींहि कायदेशीर भांडणें, आंतरराष्ट्रीय न्यायालयाबद्दलच्या कायद्यांनुसार सर्वसाधारणतः आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडेच दोन्हीं पक्षांनीं सोपविलीं पाहिजेत हें सुरक्षा-मंडळानें लक्षांत घ्यावें.

**कलम ३७ वें**

१. कलम ३३ मध्यें निर्देशिलेल्या प्रकारच्या एखाद्या वादांतील दोन्हीं पक्षांना, त्याच कलमांत सांगितलेल्या साधनांनीं त्यांचा वाद मिटविणें जर शक्य झालें नाहीं तर त्यांनीं तो वाद सुरक्षा-मंडळाकडे सोंपवावा.

२. तो वाद तसाच चिघळत राहिल्यास आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता बिघडल्याशिवाय खास राहाणार नाहीं असें जर सुरक्षा-मंडळाला वाटलें तर, कलम नं. ३६ अन्वयें त्यानेंच स्वतः कांहीं उपाययोजना करावी कीं ज्या कोणत्या अटींवर तो वाद मिटवून टाकणें त्याला योग्य वाटतें त्यांची नुसती शिफारस करावी तें सुरक्षा-मंडळ ठरवील.

**कलम ३८ वें**

कोणत्याहि एखाद्या वादांतील सर्व पक्षांनी तशी विनंति केल्यास, कलम नं. ३३ ते ३७ यांतील नियमांना कोणत्याहि प्रकारें बाध न येतां, तो वाद शांततेच्या मार्गांनीं मिटविण्याबाबत सुरक्षा-मंडळ त्यांना शिफारशी करूं शकेल.

## प्रकरण ७

# शांतता बिघडविण्याच्या धमक्या, शांतताभंग आणि आक्रमणाचीं कृत्यें यांजवरची उपाययोजना

**कलम ३९ वें**

शांततेला धोका उत्पन्न झाला आहे कीं काय, शांतताभंग झाला आहे कीं काय, अगर आक्रमण झालें आहे कीं काय तें सुरक्षा-मंडळ ठरवील आणि आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं किंवा पुन्हां प्रस्थापित

करण्यासाठीं काय केलें पाहिजे त्याबद्दल कलम ४१ व ४२ यांना अनुसरून शिफारशी करील किंवा तें ठरवील.

### कलम ४० वें

कोणतेंहि प्रकरण विकोपास जाण्याचें टाळण्यासाठीं, कलम ३९ मध्यें सांगितल्याप्रमाणें कोणती उपाययोजना करावी त्याबद्दल शिफारस करण्यापूर्वी किंवा निर्णय घेण्यापूर्वी, सुरक्षा-मंडळ त्याला योग्य दिसतील ते तात्पुरते उपाय मान्य करण्याबद्दल त्या प्रकरणाशी संबंध असलेल्या दोन्हीं पक्षांना सुचवील. अशा रीतीनें तात्पुरत्या उपायांचा स्वीकार करण्यामुळें त्या दोन्हीं पक्षांपैकीं कोणाच्याहि हक्कांना, दाव्यांना किंवा स्थानाला बाध येणार नाहीं. अशा तऱ्हेचे तात्पुरते उपाय जर मानले गेले नाहींत तर सुरक्षा-मंडळ त्याची योग्य ती दखल घेईल.

### कलम ४१ वें

आपण ठरविलेल्या निर्णयांचा अंमल करण्यासाठी, ज्यांत सैन्यबळ वापरण्याचा संबंध येत नाहीं असे कोणते उपाय योजावेत तें सुरक्षा-मंडळ ठरवील, आणि त्यांचा अंमल सुरू करण्याचा यूनोच्या सभासदांना आदेश देईल. आर्थिक संबंध आणि रेल्वे, समुद्र, हवा, पोस्ट, तारा, रेडिओ, व दळणवळणाचीं इतर साधनें यांचा व्यवहार अर्धवट किंवा पूर्णपणें बंद करण्याचाहि त्या उपायांत समावेश असेल.

### कलम ४२ वें

कलम नं. ४१ मध्यें सांगितलेले उपाय अपुरे पडण्यासारखे आहेत अगर अपुरे ठरले आहेत असें जर सुरक्षा-मंडळाला वाटलें तर आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता कायम राखण्यासाठीं किंवा पुन्हां प्रस्थापित करण्यासाठीं जरूर वाटेल त्याप्रमाणें तें वैमानिक, नाविक व भौमिक दलांचा उपयोग करील.

### कलम ४३ वें

१. आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता कायम राखण्याच्या कामीं मदतगार होण्यासाठीं, सुरक्षा-मंडळाकडून तशी मागणी आली तर व खास करारानुसार किंवा करारांनुसार त्याला आपले सैनिक देण्याची आणि इतर मदत व सवलती देण्याची सभासद-राष्ट्रें हमी देत आहेत. या सवलतींमध्यें आपल्या हद्दींतून प्रवास करण्याचा हक्कहि तीं देतील.

२. हा जो खास करार किंवा हे जे खास करार केले जातील त्यांत कोणत्या प्रकारचें व किती सैन्य द्यावें, तें कितपत तयारीचें असावें व त्याला

कोणत्या भागांत ठेवावें, आणि ज्या सवलती व मदत दिली जाणार तिचें स्वरूप काय असावें तें ठरविलें गेलेलें असावें.

३. हा करार किंवा हे करार शक्य तितक्या लवकर सुरक्षा-मंडळाच्या पुढाकारानेंच घडवून आणले जातील. ते सुरक्षा-मंडळ व यूनोचे सभासद यांजमध्यें किंवा सुरक्षा-मंडळ व कांही सभासदांचा गट यांजमध्यें झालेले करार असतील आणि त्या करारांवर सह्या करणाऱ्या राष्ट्रांमध्यें रूढ असले-लेल्या राज्यपद्धतीप्रमाणें त्या त्या राष्ट्रांचें त्यावर शिक्कामोर्तब व्हावें लागेल.

### कलम ४४ वें

शस्त्रबलाचा उपयोग करावयाचा असें सुरक्षा-मंडळानें एकदां नक्की ठरविले म्हणजे मग, त्या मंडळाचा सभासद नसलेल्या अशा एखाद्या राष्ट्राकडून, कलम ४३ अन्वयें त्यानें आधीं दिलेल्या वचनाप्रमाणें त्याच्या सैनिक मदतीची मागणी करण्यापूर्वी—त्या राष्ट्राची तशी इच्छा असल्यास—त्याचें सैन्य कोठें व कशा प्रकारें वापरलें जावयाचें या संबंधांत सुरक्षा-मंडळांत जेव्हां चर्चा होईल तेव्हां तीत भाग घेण्यासाठीं त्या राष्ट्रालाहि बोलाविलें जाईल.

### कलम ४५ वें

यूनोला त्वरित लष्करी उपाययोजना करतां येण्यासाठी, तिचे सभासद असलेली राष्ट्रें त्यांच्या त्यांच्या विमानदलांच्या तुकडया ताबडतोब तयार करतील आणि संयुक्तपणें करावयाच्या कृतीसाठीं देतील. या तुकडयांमध्यें किती किती विमानें असावींत, त्यांची तयारी कितपत असावी, आणि त्यानीं करावयाच्या कृतीची योजना काय असावी तें, कलम नं. ४३ मध्यें निर्दिष्ट केलेल्या एका किंवा अनेक करारांच्या मर्यादेंत सुरक्षा-मंडळ त्याच्या मिलिटरी स्टाफ कमिटीच्या मदतीनें निश्चित करील.

### कलम ४६ वें

लष्करी बलाचा उपयोग करण्याबद्दलच्या योजना सुरक्षा-मंडळानें आपल्या मिलिटरी स्टाफ कमिटीच्या मदतीनें ठरविलेल्या असतील.

### कलम ४७ वें

१. आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्यासाठी सुरक्षा-मंडळाला केव्हां व किती सैन्याची गरज पडेल, तिच्या स्वाधीन केलेल्या सैन्याचा कोठें उपयोग करावयाचा व त्याचें अधिपत्य कोणाकडे द्यावयाचें, शस्त्रास्त्र-परवठा कसा चाल ठेवावयाचा या आणि गरज पडली तर निःशस्त्रीकरण

कसें करावयाचें या सर्व बाबतींत सुरक्षा-मंडळाला सल्लामसलत व मदत देण्यासाठी एक मिलिटरी स्टाफ कमिटी निर्माण केलेली असेल.

२. सुरक्षा-मंडळाचे कायम सभासद असलेल्या राष्ट्रांच्या चीफ्स् ऑफ स्टाफची किंवा त्यांच्या प्रतिनिधींची ही कमिटी बनलेली असेल. या कमिटीनें अंगिकारलेल्या जबाबदाऱ्या उत्तम प्रकारें पार पडण्यासाठीं, तिच्यावर ज्या राष्ट्राला कायमचें प्रतिनिधित्व मिळालेलें नाही अशा पण यूनोच्या सभासद असलेल्या राष्ट्राच्या सहकार्याची जर कमिटीला जरुरी भासली तर ती त्या सभासद-राष्ट्राला कमिटीशी सहकार्य करण्यास बोलावील.

३. सुरक्षा-मंडळाच्या दिमतीस दिलेल्या कोणत्याहि सैन्याचें युद्धदृष्टचा मार्गदर्शन करण्याची जबाबदारी त्या मंडळाच्या हुकुमतीखालीं या मिलिटरी स्टाफ कमिटीकडे असेल. असल्या सैनिकदलांवरचें अधिपत्य कोणाकडे असावें तें पुढें ठरविलें जाईल.

४. ही मिलिटरी स्टाफ कमिटी, सुरक्षा-मंडळाकडून तसा अधिकार मिळवून आणि ज्या त्या प्रादेशिक संघटनेशीं सल्लामसलत करून, आपल्या हाताखालीं प्रादेशिक समित्याहि स्थापन करील.

**कलम ४८ वें**

१. आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता कायम राखण्यासाठीं सुरक्षा-मंडळानें घेतलेल्या निर्णयांच्या अंमलबजावणीकरितां जी कृति करावी लागेल ती सुरक्षा-मंडळ ठरवील त्याप्रमाणें, यूनोच्या सर्व सभासदांनीं मिळून किंवा त्यांतील कांहींनी केलेली असेल.

२. सुरक्षा-मंडळाच्या त्या निर्णयांचा यूनोच्या सर्व सभासदांकडून प्रत्यक्षपणें आणि ज्या दुसऱ्या आंतरराष्ट्रीय संघटनांचे ते सदस्य असतील त्यांच्या कृतीच्या रूपानें अंमलांत येतील.

**कलम ४९ वें**

सुरक्षा-मंडळानें जे उपाय योजण्याचें निश्चित केलें असेल ते अमलांत आणण्याच्या कामीं परस्परांना मदत करण्यासाठीं यूनोचे सभासद एकजुटीनें काम करतील.

**कलम ५० वें**

सुरक्षा-मंडळानें एखाद्या राष्ट्राविरुद्ध प्रतिबंधक किंवा शिक्षात्मक उपाययोजना सुरू केली असतां, त्या उपाययोजनेच्या अंमलबजावणीमुळें, आपल्यापुढें नवेच खास असे आर्थिक प्रश्न निर्माण झाले आहेत असें जर

दुसऱ्या एखाद्या राष्ट्राला आढळून आलें तर–तें राष्ट्र यूनोचा सभासद असलें किंवा नसलें तरी–त्याला हें प्रश्न कसें सोडवावेत याबाबत सुरक्षा-मंडळाला विचारण्याचा हक्क आहे.

### कलम ५१ वें

या सनदेमध्यें कांहींहि म्हटलेलें असलें तरी, यूनोचा सभासद असलेल्या एखाद्या राष्ट्रावर जर कोणाकडून सशस्त्र हल्ला झालाच तर शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं सुरक्षा-मंडळाकडून कांहीं उपाययोजना होईपर्यंत, स्वसंरक्षणार्थ व्यक्तिशः किंवा इतरांच्या मदतीनें लढण्याचा त्या राष्ट्राच्या स्वयंभू हक्काला त्यामुळें बाध येणार नाहीं. पण या आपल्या हक्कानुसार त्यानें जी काय उपाययोजना केलेली असेल तिची त्यानें ताबडतोब सुरक्षा-मंडळाला खबर मात्र दिली पाहिजे. त्या राष्ट्रानें स्वतः कांहींहि उपाययोजना केलेली असली तरी, शांतता राखण्यासाठीं किंवा पुन्हां प्रस्थापित करण्यासाठीं स्वतःला योग्य वाटतील ते उपाय योजण्याची या सनदेन्वयें सुरक्षा-मंडळाला जी सत्ता मिळालेली आहे किंवा त्याच्यावर जी जबाबदारी पडलेली आहे तिला कोणत्याहि प्रकारें बाध येणार नाहीं.

## प्रकरण ८

## प्रादेशिक व्यवस्थापक मंडळें

### कलम ५२ वें

१. आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं कांहीं विशिष्ट भागांतच उपाययोजना करून भागण्यासारखें असल्यास त्यासाठीं प्रादेशिक व्यवस्थापक मंडळें अस्तित्वांत यायला या सनदेंतील कोणत्याहि कलमामुळें बाध येत नाहीं. फक्त ती व्यवस्था व यंत्रणा यांचीं कृत्यें यूनोच्या उद्देशांना अगर तत्वांना अनुसरणारीं अशीच असलीं पाहिजेत.

२. यूनोचे सभासद असलेलीं जीं राष्ट्रें अशीं प्रादेशिक व्यवस्थापक मंडळें निर्माण करतील त्यांनीं, सुरक्षा-मंडळाकडे धांव घेण्यापूर्वी, त्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळामार्फत शांततामय उपायांनींच स्थानिक प्रश्न सोडविण्याचा हरतऱ्हेनें प्रयत्न करायला हवा.

३. त्या त्या प्रदेशांतलीं स्थानिक भांडणें, त्या भांडणांशीं ज्या राष्ट्रांचा संबंध असेल त्यांच्या पुढाकारानें किंवा सुरक्षा-मंडळाच्या सूचनेवरून असल्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांमार्फत शांततामय मार्गांनीं सोडविलीं जाण्याच्या

पद्धतीचा प्रसार होण्यास सुरक्षा-मंडळ उत्तेजन देईल.

४. या कलमामुळें ३४ व ३५ नंबरच्या कलमांचा अंमल करण्यास कोणत्याहि प्रकारें हरकत उत्पन्न होत नाहीं.

### कलम ५३ वें

१. सुरक्षा-मंडळाला योग्य वाटल्यास आपल्या शिक्षात्मक उपाय-योजनांच्या अंमलबजावणीसाठीं तें असल्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळाचाहि आपल्या हुकूमतीखालीं उपयोग करून घेईल. पण सुरक्षा-मंडळाकडून तसा अधिकार मिळाला नसतां, एखाद्या शत्रु-राष्ट्राविरुद्ध करावयाच्या उपाययोजनेव्यतिरिक्त, दुसरी कोणती शिक्षात्मक उपाययोजना या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांना करतां येणार नाहीं. शत्रु-राष्ट्रांविरुद्धच तेवढी त्यांनीं जी उपाययोजना करावयाची तीसुद्धां शत्रु-राष्ट्रांनीं पुन्हां डोकें वर काढूं नये एवढ्याचपुरती आणि त्या त्या राष्ट्रांच्या सरकारांच्या विनंतीवरून यूनो-संघटना स्वतःच ती जबाबदारी आपल्याकडे घेईपर्यंत करावयाची आहे.

२. या कलमाच्या पहिल्या परिच्छेदांत वापरलेला 'शत्रु-राष्ट्र' हा शब्द या सनदेवर सह्या करणाऱ्या कोणाहि राष्ट्रांचीं दुसऱ्या महायुद्धांत जीं राष्ट्रें शत्रू होतीं त्यांतील कोणाहि राष्ट्राला उद्देशून आहे.

### कलम ५४ वें

आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं कोणाहि प्रादेशिक व्यवस्थापक मंडळानें सुरू केलेल्या किंवा सुरू करणार असलेल्या कोणत्याहि खटपटींची सुरक्षा-मंडळाला नेहमीं पूर्ण खबर दिली गेली पाहिजे.

## प्रकरण ९

# आंतरराष्ट्रीय आर्थिक व सामाजिक सहकार्य

### कलम ५५ वें

सर्व लोकांना सारखे अधिकार आणि स्वयंनिर्णय असले पाहिजेत या तत्वाबद्दलच्या आदरामुळें सर्व राष्ट्रांत शांततेचे आणि मैत्रीचे संबंध निर्माण होण्याकरितां, अत्यंत आवश्यक अशी स्थैर्याची व सुबत्तेची परिस्थिति अस्तित्वांत आणण्याच्या दृष्टीनें यूनोनें पुढील गोष्टी करण्याचें ठरविलें आहे.

अ. लोकांच्या राहाणीचें मान वाढविणें, सर्वांना पुरेसें काम, आणि आर्थिक व सामाजिक प्रगति व वाढ यांचा लाभ होईल अशा सोयी उपलब्ध करून देणें.

ब. राष्ट्रा-राष्ट्रांतले आर्थिक, सामाजिक, आरोग्यविषयक आणि तदनुषंगिक असे इतर प्रश्न सोडविणें आणि राष्ट्रां-राष्ट्रांत सांस्कृतिक व शैक्षणिक सहकार्य घडविणें.

क. वंश, लिंग, भाषा व धर्म या कारणामुळें कोणत्याहि बाबतींत भेदभाव केला न जातां सर्वांना माणुसकीचे अधिकार व मूलभूत हक्क मिळालेच पाहिजेत या तत्वाचा सर्वांनीं आदर करणें व त्याप्रमाणें वागणें.

### कलम ५६ वें

कलम ५५ मध्यें सांगितलेल्या उद्दिष्टांच्या सिद्धीसाठीं यूनो संघटनेशीं व्यक्तिशः आणि संघशः सहकार्य करण्याचें सर्व राष्ट्रें वचन देत आहेत.

### कलम ५७ वें

१. राष्ट्रां-राष्ट्रांतील करारांमुळें अस्तित्वांत आलेल्या आणि त्या करारांमुळेंच आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, आरोग्यविषयक, व तसल्याच इतर क्षेत्रांत कार्य करण्याची ज्यांच्यावर जबाबदारी पडली आहे अशा सर्व खास संघटनांचा कलम नं. ६३ मध्यें सांगितलेल्या तऱ्हेनें यूनोशीं संबंध जोडला गेला आहे.

२. अशा प्रकारें यूनोशीं नातें जोडलें गेलेल्या या संघटनांचा यापुढें 'खास संघटना' असा उल्लेख केलेला आहे.

### कलम ५८ वें

या सर्व खास संघटनांच्या धोरणांत व कार्यांत कशी एकसूत्रता आणावी याबाबत यूनोने शिफारशी करावयाच्या आहेत.

### कलम ५९ वें

कलम नं. ५५ मध्यें सांगितलेल्या उद्देशाच्या पूर्तीसाठीं जेथें अशा खास संघटनांची आवश्यकता आहे असें तिला वाटेल तेथें तेथें त्या स्थापन होण्याकरितां तिनें संबंधित राष्ट्रांशीं वाटाघाटी कराव्या.

### कलम ६० वें

या कलमामध्यें यूनो संघटनेच्या ज्या कर्तव्यांचा उल्लेख आला आहे तीं हातून पार पाडण्याबद्दलची जबाबदारी आमसभेवर, आणि तिच्या

हुकूमतीखालीं कार्य करणाऱ्या 'आर्थिक व सामाजिक मंडळा'वर टाकण्यांत आली असून, त्यांना त्यांच्या कार्यासाठीं दिलेले अधिकार प्रकरण नं. १० मध्यें निर्दिष्ट केले आहेत.

## प्रकरण १०

# आर्थिक व सामाजिक मंडळ—रचना

### कलम ६१ वें

१. यूनोंतील १८ सभासदांची आमसभेनें निवड करून हे मंडळ बनलेलें असेल.

२. परिच्छेद नं. ३ मध्यें सांगितलेल्या अपवादाव्यतिरिक्त इतर वेळीं, या मंडळांतील ६ सभासद दरवर्षी तीन-तीन वर्षे मुदतीपुरते निवडले जातील. ज्या सभासदाची सभासदत्वाची मुदत संपत असेल त्यालाहि पुन्हां निवडून येतां येईल.

३. या मंडळाच्या अगदीं पहिल्या निवडणुकीच्या वेळी या मंडळावरचे १८ सभासद निवडले जातील पण त्यांतल्या ६ सभासदांचे सभासदत्व मात्र एक वर्षानेंच संपेल, आणि दुसऱ्या ६ सभासदांचें आणखी एक वर्षानें संपेल. कोणाकोणाचें सभासदत्व अशा प्रकारें लवकर संपावें तें आमसभा ठरवून देईल.

४. या आर्थिक व सामाजिक मंडळाचें सभासदत्व मिळालेल्या राष्ट्राचा त्या मंडळांत एक प्रतिनिधि असेल.

# कर्तव्यें आणि अधिकार

### कलम ६२ वें

१. या आर्थिक व सामाजिक मंडळानें राष्ट्रा-राष्ट्रांतील आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, आरोग्यविषयक आणि तदनुषंगिक अशा इतर प्रश्नांबद्दल अभ्यास करवून अहवाल तयार करावेत आणि त्या संबंधांत शिफारशी त्यानें आमसभेकडे, यूनोच्या सभासदांकडे व ज्यांचा संबंध असेल त्या खास समित्यांकडे कराव्यात.

२. सर्व लोकांना एकसारखेच माणुसकीचे अधिकार व मूलभूत हक्क असावेत या तत्वाला मान्यता मिळावी व त्याचें पालन व्हावें यासाठींहि त्यानें शिफारशी कराव्यात.

३. त्याच्या अधिकारक्षेत्रांत मोडणाऱ्या विषयांच्या बाबतींत जे संकेत पाळले जावेत असें त्याला वाटेल त्यांचे मसुदे आमसभेपुढें ठेवण्यासाठीं त्यानें तयार करावेत.

४. त्याच्या अधिकारक्षेत्रांत मोडणाऱ्या विषयांसंबंधांत, गरज पडेल तेव्हां यूनोनें घालून दिलेल्या नियमांनुसार तें आंतरराष्ट्रीय परिषदहि बोलावील.

## कलम ६३ वें

१. कलम नं. ५७ मध्यें ज्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांचा उल्लेख केलेला आहे त्यांचा आणि यूनोचा संबंध कोणत्या प्रकारचा असावा तें हें आर्थिक व सामाजिक मंडळ त्यांच्याशीं करार घडवून आणून ठरवील. या करारांना आमसभेच्या मंजुरीची आवश्यकता आहे.

२. अशा तऱ्हेच्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांशीं विचारविनिमय करून व त्यांना शिफारशी करून, त्याचप्रमाणें आमसभेला व यूनोच्या सभासद-राष्ट्रांना शिफारशी करून हें आर्थिक व सामाजिक मंडळ त्या प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांच्या कार्यांत एकसूत्रता आणील.

## कलम ६४ वें

१. अशा तऱ्हेच्या खास संघटना—प्रादेशिक मंडळें वगैरें—मार्फत नियमितपणें त्यांच्या कामांचे अहवाल मिळत जाण्यासाठीं हें मंडळ योग्य ते उपाय योजील. त्यानें स्वतः केलेल्या, आणि आमसभेनें त्याच्या अधिकारक्षेत्रांत मोडणाऱ्या विषयांबाबत केलेल्या शिफारशी अंमलांत आणण्यासाठीं काय काय प्रत्यक्ष कार्य केलें आहे त्याबाबत हें मंडळ यूनोच्या सभासद-राष्ट्रांकडून व प्रादेशिक व्यवस्थापक मंडळांकडून अहवाल मिळविण्याची व्यवस्था करवील.

२. अशा रीतीनें त्याच्याकडे आलेल्या अहवालासंबंधांत त्याला स्वतःला काय वाटतें तेंहि हें मंडळ आमसभेला लिहून कळवील.

## कलम ६५ वें

सुरक्षा-मंडळाला जी कोणती माहिती पाहिजे असेल ती हें मंडळ पुरवील आणि त्यानें विनंति केल्यास त्याला इतरहि मदत देईल.

## कलम ६६ वें

१. आमसभेनें केलेल्या शिफारशी अंमलांत आणण्याच्या दृष्टीनें जीं कर्तव्यें करावयाचीं त्यांतलीं आपल्या अधिकारक्षेत्रांत मोडणारीं कर्तव्यें हें मंडळ करीत जाईल.

२. यूनोच्या सभासदांनीं व दुसऱ्या खास संघटनांनी तशी विनंति केल्यास, आमसभेच्या संमतीनें हें मंडळ त्या सभासदांचीं किंवा खास संघटनांचींहि कामें करून देईल.

३. याच सनदेमध्यें इतरत्र उल्लेख केलेलीं किंवा यापुढें आमसभेकडून त्याच्याकडे सोपविलीं जाणारीं कामेंहि हें मंडळ करील.

## मतदान

### कलम ६७ वें

१. या मंडळाच्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल.

२. या मंडळाच्या सभांना हजर असणाऱ्या व मतें नोंदविणाऱ्या सभासदांच्या बहुमतानेंच या मंडळाचे निर्णय ठरतील.

## कामकाजाची पद्धति

### कलम ६८ वें

आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत काम करण्यासाठीं व माणुसकीच्या हक्कांचा सर्व लोकांना लाभ होण्याच्या तत्वाच्या प्रसारासाठीं, आणि आपल्या कार्यांच्या अंमलबजावणीसाठीं हें 'कमिशन्स' नेमूं शकेल.

### कलम ६९ वें

यूनोचा सभासद असलेल्या अशा एखाद्या राष्ट्राच्या खास हितसंबंधांचा प्रश्न असेल तेव्हां हें मंडळ त्या राष्ट्राच्या प्रतिनिधीला आपल्या चर्चेंत भाग घ्यायला बोलावील; मात्र त्या प्रतिनिधीला या मंडळांत मत देण्याचा हक्क असणार नाहीं.

### कलम ७० वें

निरनिराळ्या खास संघटनांच्या प्रतिनिधींनीं आपल्या बैठकींतील चर्चेंत किंवा आपण नेमलेल्या निरनिराळ्या 'कमिशन्स'च्या चर्चेंत भाग घ्यावा यासाठीं, आणि त्याच्या स्वतःच्या प्रतिनिधींना त्या खास संघटनांच्या चर्चेंत भाग घेतां यावा अशी हें मंडळ व्यवस्था करील.

### कलम ७१ वें

आपल्या अधिकार क्षेत्रांत मोडणाऱ्या अशा विषयांशीं, निरनिराळ्या राष्ट्रांतल्या ज्या बिनसरकारी संस्थांचा संबंध येत असेल अशा संस्थांशीं

सल्लामसलत करण्याचीहि हें मंडळ योग्य ती व्यवस्था करील. अशीच व्यवस्था तें आंतरराष्ट्रीय संस्थांशीं आणि जेथें जरूर तेथें ज्या राष्ट्राचा संबंध असेल त्या राष्ट्राच्या संमतीनें त्यांतल्या राष्ट्रीय संस्थांशी तें ही व्यवस्था ठरवील.

### कलम ७२ वें

१. आपलें कामकाज कसें चालावें याबद्दलचे नियम हें मंडळ ठरवील, त्याचा अध्यक्ष कसा निवडावयाचा तें ठरविण्याचेंहि या मंडळाच्याच हातांत असेल.

२. या मंडळाच्या बैठका केव्हां भराव्यात यासंबंधाचे जे नियम असतील त्या नियमांनुसार त्याच्या बैठका भरतील. मंडळाच्या बहुसंख्य सभासदांनीं विनति केल्यास सभा भरविलीच पाहिजे अशीहि त्या नियमांत तरतूद असेल.

# प्रकरण ११

## स्वराज्याचे अधिकार नसलेल्या प्रदेशांबद्दलची घोषणा

### कलम ७३ वें

ज्या प्रदेशांतल्या लोकांना अजून स्वराज्याचे अधिकार प्राप्त झालेले नाहींत अशा प्रदेशांच्या राज्यकारभाराची जबाबदारी आज ज्यांच्यावर आहे किंवा जी पुढें घेतील तीं यूनोचे सभासद असलेली राष्ट्रें, त्या त्या प्रदेशांतल्या लोकांचें कल्याण हीच सर्वांत महत्वाची गोष्ट आहे हें कबूल करीत आहेत; आणि या सनदेनें आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता यांच्यासाठीं जी पद्धति आंखून दिलेली आहे तिच्या मर्यादेंत राहून, त्या प्रदेशांतल्या लोकांच्या सुखासमाधानांसाठीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त करणें ही आपली पवित्र अशी जबाबदारी आहे हेंहि मान्य करीत आहेत. उपरोक्त उद्देशासाठी पुढील गोष्टी करण्याला तीं स्वतःला बांधून घेत आहेत :—

अ. त्या त्या लोकांच्या संस्कृतीला योग्य तो मान देऊन,त्यांची राजकीय, आर्थिक, सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टया उन्नति करणें; त्यांना न्यायानें वागविणें, आणि निंदा-नालस्तीपासून त्यांचें संरक्षण करणें.

ब. त्यांना त्यांचा राज्यकारभार चालविण्यास शिकविणें, त्यांच्या राजकीय आकांक्षांची योग्य जाणीव ठेवणें, आणि त्यांच्या स्वतंत्र राजकीय संस्थांची प्रगतीच्या दिशेनें वाढ करणें. असें करतांना प्रत्येक प्रदेशाची,

तेथल्या लोकांची आणि त्यांच्या प्रगतीच्या निरनिराळ्या टप्प्यांची योग्य ती जाणीव ठेवली जाईल.

क. राष्ट्रांराष्ट्रांतील शांतता व सुरक्षितता यांची वाढ करणें.

ड. विकासाच्या विधायक योजनांना प्रोत्साहन देणें, संशोधनात्मक कार्यांना उत्तेजन देणें, आणि एकमेकांशी, व जरूर तेथें आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या खास संघटनांशीं सहकार्य करणें.

ई. सुरक्षिततेच्या व राज्यघटनात्मक निर्बंधांच्या दृष्टीनें जेवढें गुप्त ठेवावें लागेल, तेवढ्या बाबी वगळून बाकीच्या बाबतींत सेक्रेटरी-जनरल यांना माहिती पुरवीत जाणें. ज्या प्रदेशांच्या बाबतींत त्यांच्यावर जबाबदारी टाकली गेलेली आहे तेवढ्यापुरतेंच त्यांनीं हें करावयाचें आहे; प्रकरण १२ व १३ हीं ज्यांना लागू होतात त्या प्रदेशांबद्दल नव्हे.

### कलम ७४ वें

चांगले शेजारी या नात्यानें एकमेकांशीं वागण्याच्या तत्वानुसार आपण जशीं आपापल्या स्वतःच्या प्रदेशांबाबतचीं धोरणें आंखतों तशींच या—म्हणजे हें प्रकरण ज्यांना लागू पडतें त्या—प्रदेशांबद्दलहि आंखलीं पाहिजेत हें यूनोचे सभासद असलेल्या राष्ट्रांना मान्य असून, असें करतांना सामाजिक, आर्थिक, व व्यापारविषयक बाबतींत बाकीच्या जगाचेंहि हित लक्षांत ठेवलें पाहिजे हें तीं जाणून आहेत.

## प्रकरण १२

# आंतरराष्ट्रीय विश्वस्त पद्धति

### कलम ७५ वें

पुढें वैयक्तिक करारानुसार ज्या प्रदेशांचा कारभार आपल्या हुकूमती-खालीं दिला जाणार त्यांची व्यवस्था पाहाण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय विश्वस्त पद्धति यूनो अस्तित्वांत आणीत आहे. अशा प्रकारें यूनोच्या विश्वस्त-पद्धतीच्या अधिकारकक्षेंत दिलेल्या प्रदेशांना यापुढें 'विश्वस्त-प्रदेश' असें संबोधिलेलें आहे.

### कलम ७६ वें

या सनदेच्या पहिल्या कलमांत यूनोचे जे उद्देश सांगितलेले आहेत त्यांना अनुसरून या विश्वस्त पद्धतीचे मूलभूत हेतु पुढें दिल्याप्रमाणें आहेत:—

अ. राष्ट्रां-राष्ट्रांतील शांतता व सुरक्षितता यांची वाढ करणें.

**ब.** विश्वस्त प्रदेशांतल्या रहिवाशांचा राजकीय, आर्थिक, सामाजिक, आणि शैक्षणिक दृष्टचा विकास करणें, आणि त्या त्या प्रदेशाची व तेथल्या लोकांची विशिष्ट परिस्थिति, आणि त्या लोकांनीं व्यक्त करून दाखविलेली इच्छा यांना अनुसरून हळूहळू त्यांना स्वराज्य किंवा पूर्ण स्वातंत्र्याचे अधिकार प्राप्त होतील असें करणें. असें करतांना प्रत्येक विश्वस्त करारांत म्हटलेलें आहे तेंहि विचारांत घेतलें जाईल.

क. वंश, लिंग, भाषा, किंवा धर्म यांच्या निमित्तानें कोणताहि भेदभाव न करतां सर्वांना सारख्याच प्रमाणांत माणुसकीचे हक्क व मूलभूत स्वातंत्र्यें उपभोगतां आलीं पाहिजेत या तत्वाबद्दल आदर वाढविणें, आणि जगांतलीं माणसें परस्परावलंबी आहेत हें मान्य केलें जाण्यास उत्तेजन देणें; आणि

ड. यूनोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांना आणि त्या राष्ट्रांच्या नागरिकांना सामाजिक, आर्थिक आणि व्यापारविषयक बाबतींत समान वागणूक मिळेल अशी खबरदारी घेणें. त्याचप्रमाणें एका राष्ट्रांतल्या नागरिकांना दुसऱ्या राष्ट्रांत, कलम नं. ८० मधील अपवाद वगळून, समान वागणूक मिळेल अशी व्यवस्था करणें.

## कलम ७७ वें

**१.** विश्वस्त म्हणून कारभार पहाण्याबद्दलच्या करारानुसार विश्वस्तांच्या स्वाधीन केल्या गेलेल्या पुढील प्रकारच्या प्रदेशांना विश्वस्त पद्धति लागू होईल.

अ. राष्ट्रसंघाच्या हुकुमान्वयें कोणा देशाच्या स्वाधीन केले गेलेले,

ब. दुसऱ्या महायुद्धाचा परिणाम म्हणून शत्रू-राष्ट्रांपासून तोडून काढलेले प्रदेश,

क. ज्या प्रदेशांच्या राज्यकर्त्यांनीं स्वखुशीनें ते विश्वस्त पद्धतिखालीं दिले असतील असे.

२. वर जे प्रकार दिले आहेत त्यांतले कोणते विश्वस्त पद्धतिखालीं घ्यावयाचे व कोणत्या अटींवर घ्यावयाचें ते मागाहून होणाऱ्या करारानुसार ठरेल.

## कलम ७८ वें

यूनोचे सभासद झालेल्या प्रदेशांना विश्वस्त पद्धति लागू केली जाणार नाहीं. त्या प्रदेशांना बाकीच्या राष्ट्रांसारखेंच सार्वभौमत्वाचे अधिकार असल्यासारखें त्यांच्याशीं नातें ठेवलें जाईल.

### कलम ७९ वें

विश्वस्त पद्धतिखालीं दिल्या जाणाऱ्या प्रदेशांबद्दलच्या विश्वस्त करारांतील अटींना,—त्यांतील फेरफार किंवा दुरुस्तीसह—ज्या राष्ट्रांचा त्या प्रदेशांशीं प्रत्यक्ष संबंध असेल त्यांची संमति असली पाहिजे. जे प्रदेश राष्ट्रसंघाच्या हुकुमानें एखाद्या राष्ट्राच्या ताब्यांत दिले गेले असतील त्यांच्या बाबतींतल्या त्या करारांना त्या ताबेदार—मँडेटरी—राष्ट्राचीहि संमति मिळाली पाहिजे, आणि कलम ८३ व ८५ अन्वयें, आमसभेंतहि त्यांस मंजुरी दिलेली असली पाहिजे.

### कलम ८० वें

१. कलम नं. ७७, ७९ व ८१ अन्वयें केल्या गेलेल्या आणि प्रत्येक प्रदेश विश्वस्त पद्धतिखालीं देणाऱ्या व्यक्तिगत विश्वस्त करारांत जें काय मान्य केलें गेलें असेल त्याखेरीज, आणि असे करार केले जाईतों—या प्रकरणांत कांहीं जरी लिहिलेलें असलें तरी—कोणत्याहि राष्ट्राचे अगर कोणत्याही लोकांचे जे हक्क असतील त्यांत किंवा सध्यांच्या ज्या आंतरराष्ट्रीय व्यवस्थेमध्यें यूनोचे सभासद असलेल्या राष्ट्रांचा भाग असेल त्या व्यवस्थेच्या अटींत आपोआप फेरफार झाला असें मानलें जाणार नाहीं.

२. सध्यांच दुसऱ्यांच्या ताब्यांत असलेले किंवा इतर दुसरे प्रदेश विश्वस्त पद्धतिखालीं देण्यासाठीं ज्या वाटाघाटी व जे करार करावयाचे त्यांस विलंब लावण्याला कारण म्हणून या कलमांतील पहिल्या परिच्छेदाचा उपयोग करतां येणार नाहीं.

### कलम ८१ वें

कोणत्याहि विश्वस्त करारामध्यें, विश्वस्त पद्धतिखालीं दिलेल्या प्रदेशाचा कारभार कोणत्या अटींनुसार चालावा, आणि तो कारभार कोणत्या 'ॲथॉरिटी'नें चालवावा तें स्पष्ट सांगितलेलें असेल. ही म्हणजे कारभार पहाणारी 'ॲथॉरिटी' कदाचित् एकच राष्ट्र असेल, कदाचित् अनेक राष्ट्रें असतील किंवा कदाचित् खुद्द यूनोच असेल.

### कलम ८२ वें

विश्वस्त व्यवस्थेचा करार ज्या प्रदेशाला लागू करावयाचा आहे, त्या प्रदेशापैकीं कांहीं भाग 'युद्धदृष्टया महत्वा'चा असा करारांत उल्लेख करतां येईल. सर्व प्रदेश किंवा त्याचा एक किंवा अनेक भाग—यांचा एका अशा

विभागांत समावेश असू शकेल. कलम ४३ अन्वयें केलेल्या कराराला व करारांना याची कोणत्याहि प्रकारें बाधा होणार नाहीं.

### कलम ८३ वें

१. युद्धदृष्टचा महत्वाच्या अशा सर्व प्रदेशांबद्दलचीं यूनोचीं कर्तव्यें ––यांत विश्वस्त व्यवस्थेच्या करारांना मान्यता देणें, ते बदलणें किंवा त्यांत दुरुस्त्या करणें यांचाहि समावेश होतोच––सुरक्षा-मंडळामार्फत होतील.

२. कलम नं. ७६ मध्यें सांगितलेलीं सर्व मूलभूत उद्दिष्टें, युद्धदृष्टचा महत्वाच्या अशा प्रत्येक प्रदेशांतील लोकांनाहि लागू होतील.

३. युद्धदृष्टचा महत्वाच्या अशा प्रदेशांत, राजकीय, सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक बाबतींत कार्य करण्याची जी जबाबदारी विश्वस्त-पद्धतिमुळें यूनोवर पडते ती सुरक्षा-मंडळ हेंच विश्वस्त मंडळाच्या मदतीनें पार पाडील. तसें करतांना विश्वस्त व्यवस्थेच्या करारांतील अटी त्यानें ध्यानांत ठेवाव्या लागतील. पण संरक्षणविषयक गरजांनुसार आवश्यक तें करायला मात्र त्यामुळें बाध येणार नाही.

### कलम ८४ वें

राष्ट्रांराष्ट्रांत शांतता व सुरक्षितता राखण्याच्या बाबतींत विश्वस्त प्रदेशावर जी कामगिरी पडली असेल ती त्याच्याकडून पार पडेलच अशी खबरदारी मात्र त्या प्रदेशाचा कारभार पहाणाऱ्या 'ॲथॉरिटी'नें घेतलीच पाहिजे आणि या दृष्टीची आपल्यावर जी जबाबदारी तिनें घेतली असेल ती पार पाडण्याकरितां त्याचप्रमाणें त्या त्या विश्वस्त प्रदेशाच्या संरक्षणाकरितां आणि त्यांत कायदा व सुव्यवस्था यांची घडी न बिघडू देण्याकरितां स्वयंसैनिक-दलांची व इतर सवलतींची तेथल्या लोकांकडून मदत घेतली पाहिजे.

### कलम ८५ वे

१. ज्या प्रदेशांना 'युद्धदृष्टचा महत्वाचे' असें गणलें गेलें नसेल अशा सर्व प्रदेशांबद्दलचीं यूनोचीं कर्तव्यें––म्हणजे विश्वस्त करार मान्य करणें, ते बदलणें किंवा त्यांत दुरुस्त्या करणें वगैरे––तिच्यातर्फे आमसभा पार पाडील.

२. हीं सर्व कर्तव्यें पार पाडण्याला आमसभेच्या हुकूमतीखालीं वागणारें विश्वस्त मंडळ तिला सहाय्य करील.

# प्रकरण १३

## विश्वस्त मंडळ—रचना

### कलम ८६ वें

१. यूनोच्या, पुढें वर्णन दिलेल्या, सभासदांचें हें विश्वस्त मंडळ बनलेलें असेल :—

अ. विश्वस्त प्रदेशांचा कारभार ज्यांच्याकडे दिलेला आहे असे सभासद ;

ब. विश्वस्त प्रदेशांचा कारभार पहात नसलेले पण ज्यांचा कलम नं. २३ मध्यें नांवानिशी उल्लेख आहे असे सभासद ; आणि

क. ज्यांच्याकडे कारभार आहे व ज्यांच्याकडे नाहीं अशा सभासदांची संख्या विश्वस्त मंडळांत सारखी-सारखी असण्याकरितां जेवढ्या सभासदांची गरज असेल तेवढे आमसभेनें तीन वर्षापुरतेच निवडून दिलेले सभासद.

२. विश्वस्त मंडळाचा सभासद असलेलें प्रत्येक राष्ट्र या प्रश्नांत तज्ज्ञ असलेल्या अशा एकाच प्रतिनिधीची आपल्यातर्फे मंडळावर नेमणूक करील.

## कर्तव्यें आणि अधिकार

### कलम ८७ वें

आमसभा आणि तिच्या हुकूमतीखालीं वागणारें विश्वस्त मंडळ हीं त्यांची कर्तव्यें पार पाडण्यासाठीं पुढील गोष्टी करतील :—

अ. कारभार पहाणाऱ्या 'ॲथॉरिटी'नें सादर केलेल्या अहवालांचा विचार करणें ;

ब. अर्जांचा स्वीकार करणें आणि कारभार पाहाणाऱ्या 'ॲथॉरिटी'च्या सल्लामसलतीनें त्यांची तपासणी करणें ;

क. कारभार पहाणारी 'ॲथॉरिटी' मान्य करील त्या त्या वेळीं निरनिराळ्या विश्वस्त प्रदेशांना भेटी देण्याची व्यवस्था करणें;

ड. आणि विश्वस्त करारांतील अटींना अनुसरूनच या किंवा अन्य गोष्टी करणें.

### कलम ८८ वें

प्रत्येक विश्वस्त प्रदेशांतील रहिवाशांच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक, आणि शैक्षणिक विकासासंबंधांत विश्वस्त मंडळ एक प्रश्नावली तयार करील, आणि आमसभेच्या अधिकार क्षेत्राखालील प्रत्येक विश्वस्त कारभार पहाणारी 'अॅथॉरिटी' त्या प्रश्नावलीच्या आधारें आमसभेला प्रतिवर्षी अहवाल सादर करील.

## मतदान

### कलम ८९ वें

१. विश्वस्त मंडळाच्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल.

२. विश्वस्त मंडळाच्या बैठकीला हजर असणाऱ्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतानेंच या मंडळाचे निर्णय ठरतील.

## कामकाजाची पद्धति

### कलम ९० वें

१. विश्वस्त मंडळ स्वतःच त्याच्या कामकाजाचे नियम ठरवील, मंडळाच्या अध्यक्षाची निवड करण्याची पद्धतीहि तेंच ठरवील.

२. विश्वस्त मंडळाच्या नियमांत सांगितलें असेल त्याप्रमाणें त्या मंडळाच्या बैठका भरतील. मंडळाच्या बहुसंख्य सभासदांनीं तशी विनंति केल्यास बैठक बोलाविली गेलीच पाहिजे अशीहि याबाबतच्या नियमांत अट असेल.

### कलम ९१ वें

आर्थिक व सामाजिक मंडळ आणि इतर खास संघटना यांचा ज्या विषयांशीं संबंध आहे त्या प्रकारच्या विषयांबाबत, तशी जरुरी भासली तर, विश्वस्त मंडळ त्या मंडळाचीहि मदत घेईल.

# प्रकरण १४

## आंतरराष्ट्रीय न्यायालय

### कलम ९२ वें

आंतरराष्ट्रीय न्यायालय हेंच यूनो संघटनेचें मुख्य न्यायपीठ असेल.

यासोबत जोडलेल्या 'स्टॅटयूट ऑफ दि इंटरनॅशनल कोर्ट ऑफ जस्टिस' या कायद्यानुसार त्याचें काम चालवावयाचें असून, हें न्यायालय हा एक या सनदेचा अविभाज्य भाग आहे.

### कलम ९३ वें

१. यूनोचे सभासद असलेलीं सर्व राष्ट्रें या 'स्टॅटयूट ऑफ दि इंटरनॅशनल कोर्ट ऑफ जस्टिस' कायद्याची आपोआपच भागीदार आहेत.

२. यूनोचा सभासद नसलेल्या अशाहि राष्ट्राला या न्यायालयविषयक कायद्याचा वांटेकरी होतां येईल. पण अशा प्रत्येक राष्ट्राच्या बाबतींत सुरक्षा-मंडळाच्या शिफारशीवरून आमसभा ज्या अटी घालील त्या त्याला मान्य कराव्या लागतील.

### कलम ९४ वें

१. या न्यायालयापुढें आणलेल्या कोणत्याहि वादांत पक्षकार असलेला यूनोचा प्रत्येक सभासद त्याचे निर्णय मान्य करण्याचें कबूल करीत आहे.

२. या न्यायालयानें दिलेल्या निर्णयानुसार एखाद्या पक्षकारावर पडणारी जबाबदारी पार पाडण्यास जर तो पक्षकार चुकला तर, दुसरा पक्षकार मंडळाकडे दाद मागूं शकेल, आणि त्या मंडळाला जर आवश्यक वाटलें तर न्यायालयाच्या त्या निर्णयाचा अंमल होण्यासाठीं तें शिफारशी करील किंवा कांहीं उपाययोजनाहि करण्याचें ठरवील.

### कलम ९५ वें

या सनदेमध्यें कांहींहि लिहिलेलें असलें तरी, यूनोच्या सभासद राष्ट्रांनीं त्यांचे मतभेदाचे प्रश्न — आधींच अस्तित्वांत असलेल्या किंवा पुढें केल्या जाणाऱ्या करारांनुसार — दुसऱ्या कोणत्या लवादाकडे सोंपविण्यास बाधा येणार नाहीं.

### कलम ९६ वें

१. कोणत्याहि एखाद्या कायदेविषयक प्रश्नावर या न्यायालयाकडून केवळ सल्ल्याच्या रूपानें मत मिळविण्यासाठीं आमसभा किंवा सुरक्षा-मंडळ त्यास विनंति करूं शकेल.

२. यूनोच्या इतर अंगभूत संघटनांना व संस्थांना आमसभेनें अधिकार दिला म्हणजे, आपल्या कार्यक्षेत्रांतून उत्पन्न झालेल्या कायद्याच्या प्रश्नावर न्यायालयाकडून सल्ला मागविण्यांत येईल.

# प्रकरण १५

# सेक्रेटरिएट

### कलम ९७ वें

सेक्रेटरिएट हें एक सेक्रेटरी-जनरल, व या संघटनेला जरूर वाटेल तेवढा इतर नोकरवर्ग मिळून बनलेलें असेल. सुरक्षा-मंडळाच्या शिफारशीवरून आमसभा या सेक्रेटरी-जनरलची नेमणूक करील. यूनो संघटनेचा मुख्य कारभारी हा सेक्रेटरी-जनरलच असेल.

### कलम ९८ वें

सेक्रेटरी-जनरल हा मुख्य कारभारी याच आपल्या नात्यानें आमसभेच्या सुरक्षा-मंडळाच्या, आर्थिक व सामाजिक मंडळाच्या, आणि विश्वस्त मंडळाच्या बैठकींत बसेल व बोलेल आणि या संस्था त्याच्यावर जीं आणखी दुसरीं कामें सोंपवितील तीहि करील. तसेंच यूनो संघटनेनें सबंध वर्षांत काय कार्य केलें त्याचा अहवालहि आमसभेला तो सादर करील.

### कलम ९९ वें

जी एखादी घटना राष्ट्रा-राष्ट्रांतली शांतता व सुरक्षितता धोक्यांत आणण्यास कारणीभूत होण्यासारखी आहे असें सेक्रेटरी-जनरलला वाटेल, ती तो सुरक्षा-मंडळाच्या नजरेस आणील.

### कलम १०० वें

१. सेक्रेटरी-जनरल व त्यांच्या हाताखालचा नोगरवर्ग यांनीं त्यांची कामें करतांना कोणा सरकारकडून अगर यूनोखेरीज दुसऱ्या कोणत्याहि अधिकाऱ्याकडून हुकूम मागावयाचा नाहीं किंवा त्यांचा हुकूम मानावयाचा नाहीं. फक्त यूनोलाच जबाबदार असलेले आंतरराष्ट्रीय अधिकारी या नात्याच्या त्यांच्या इभ्रतीला कमीपणा येईल अशी कोणतीहि कृति त्यांनी करावयाची नाहीं.

२. सेक्रेटरी-जनरल व त्यांचा नोकरवर्ग यांचें कार्य अगदीं पूर्णपणें आंतरराष्ट्रीय स्वरूपाचेंच आहे हें ध्यानांत ठेवण्याचें आणि ते लोक त्यांचें कर्तव्य पार पाडीत असतां त्यांजवर कोणत्याहि प्रकारचें दडपण न आणण्याचें यूनोचा प्रत्येक सभासद मान्य करीत आहे.

### कलम १०१ लें

१. आमसभेनें केलेल्या नियमांनुसार सेक्रेटरी-जनरल हाच त्याच्या नोकरवर्गाची नेमणूक करील.

२. आर्थिक व सामाजिक मंडळ व विश्वस्त मंडळ यांना, आणि जशी गरज वाटेल त्याप्रमाणें, यूनोच्या इतर अंगभूत संस्थांना त्यांचा त्यांचा कायम नोकरवर्ग वांटून दिला जाईल. हा सर्व नोकरवर्ग सेक्रेटरिएटचाच भाग समजला जाईल.

३. सेक्रेटरिएटसाठीं नोकरवर्ग निवडतांना आणि त्यांच्या नोकरीच्या अटी ठरवितांना, जास्तींत जास्त कार्यक्षमता, लायकी आणि निष्ठा यांचाच निकष लावला जाईल. शक्य तितक्या विस्तृत भौगोलिक क्षेत्रांतलीं माणसें या नोकरवर्गात असणें अगत्याचें आहे, ही गोष्टही प्राधान्येंकरून लक्षांत घेतली जाईल.

## प्रकरण १६

## इतर उपयुक्त तरतूदी

### कलम १०२ रें

१. ही सनद अंमलांत आल्यानंतरच्या काळांत यूनोच्या कोणाहि सभासदानें दुसऱ्या कोणाहि राष्ट्राशीं केलेला प्रत्येक तह किंवा प्रत्येक करार सेक्रेटरिएटमध्यें नोंदला जाईल, आणि तें तो प्रसिद्ध करील.

२. या कलमाच्या पहिल्या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें सेक्रेटरिएटकडे न नोंदल्या गेलेल्या अशा कोणत्याहि तहाचा अगर कोणत्याहि कराराचा यूनोच्या कोणत्याहि शाखेपुढें आधार म्हणून उपयोग करण्याचा त्या तहाच्या अगर कराराच्या कोणाहि पक्षकाराला अधिकार असणार नाहीं.

### कलम १०३ रें

यूनोचा सभासद असणाऱ्या कोणाहि राष्ट्रावर या सनदेन्वयें पडणाऱ्या जबाबदाऱ्या आणि दुसऱ्या कोणत्या आंतरराष्ट्रीय करारामुळें पडणाऱ्या जबाबदाऱ्या यांजमध्यें जेव्हां विरोध उत्पन्न होईल तेव्हां या सनदेन्वयें पडणाऱ्या जबाबदाऱ्यांनाच प्राधान्य दिलें जाईल.

### कलम १०४ थें

यूनो संघटनेचीं कर्तव्यें व उद्देश यांच्या पूर्तीसाठीं तिला जेवढ्या

कायदेशीर अधिकारांची गरज वाटेल तेवढे कायदेशीर अधिकार, तिचा सभासद असलेल्या प्रत्येक राष्ट्राच्या मुलुखांत तिला प्राप्त होतील.

**कलम १०५ वें**

१. यूनो संघटनेच्या उद्देशांच्या पूर्ततेसाठीं तिला तिचा सभासद असलेल्या प्रत्येक राष्ट्राच्या मुलुखांत ज्या कोणत्या सवलती किंवा जें कोणतें कायदेशीर संरक्षण लागेल तें तिला त्या त्या राष्ट्राकडून मिळेल.

२. यूनोचे सभासद असलेल्या राष्ट्रांचे प्रतिनिधी व यूनोचे अधिकारी यांनाहि, त्या संघटनेसंबंधांतली त्यांचीं कर्तव्यें पूर्ण स्वतंत्रपणें करतां येण्यासाठीं, वरील कलमांतल्या सारख्याच सवलती व कायदेशीर संरक्षण दिलें जाईल.

३. या कलमाच्या पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांच्या अंमलबजावणी-संबंधींचे तपशीलवार नियम आमसभाच शिफारशींच्या रूपानें सुचवील, किंवा यूनोच्या सभासदांनीं त्यासाठी कोणते संकेत पाळण्याचें ठरवावें त्याची दिशा दाखवील.

## प्रकरण १७

# सुरक्षिततेसंबंधाच्या तात्पुरत्या योजना

**कलम १०६ वें**

कलम ४२ अन्वयें सुरक्षा-मंडळावर पडणाऱ्या जबाबदाऱ्यांचा तें अंमल करूं लागूं शकेल असे कलम नं. ४३ मध्यें सांगितलेले खास करार घडून येईपर्यंत, ता. ३० ऑक्टोबर १९४३ रोजीं मॉस्को येथें सह्या केल्या गेलेल्या चौराष्ट्रीय घोषणेचीं पक्षकार राष्ट्रें आणि फ्रान्स अशीं मिळून एकूण पांच राष्ट्रें, राष्ट्रां-राष्ट्रांत शांतता व सुरक्षितता राखण्यासच्या दृष्टीनें जेव्हां जेव्हां जरूर पडेल तेव्हां तेव्हां, आपसांत एकमेकांशीं व प्रसंगीं यूनोच्या इतर सभासद-राष्ट्रांशीं सल्लामसलत करतील.

**कलम १०७ वें**

या सनदेवर सह्या करणाऱ्या राष्ट्रांशीं दुसऱ्या महायुद्धाचे वेळीं ज्यांचें शत्रुत्व होतें त्या राष्ट्रांविरुद्ध यूनोच्या सभासदांनीं केलेली कोणतीहि उपाययोजना, या सनदेमध्यें कांहीहि लिहिलेलें असलें तरीं, रद्दबातल ठरणार नाही.

# प्रकरण १८

# दुरुस्त्या

## कलम १०८ वें

या सनदेमध्यें दुरुस्त्या सुचविणाऱ्या उपसूचना आमसभेमध्यें मांडण्यांत येऊन दोन-तृतियांश सभासदांच्या बहुमतानें त्या मंजुर झाल्या, त्या उपसूचनांवर यूनोच्या प्रत्येक सभासद राष्ट्राच्या सरकारनें त्याच्या त्याच्या राज्यघटनेंतील पद्धतीप्रमाणें शिक्कामोर्तब केलें म्हणजे त्या दुरुस्त्या कायम होतील, आणि सर्व सभासद-राष्ट्रांवर त्यांचा अंमल होईल. सुरक्षा-मंडळाचे कायम सभासद असलेल्या सर्वच राष्ट्रांची या दुरुस्त्यांना संमति मिळालेली असलीच पाहिजे.

## कलम १०९ वें

१. सध्यांच्या या सनदेचा फेरविचार करण्यासाठीं यूनोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांची एक सर्वसाधारण परिषद भरवावी असें जर आमसभेंतील दोन-तृतियांश सभासदांनीं व सुरक्षा-मंडळांतील ७ सभासदांनीं तशीं मतें देऊन ठरविलें तर ती म्हणतील त्या वेळीं व त्या ठिकाणीं तशी परिषद भरूं शकेल. या परिषदेमध्यें यूनोचा सभासद असलेल्या प्रत्येक सभासदाला एक मत असेल.

२. ही परिषद हजर सभासदांच्या दोन-तृतियांश बहुमतानें सध्यांच्या सनदेमध्यें जे कोणते फेरफार सुचवील त्यांवर, यूनोच्या एकूण सभासद-राष्ट्रांतील दोन-तृतियांश सभासद-राष्ट्रांनीं व सुरक्षा-मंडळांतील कायम सभासदांसकट एकूण ७ राष्ट्रांनीं त्यांच्या त्यांच्या राज्यघटनेंतील पद्धती-प्रमाणें, शिक्कामोर्तब केलें म्हणजेच ते फेरफार अंमलांत येतील.

३. ही सनद अंमलांत आल्यापासून आमसभेची दहावी वार्षिक सर्वसाधारण परिषद भरण्याची वेळ येईपर्यंतच्या कालांत, एकदांहि जर अशी परिषद भरविली गेली नाहीं तर, अशी परिषद भरविण्याबद्दलची सूचना त्या दहाव्या वार्षिक परिषदेच्या कार्यक्रम पत्रिकेंत पुढें मांडली जाईल, आणि आमसभेंतील सभासदांच्या साध्या बहुमतानें व सुरक्षा-मंडळांतील कोणाहि सात सभासदांच्या मतानें तशी परिषद भरूं शकेल.

# प्रकरण १९

## शिक्कामोर्तब व सह्या

### कलम ११० वें

१. या सनदेवर सह्या करणाऱ्या सभासदांनी त्यांच्या त्यांच्या राष्ट्रांत रूढ असलेल्या घटनात्मक पद्धतीनें तिच्यावर शिक्कामोर्तब केलें पाहिजे.

२. अशा प्रकारें त्यांनीं केलेलीं सर्व शिक्कामोर्तब-पत्रें अमेरिकन सरकारकडे ठेवलीं जातील आणि जीं कोणकोणतीं राष्ट्रें या सनदेवर शिक्कामोर्तब करून पाठवितील त्यांची नांवें तें सरकार या सनदेवर सह्या करणाऱ्या सर्व राष्ट्रांना व यूनोचा सेक्रेटरी-जनरल नेमला गेल्यावर त्याला वेळोवेळीं कळवीत जाईल.

३. या सनदेवर चीन, फ्रान्स, सोव्हिएट रशिया, ब्रिटन व अमेरिका, आणि तिच्यावर सह्या करणाऱ्या इतर राष्ट्रांतील बहुसंख्य राष्ट्रें यांनीं शिक्कामोर्तब केलें म्हणजे ती अंमलांत येईल. त्यानंतर, अमेरिकेचें सरकार त्याच्याकडे आलेल्या सर्व शिक्कामोर्तब-पत्रांची एक यादी तयार करील आणि तिच्या प्रती सनदेवर सह्या करणाऱ्या सर्व राष्ट्रांकडे पाठवून देईल.

४. या सनदेवर सह्या करणाऱ्या राष्ट्रांनीं, ती अस्तित्वांत आल्यावर तिच्यावर शिक्कामोर्तब केलें म्हणजे, शिक्कामोर्तबीची नोंद झाल्या दिवसापासून, तीं राष्ट्रें यूनोचे आद्य सभासद बनतील.

### कलम १११ वें

ही सनद चिनी, फ्रेंच, रशियन, इंग्लिश व स्पॅनिश अशा पांच भाषांत लिहिलेली असून त्या पांचहि भाषांतील तिच्या प्रती अधिकृत प्रती मानण्यांत येतील आणि त्या सगळ्या अमेरिकन सरकारच्या ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयांत जतन करून ठेवल्या जातील. त्या सनदेच्या सही सही नकला करवून अमेरिकन सरकार सर्व राष्ट्रांकडें पोचत्या करील.

वरील सनदेवरील विश्वासानेंच यूनोंतील राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं तिच्यावर सह्या केल्या आहेत.

सॅन फ्रॅन्सिस्को या शहरीं एक हजार नऊशें पंचेचाळीस या सालीं जून महिन्याच्या सव्विसाव्या दिवशीं ही सनद जाहीर केली गेली.

# आंतरराष्ट्रीय न्यायालयाचा कायदा

(यूनोच्या सनदेवर सही करणाऱ्या प्रत्येक राष्ट्रानें या कायद्याचाहि स्वीकार केला असें आपोआप ठरेल.)

### कलम १ लें

यूनोची मुख्य न्यायसंस्था म्हणून तिच्या सनदेनुसार अस्तित्वांत येणारें हें आंतरराष्ट्रीय न्यायालय या कायद्यानुसार प्रस्थापिलें जाईल व कार्य करील.

## प्रकरण १

## न्यायालयाची घटना

### कलम २ रें

आपापल्या देशांत न्यायखात्यांतल्या अत्यंत वरिष्ठ अशा हुद्यांवर नेमणूक होण्यासारखी ज्यांची लायकी आहे, किंवा राष्ट्रां-राष्ट्रांतील संबंधांबद्दलच्या कायद्यांचें ज्यांचें ज्ञान सर्वमान्य आहे अशा फार उच्च चारित्र्याच्या व स्वतंत्र बाण्याच्या व्यक्तींची, त्या कोणत्या राष्ट्रांतल्या आहेत याकडे मुळीच लक्ष न देतां, न्यायमूर्ती म्हणून निवड करून हे न्यायालय प्रस्थापिलें जाईल.

### कलम ३ रें

१. या न्यायालयांत एकूण पंधरा न्यायाधीश असतील, पण त्यामध्यें एका वेळी कोणत्याही एका राष्ट्रांतल्या दोन व्यक्तींचा समावेश असणार नाहीं.

२. या न्यायालयांत न्यायाधीश म्हणून नेमणूक होणारी व्यक्ति जर एकाच वेळी अनेक राष्ट्रांचा नागरिक आहे असें वाटण्यासारखी परिस्थिति असेल तर, ज्या राष्ट्रांत ती आपले नागरिक व राजकीय हक्क बजावते त्याच राष्ट्राचा ती नागरिक आहे असें समजलें जाईल.

### कलम ४ थें

१. या न्यायालयांतील न्यायाधीशांची निवड आमसभेनें व सुरक्षा-मंडळानें 'पर्मनंट कोर्ट ऑफ आर्बिट्रेशन' मधल्या राष्ट्र-गटांनीं सुचविलेल्या यादींतून पुढें ठरवून दिलेल्या पद्धतीनुसार करावयाची आहे.

२. यूनोंतल्या ज्या सभासद राष्ट्रांना सदरहू 'कोर्ट ऑफ आर्बिट्रेशन'मध्यें प्रतिनिधित्व मिळालेलें नसेल त्यांचीं सरकारें, राष्ट्रां-राष्ट्रांतील भांडणें

शांततेनें मिटविण्यासाठीं १९०७ सालीं हेग येथें करण्यांत आलेल्या आंतरराष्ट्रीय कराराच्या—हेग कन्व्हेन्शन—४४ व्या कलमांत 'पर्मनंट कोर्ट ऑफ आर्बिट्रेशन'च्या सभासदत्वासाठी ज्या अटी घालण्यांत आलेल्या आहेत त्याच अटींवर निरनिराळ्या राष्ट्र-गटांतून आपापले उमेदवार उभे करूं शकतील.

३. यूनोचा सभासद नसलेल्या पण या 'आंतरराष्ट्रीय न्यायालय कायद्या'ला मान्यता देणाऱ्या राष्ट्रानें या न्यायालयांतील न्यायाधीशांच्या निवडणुकीत कसा भाग घ्यावयाचा तें, त्या बाबतींत आधींच एखादा खास करार झालेला नसल्यास, सुरक्षा-मंडळाच्या शिफारशीवरून आमसभा ठरवील.

## कलम ५ वें

१. या न्यायालयांतील न्यायाधिशांची निवड करण्याच्या वेळे आधीं निदान तीन महिने यूनोचा सेक्रेटरी-जनरल, या न्यायालय-कायद्याला मान्यता देणाऱ्या राष्ट्राचें 'पर्मनंट कोर्ट ऑफ आर्बिट्रेशन'वर ज सभासद असतील त्यांना उद्देशून, एक लेखी सूचनापत्रक काढून, एका ठराविक मुदतींत सदरहू न्यायालयांत न्यायमूर्ती म्हणून काम करण्यासारख्या व्यक्तींचीं नांवें सुचविण्याची त्यास विनंति करील. याच चौथ्या कलमांतल्या दुसऱ्या परिच्छेदांत नमूद केलेल्या राष्ट्र-गटांतील सभासदांनाहि त्यांनीं अशीच विनंति केली पाहिजे.

२. कोणत्याहि गटाला ४ पेक्षां जास्त व्यक्तीची नांवें सुचवितां येणार नाहींत आणि त्या ४ पैकीहि दोनपेक्षां जास्त नांवें कोणत्याहि एकाच राष्ट्रांतली असून चालणार नाहीत. जितक्या जागा भरावयाच्या असतील त्यांच्या दुप्पटीपेक्षां जास्त नांवें कोणत्याहि परिस्थितींत सुचविलीं जाऊं नयेत.

## कलम ६ वें

अशा प्रकारें उमेदवारांचीं नांवें सुचविण्यापूर्वीं, प्रत्येक राष्ट्र-गटानें आपापल्या सर्वोच्च न्यायालयांचा, विद्यापीठांतील कायद्यांच्या शिक्षणाच्या फॅकल्टीचा, आणि कायदा या विषयाचा जास्त अभ्यास करणाऱ्या इतर राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय शिक्षण संस्थांचा सल्ला घ्यावा अशी शिफारस आहे.

## कलम ७ वें

१. अशा रीतीनें सुचविल्या गेलेल्या सर्व नांवांची सेक्रेटरी-जनरल अक्षरानुक्रमानें यादी तयार करील, आणि कलम १२, परिच्छेद २ मध्यें सांगितलेल्या अपवादाव्यतिरिक्त फक्त याच व्यक्तींना निवडणुकीस उभे राहातां येईल.

२. ही यादी सेक्रेटरी-जनरल आमसभेला व सुरक्षा-मंडळाला सादर करील.

### कलम ८ वें

आमसभा व सुरक्षा-मंडळ एकमेकाकडून अगदीं स्वतंत्रपणें हे न्यायाधीश निवडण्याचें काम करतील.

### कलम ९ वें

ही निवडणूक करतांना, ज्या व्यक्तीला निवडून द्यावयाचें तिच्यामध्यें आवश्यक ते गुण असलेच पाहिजेत, या गोष्टीकडे जसें लक्ष द्यावयाचें त्याप्रमाणें निवडून दिलेल्या एकूण उमेदवारांमध्यें मिळून संस्कृतीच्या सर्व प्रमुख स्वरूपांचे आणि जगांतल्या सर्व प्रमुख अशा न्याय पद्धतींचे पुरेसे प्रतिनिधी असतीलच याकडेहि लक्ष दिलें गेलें पाहिजे.

### कलम १० वें

१. आमसभेमध्यें व सुरक्षा-मंडळांत ज्या उमेदवारांना ठणठणीत बहुमत मिळेल त्यांचीच या न्यायालयांत न्यायाधीश म्हणून निवड झाली असें समजलें जाईल.

२. न्यायाधीश निवडण्याच्या वेळीं, किंवा कलम १२ मध्यें निर्देश केलेल्या परिषदेसाठीं सभासद निवडण्यासाठीं, जीं मतें घ्यावयाची तीं घेतांना सुरक्षा-मंडळांतील कायम सभासद व मुदतीचे सभासद असा भेद केला जाणार नाहीं.

३. निवडणुकीच्या वेळीं एका राष्ट्रांतल्या एकाहून जास्त उमेदवारांना जर आमसभा व सुरक्षा-मंडळ या दोहोंतहि ठणठणीत बहुमत पडलें तर त्यांतला जो वयानें वडील असेल तोच निवडून आला असें समजलें जाईल.

### कलम ११ वें

जर, या निवडणुकीसाठीं भरलेल्या पहिल्या बैठकीनंतरहि एक किंवा अधिक जागा भरावयाच्या राहिल्या तर त्या भरण्यासाठीं दुसरी, आणि तशीच जरूर पडल्यास तिसरीहि बैठक भरेल.

### कलम १२ वें

१. जर तिसरी बैठक भरल्यानंतरहि एक किंवा अधिक जागा भरावयाच्या राहिल्याच तर त्या भरण्यासाठीं आमसभेच्या किंवा सुरक्षा-मंडळाच्या विनंतीवरून कोणत्याहि वेळीं, आमसभेचे ३ व सुरक्षा-मंडळाचे ३ अशा सहा सभासदांची एक संयुक्त बैठक भरविली जावी आणि एकेका जागेसाठीं

ठणठणीत बहुमतानें एकेका नांवाची निवड करून, आमसभा व सुरक्षा-मंडळ यांजकडून त्यांचा स्वीकार होण्यासाठीं तीं त्यांजकडे पाठविलीं जावीं.

२. कलम ७ मध्यें ज्या यादीचा उल्लेख आहे तसल्या यादींत एखाद्या व्यक्तीचें नांव नसलें तरीसुद्धां, एखाद्या व्यक्तीमध्यें आपणाला आवश्यक त्या लायक्या आहेत असें जर या संयुक्त बैठकीला एकमतानें वाटलें तर तिचेंहि नांव त्या यादींत समाविष्ट केलें जाईल.

३. उरलेल्या जागा भरण्यासाठीं निवडणूक करण्याचें काम आपल्याकडून यशस्वीपणें पार पडणार नाहीं असें जर का या संयुक्त बैठकीला आढळून आलें, तर न्यायाधीशपदावर आधींच निवड झालेल्या व्यक्तींनीं सुरक्षा-मंडळ ठरवून देईल त्या मुदतींत आमसभेंत व सुरक्षा-मंडळांत ज्यांना मतें पडलीं आहेत त्या व्यक्तींतून निवड करून, उरलेल्या जागा भरून काढाव्यात.

४. या निवडीच्या वेळीहि न्यायाधीशांचीं मतें जर समसमान विभागलीं गेलीं तर वयानें सर्वांत वडील न्यायाधीशाला निर्णायक मत देतां येईल.

## कलम १३ वें

१. आंतरराष्ट्रीय न्यायालयांतील न्यायाधीशांची निवड नऊ वर्षांसाठीं असून त्यांना पुन्हांहि निवडणुकीला उभे राहातां येईल. तथापि या न्यायालयासाठीं न्यायाधीशांची जी पहिलीच निवडणूक होईल तिच्यातल्या पांच जणांची ३ वर्षांनी मुदत संपेल व दुसऱ्या पांच जणांची ६ वर्षांनीं संपेल.

२. कोणत्या न्यायाधीशाची मुदत ३ वर्षांनी संपावी व कोणत्या न्यायाधीशांची मुदत ६ वर्षांनीं संपावी तें, पहिली निवडणूक झाल्यानंतर लगेच, सेक्रेटरी-जनरलनें चिठ्या टाकून ठरवून घ्यावें.

३. अधिकारपदावर असलेल्या न्यायाधीशांनीं त्यांच्या जागा भरून काढणारे दुसरे न्यायाधीश हजर होईपर्यंत आपलें काम करीत राहावें, आणि त्यांच्या जागांवर दुसरे न्यायाधीश जरी हजर झाले तरी त्यांनीं जे वाद ऐकायला आरंभ केला असेल ते पुरे करावे.

४. एखाद्या न्यायाधीशाला राजीनामा द्यावयाचा झाल्यास त्यानें तो अध्यक्षांना उद्देशून लिहावा व त्यांनीं तो सेक्रेटरी-जनरलकडे पाठवावा. या शेवटच्या नोटीशीनें त्या न्यायाधीशाची जागा रिकामी होते.

## कलम १४ वें

पहिल्या निवडणुकीसाठीं जी **पद्धति** अवलंबिली त्या पद्धतीनेंच या

रिकाम्या जागांसाठींहि निवडणूक व्हावी. पण त्यावेळीं पुढील नियम पाळावा :– जागा रिकामी झाल्यापासून एक महिन्याच्या आंत, कलम नं. ५ मध्यें सांगितलेल्या तऱ्हेनें सेक्रेटरी-जनरलनें उमेदवारांचीं नांवें मागवावी व निवडणुकीची तारीख सुरक्षा-मंडळानें ठरवावी.

## कलम १५ वें

ज्याची मुदत संपलेली नव्हती अशा एखाद्या न्यायाधीशाच्या जागीं निवडून आलेला नवा न्यायाधीश त्याच्या आधींच्या न्यायाधीशाच्या मुदतीपुरताच त्या पदावर राहूं शकेल.

## कलम १६ वें

१. या न्यायालयांत न्यायाधीशपदावर निवडून येणाऱ्या व्यक्तीनें कोणतीहि राजकीय किंवा राज्यकारभारविषयक कामगिरी करतां कामा नये ; त्याचप्रमाणें दुसरा कोणताहि धंदा करतां कामा नये.

२. या प्रश्नांसंबंधांत कोणता संशय उत्पन्न झाल्यास तो त्या न्यायमंडळाच्या निर्णयानें दूर करावा.

## कलम १७ वें

१. या न्यायालयांतील कोणाहि न्यायाधीशानें कोणत्याहि वादांत मुखत्यार, सल्लागार किंवा वकील म्हणून काम करूं नये.

२. तसेंच ज्या एखाद्या वादांत त्यानें पूर्वी मुखत्यार, सल्लागार किंवा वकील या नात्याने, किवा राष्ट्रीय अगर आंतरराष्ट्रीय न्यायमंडळाचा सभासद या नात्यानें, किवा चौकशी समितीचा सभासद म्हणून किंवा दुसऱ्या एखाद्या नात्यानें भाग घेतला असेल तर या न्यायालयांत त्यानें त्या वादांच्या निर्णयांत भाग घेतां कामा नये.

३. या प्रश्नांबाबत संशय उत्पन्न झाल्यास तो त्या न्यायमंडळाच्या निर्णयानें दूर करावा.

## कलम १८ वें

१. न्यायमंडळांतील बाकीच्या न्यायाधीशांच्या एकमतानें एखाद्या न्यायाधीशाला त्याच्या स्थानावर राहाण्यास अपात्र ठरविल्याखेरीज त्याला कामावरून दूर करतां येणार नाहीं.

२. तसें एखाद्या न्यायाधीशाबद्दल ठरविलें गेलें असल्यास सेक्रेटरी-जनरलला न्यायमंडळाकडून त्याप्रमाणें कळविलें गेलें पाहिजे.

३. अशा रीतीनें कळविलें गेलें कीं ती जागा रिकामी होते.

### कलम १९ वें

या न्यायमंडळाचे सभासद ज्यावेळीं कोर्टाचे काम करीत असतील त्यावेळीं त्यांना राजदूतांना मिळणाऱ्या सर्व सवलती व कायद्यांतून संरक्षण हीं मिळतील.

### कलम २० वें

या न्यायमंडळांतील न्यायाधीश म्हणून काम करूं लागण्यापूर्वी त्याच्या प्रत्येक सभासदानें अगदीं खुल्या न्यायालयांत "मी माझ्या सद्सद्विवेकबुद्धीला स्मरून व पूर्ण नि:पक्षपातीपणेंच माझें काम करीन" अशी गंभीरपणें शपथ घेतली पाहिजे.

### कलम २१ वें

१. या न्यायमंडळाचा अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची न्यायमंडळच निवड करील. त्यांना पुन्हां निवडणुकीला उभे राहातां येईल.

२. न्यायमंडळ स्वत:च आपला रजिस्ट्रार व जरूर ते इतर अधिकारी यांची नेमणूक करील.

### कलम २२ वें

१. न्यायमंडळाचें पीठ हेग येथें असेल. पण न्यायालयाला तशी जरुरी वाटल्यास तें इतरत्रहि न्यायदानाचें काम करूं शकेल.

२. न्यायमंडळाचे अध्यक्ष व रजिस्ट्रार या न्यायालयाच्या पीठस्थानींच वस्ती करून राहतील.

### कलम २३ वें

१. न्यायमंडळाचें कामकाज सुट्यांचे दिवस खेरीज करून नियमित चालू राहील. कोणत्या तारखांना किंवा किती किती दिवस सुटी असेल ते न्यायमंडळ ठरवील.

२. न्यायमंडळाच्या सभासदांना कांहीं कांहीं अवधीनंतर रजा घेण्याचा हक्क असेल. त्यांच्या रजेची तारीख, मुदत, हेगपासून त्याच्या सभासदांचे घर किती दूर आहे तें लक्षांत घेऊन न्यायमंडळ ठरवील.

३. न्यायाधिशांनीं सदोदीत न्यायमंडळाच्या कामासाठीं हजर राहाण्याची तयारी ठेवलीच पाहिजे. ते रजेवर असतील, अगर आजारीपणामुळें किंवा दुसऱ्या कोणत्या गंभीर कारणामुळें त्यांना हजर राहातां येण्यासारखें नसल्यास त्यांनीं तसें न्यायमंडळाच्या अध्यक्षांना कळविलें पाहिजे.

## कलम २४ वें

१. एखाद्या विशिष्ट वादांत आपण भाग घेऊं नये असें एखाद्या न्यायाधीशाला कांहीं खास कारणामुळें वाटत असलें तर त्यानें तसें न्यायमंडळाच्या अध्यक्षांना कळवावें.

२. कोणत्या खास कारणासाठीं एखाद्या न्यायाधीशानें एखादे विशिष्ट वादाचे वेळीं न्याय देण्याला बसूं नये असें न्यायमंडळाच्या अध्यक्षांना वाटल्यास ते तसें त्या न्यायाधीशाला कळवितील.

३. अशा एखाद्या बाबतींत तो न्यायाधीश व न्यायमंडळाचे अध्यक्ष यांचा जर मतभेद झाला तर सगळें न्यायमंडळ मिळून त्या बाबतींत निर्णय देईल.

## कलम २५ वें

१. या कायद्यांत स्पष्टपणें जेथें अन्य आदेश दिलेला आहे त्याखेरीजकरून बाकीच्या सगळ्या प्रश्नांच्या विचारासाठीं हें न्यायमंडळ बसूं शकेल.

२. पण केव्हांहि न्यायमंडळांत अकरापेक्षां कमी सभासद असून चालणार नाहीं. तथापि परिस्थितीप्रमाणें आणि आळीपाळीनें एक किंवा जास्त न्यायाधिशांना न्यायमंडळांत बसण्यांतून मोकळीक देतां येईल. अशी नियमांत तरतूद असावी.

३. नऊ न्यायाधीश हजर असले तरी कोरम पुरे होऊन न्यायमंडळाचें कार्य सुरूं करतां येईल.

## कलम २६ वें

१. एकेका जातीच्या वादांचा (उदाहरणार्थ—मजूरविषयक किंवा स्थलांतर—दळणवळणविषयक) निकाल लावण्यासाठीं प्रत्येकांत ३ किंवा अधिक न्यायाधीश असलेली एक किंवा अधिक चेंबर्स बनविण्याचा न्यायमंडळाला अधिकार आहे.

२. एखाद्या कोणत्याहि विशिष्ट वादाच्या विचारापुरतेंच चेंबर बनविण्याचाहि न्यायमंडळाला अधिकार आहे. अशा चेंबरमध्यें किती न्यायाधीशांनीं बसावें तें पक्षकारांच्या संमतीनें न्यायमंडळाचे अध्यक्ष ठरवितील.

३. पक्षकारांची जर संमति असेल तर, या कलमांत सांगितल्याप्रमाणें चेंबर्सच वाद ऐकून घेतील व न्याय देतील.

## कलम २७ वें

कलम नं. २६ व २९ यांजमध्यें सागितल्याप्रमाणें जी चेंबर्स बनविलीं जातील त्यांनी दिलेलें निर्णय सबंध न्यायमंडळानें दिलेले निर्णय असेंच मानावें लागेल.

## कलम २८ वें

कलम नं. २६ व २९ यांत निर्देश केलेलीं चेंबर्स, पक्षकारांची संमति असल्यास, हेग खेरीज दुसऱ्याहि कोठें बसून त्यांचे न्यायदानाचें काम करू शकतील.

## कलम २९ वें

न्यायमंडळापुढें येणाऱ्या कामाचा लवकर उरक करण्यासाठीं, न्यायमंडळ दर वर्षीं पांच न्यायाधीशांचें एक चेंबर बनवून ठेवील. आणि तें पक्षकारांच्या विनंतीवरून वाद ऐकून घेऊन, समरी पद्धतीनें त्या वादांचा निकाल लावून टाकील. या चेंबरमधील कोणा न्यायाधीशाला न्याय करण्यास बसणें अशक्य झालें तर त्याची जागा भरून काढण्यासाठीं दोन न्यायाधीशांची आधीच निवड करून ठेवलेली असेल.

## कलम ३० वें

१. न्यायमंडळाचें काम कसें चालावें त्याच्या संबंधाचे नियम हें न्यायमंडळ ठरवील. विशेषत: त्याच्यापुढील वादांचा निकाल लावण्याच्या कार्यपद्धतीबद्दल तें नियम घालून देईल.

२. न्यायमंडळाच्या या नियमांत, न्यायाधीशांप्रमाणें मताचा हक्क नसलेलें असें 'असेसर्स' न्यायमंडळाबरोबर किंवा एखाद्या चेंबरबरोबर वाद ऐकण्यास बसूं शकतील अशीहि सोय असेल.

## कलम ३१ वें

१. या न्यायालयापुढें आलेल्या एखाद्या वादांतील पक्षकार राष्ट्रांचे नागरिक असलेल्या न्यायाधीशांना त्या वादाचे वेळीं न्यायमंडळांत बसण्याचा हक्क आहे.

२. वादांतील उभय पक्षकार राष्ट्रांतल्या एका राष्ट्राचा नागरिक असलेल्या न्यायाधीशाची न्यायालयानें तो वाद ऐकणाऱ्या 'बेंच'मध्यें जर नेमणूक केली तर दुसरा पक्षकार असलेल्या दुसऱ्या राष्ट्राला आपल्यातर्फेची एक व्यक्ति त्या 'बेंच'मध्यें निवडण्याचा हक्क राहील. ही व्यक्ति शक्यतों कलम ४ व ५ मध्यें उमेदवारांच्या ज्या याद्यांचा उल्लेख आलेला आहे त्यांतून निवडणें अधिक पसंत केलें जाईल

३. एखाद्या वादाचा निर्णय करण्यासाठी नेमलेल्या 'बेंच'मध्यें उभय पक्षकार राष्ट्रांतील न्यायाधीशांची न्यायमंडळानें जर मुळीच निवड केलेली नसली तर, या कलमाच्या दुसऱ्या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें, दोन्ही पक्षकारांनीं आपापल्यातर्फेचा न्यायाधीश निवडून द्यावा.

४. कलम २६ व २९ मध्यें सांगितलेल्या प्रकारच्या वादांना हे कलम लागू होईल. अशा वेळीं, वादांतील पक्षकार राष्ट्रांतर्फेच्या न्यायाधीशासाठीं किंवा ते न येऊं शकल्यास पक्षकारांनीं खास या वादासाठी निवडलेल्यासाठीं, आपापल्या जागा रिकाम्या करून देण्याबद्दल चेंबरमधील न्यायाधीशांना न्यायमंडळाचे अध्यक्ष सांगतील.

५. एखाद्या वादांतील एका पक्षांत जर अनेक राष्ट्रांचे हितसंबंध असतील तर त्या सर्वांना मिळून वरील कलमांतल्या तरतुदीपुरतीं एकच पक्ष (राष्ट्र) समजलें जाईल. या बाबतीतील कोणत्याहि संशयाची निवृत्ति न्यायमंडळ निर्णय देऊन करील.

६. या कलमांतील परिच्छेद २, ३ व ४ अन्वयें निवडल्या गेलेल्या न्यायाधीशांनीं या कायद्याच्या कलम २, १७ (२रा परिच्छेद), २० आणि २४ मधील अटी पूर्ण केल्या पाहिजेत. मग ते न्यायमंडळांतल्या त्यांच्या दुसऱ्या सहकाऱ्यांच्या बरोबरीच्या नात्यानें न्यायदानांत भाग घेऊं शकतील.

## कलम ३२ वें

१. न्यायमंडळाच्या प्रत्येक सभासदाला दरसाल ठराविक पगार मिळेल.

२. न्यायमंडळाच्या अध्यक्षाला दरसाल खास भत्ता मिळेल.

३. उपाध्यक्षाला जितके दिवस अध्यक्ष या नात्यानें काम पाहावें लागेल त्यांतल्या प्रत्येक दिवसाबद्दल खास भत्ता मिळेल.

४. कलम नं. ३१ अन्वयें निवडल्या गेलेल्या न्यायाधीशांना (न्यायमंडळाचे जे सभासद असतील ते खेरीज करून) ते जितके दिवस न्यायाधीशाचें काम करतील त्या प्रत्येक दिवसाबद्दल नुकसान भरपाई मिळेल.

५. हे पगार, हे भत्ते व ही नुकसानभरपाई यांच्या रकमा आमसभा ठरवून देईल. कोणत्याहि न्यायाधीशांना द्यावयाच्या या ज्या रकमा ठरविल्या असतील त्या ते ते न्यायाधीश आपापल्या अधिकारपदावर असेतों कमी करतां यावयाच्या नाहींत.

६. न्यायमंडळाच्या रजिस्ट्रारचा पगार त्या मंडळाच्या सूचनेनुसार आमसभेनें ठरवावयाचा आहे.

७. आमसभा जे निर्णय करील त्या नियमांनुसार, सेवानिवृत्त होणाऱ्या न्यायाधीशांना व रजिस्ट्रारला पेन्शन दिलें जाईल. तसेंच न्यायमंडळाचे सभासद व रजिस्ट्रार यांना प्रवासभत्ते देण्याबाबतच्या अटीहि आमसभाच ठरवील.

८. वर सांगितलेले सर्व पगार, सर्व भत्ते व नुकसानभरपाईच्या रकमा यांजवर कोणताहि कर द्यावा लागणार नाहीं.

**कलम ३३ वें**

या न्यायमंडळासाठीं होणारा एकूण खर्च आमसभा ठरवील त्या तऱ्हेनें यूनोनें सोसावा.

## प्रकरण २

# आंतरराष्ट्रीय न्यायालयाचें अधिकारक्षेत्र

**कलम ३४ वें**

१. या न्यायालयाकडे येणाऱ्या वादांमध्यें फक्त राष्ट्रेंच पक्षकार असावी लागतील.

२. या कामकाजाचे जे नियम आहेत त्यांना बाध **न** आणतां, न्यायालयानें त्यानें त्याचेपुढें असलेल्या वादांसंबंधांत आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या अशा सार्वजनिक संस्थांकडून माहिती मागवावी, आणि तशी माहिती कोणी संस्थेनें आपण होऊन पाठविल्यास तिचा स्वीकार करावा.

३. जेव्हां एखाद्या आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या अशा संघटनेच्या घटनेंतील तत्वांचा किंवा त्या तत्वांनुसार मंजूर केल्या गेलेल्या संकेताबद्दलचा प्रश्न या न्यायालयापुढें आलेल्या वादांत समाविष्ट असतो तेव्हां, या न्यायालयाचे रजिस्ट्रार त्या संघटनेला तसें लिहून कळवितील आणि न्यायालयापुढें झालेल्या कामकाजाच्या प्रतीहि तिच्याकडे पाठवून देतील.

**कलम ३५ वें**

१. या कायद्याच्या निर्मितींत ज्या राष्ट्रांचा संबंध आहे त्यांना या न्यायालयाकडे केव्हांहि न्याय मागण्यासाठीं येतां येईल.

२. दुसऱ्या त्या खेरीजच्या राष्ट्रांना कोणत्या अटींवर या न्यायालयाकडे दाद मागतां येईल तें (अंमलांत असलेल्या तहामध्यें जें काय लिहिलेलें असेल त्याला बाध न आणतां) सुरक्षा-मंडळ ठरवील, पण त्यानें कोणत्याहि जरी अटी घातल्या तरी न्यायालयांत असमानतेची भूमिका त्यांच्याकडे देतां येणार नाहीं.

३. जेव्हां यूनोचा सभासद नसलेलें असें एखादें राष्ट्र या न्यायालया-पुढील वादांत एक पक्षकार असेल, तेव्हां न्यायालयाचें कामकाज चालण्याच्या खर्चाबद्दल म्हणून त्या राष्ट्रानें किती रक्कम द्यावी तें हें न्यायालय ठरवून देईल. पण जर तें राष्ट्र या न्यायालयासाठीं होणाऱ्या खर्चात आधींपासूनच वांटेकरी होत असलें तर त्याच्या बाबतींत हा नियम लागू होणार नाहीं.

### कलम ३६ वें

१. पक्षकारांनीं या कोर्टाकडे निर्णयासाठीं आणलेले सर्व वाद, आणि यूनोच्या सनदेमध्यें किंवा तहामध्यें आणि अंमलांत असलेल्या सर्व संकेतांमध्यें ज्या विषयांचा मुद्दाम उल्लेख केलेला आहे असे विषय याच संबंधांत निर्णय देण्याचा या न्यायालयाला अधिकार असेल.

२. या कायद्याच्या निर्मितींत भागीदार असलेल्या राष्ट्रांना, त्यांच्याप्रमाणेंच ज्या दुसऱ्या राष्ट्रांनीं जबाबदारी पत्करली असेल, त्या राष्ट्रांपुरतें तरी, पुढें दिलेल्या विषयांतलें 'या न्यायालयाचे निर्णय, कोणता खास करार नसतांहि, आमच्यावर आपोआपच बंधनकारक राहतील असें आम्हीं मानतों' असें कोणत्याहि वेळीं जाहीर करतां येईल.

अ. कोणत्याहि एखाद्या तहाचा अर्थ ;

ब. आंतरराष्ट्रीय कायद्यांतला कोणताहि प्रश्न ;

क. ज्यामुळें आंतरराष्ट्रीय जबाबदारीचा भंग केल्यासारखें होतें, असें कारण अस्तित्वांत आहे कीं नाहीं तें ठरविणें ;

ड. एखाद्या आंतरराष्ट्रीय जबाबदारीचा भंग केला गेला असल्यास त्याबद्दल कोणत्या प्रकारची आणि किती नुकसानभरपाई दिली जावी तें ठरविणें.

३. वरील कलमांत ज्या घोषणेचा उल्लेख केला आहे तशी घोषणा बिन-शर्त करतां येईल, किंवा दुसऱ्या अनेक अथवा फक्त कांहीं राष्ट्रांनीं तसेंच कर-ण्याच्या अटींवर करतां येईल, किंवा फक्त विशिष्ट कालापुरतीच करतां येईल.

४. अशा प्रकारच्या घोषणा यूनोच्या सेक्रेटरी-जनरलकडे सूपूर्द कराव्या लागतील, आणि मग तो त्या घोषणांच्या नकला तयार करवून त्या या कायद्याच्या भागीदारांकडे व आंतरराष्ट्रीय न्यायालयाच्या रजिस्ट्रारकडे पाठवील.

५. 'परमनंट कोर्ट ऑफ इंटरनॅशनल जस्टिस' कायद्याच्या ३६ व्या कलमानुसार ज्या घोषणा करण्यांत आल्या आहेत आणि ज्या अजूनहि अंमलांत आहेत त्या म्हणजे, निदान या कायद्याच्या भागीदार राष्ट्रांपुरती

तरी या नव्या आंतरराष्ट्रीय न्यायालयाचे निर्णय, त्या घोषणांच्या उरलेल्या मुदतीपुरते किंवा अटीपुरते, आम्हीं आमच्यावर बंधनकारक मानूं अशी कबुली देणेंच होय, असें मानलें जाईल.

६. एखादा विषय या न्यायालयाच्या अधिकार क्षेत्रांतला आहे कीं नाही त्याचा निर्णय हें न्यायालयच करील.

**कलम ३७ वें**

सध्यां अंमलांत असलेल्या अशा एखाद्या तहांत किंवा करारांत, ' एखादा प्रश्न राष्ट्रसंघानें नेमावयाच्या ट्रिब्यूनलकडे' किंवा 'पर्मनंट कोर्ट ऑफ इंटरनॅशनल जस्टिस'कडे सोपवावा, असें जर म्हटलेलें असलें तर, या कायद्यावर सह्या करणाऱ्या राष्ट्रांपुरता तरी त्याचा अर्थ 'या आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे सोपवावा' असा समजला जाईल.

**कलम ३८ वें**

१. आपल्याकडे सोंपविले गेलेले वाद आंतरराष्ट्रीय कायद्यांनुसार निकालांत काढणें हेंच ज्याचें कार्य आहे असें हें आंतरराष्ट्रीय न्यायालय न्यायनिवाडा देतांना पुढील साधनांचा उपयोग करील.

अ. सर्वसाधारण किंवा विशिष्ट बाबींपुरतें व वाद घालणाऱ्या राष्ट्रांनीं जे अगदी स्पष्टपणें मान्य केले आहेत 'असे नियम घालून देणारे आतरराष्ट्रीय संकेतात्मक करार',

ब. कायद्यासमान मानली गेलेली सर्वसाधारण आंतरराष्ट्रीय रूढी,

क. सुसंस्कृत अशा राष्ट्रांनी मान्य केलेलीं कायद्याची सर्वसाधारण तत्वें,

ड. कलम नं. ६९ मध्यें केलेल्या तरतूदीला अनुसरून, निरनिराळ्या राष्ट्रांतल्या न्यायालयांचे निर्णय व अत्यंत उच्च दर्जाच्या लेखकांच्या शिकवणी यांचाहि, कायद्याचे नियम काय असावेत तें ठरविण्याच्या बाबतींतलें दुय्यम साधन म्हणून विचार केला जाईल.

२. असें असलें तरी दोन्हीं पक्षकारांची कबूली असल्यास कोणताहि वाद परस्पर समजुतीनें मिटवून टाकण्याच्या न्यायालयाच्या अधिकाराला बाध येत नाहीं.

## प्रकरण ३

# कामकाजाची पद्धति

**कलम ३९ वें**

१. या न्यायालयाच्या कामकाजाच्या अधिकृत भाषा फ्रेंच व इंग्लिश या असतील. दावा फ्रेंच भाषेंत चालण्यास दोन्हीं पक्षकारांनीं मान्यता

दिली तर निकालहि फ्रेंच भाषेंतच दिला जाईल, आणि तो इंग्रजी भाषेंत चालावा असें जर दोन्हीं पक्षकारांचें म्हणणें पडलें तर निकालहि इंग्रजीमध्येंच दिला जाईल.

२. पण दाव्याचें काम कोणत्या भाषेंत चालावें याबद्दल दोन्हीं पक्षांत जर एकमत झालें नाहीं तर प्रत्येक पक्षकारानें त्याची बाजू मांडतांना त्याला दोन्हीपैकीं जी भाषा पसंत असेल तिचा त्याने उपयोग करावा. न्यायाधिशांनीं द्यावयाचा निवाडा दोन्ही भाषांमध्यें दिला जाईल. पण अशा वेळीं निवाडयाच्या दोन्ही भाषांतील निवाडयाच्या प्रतीपैकीं कोणती प्रत अधिकृत समजली जावी तें न्यायालय ठरवील.

३. एखाद्या पक्षानें तशी विनंती केल्यास, फ्रेंच व इंग्रजी या भाषांखेरीज इतर भाषेचा उपयोग करण्याची न्यायालय त्या पक्षाला परवानगी देईल.

## कलम ४० वें

१. या न्यायालयाच्या रजिस्ट्रारकडे खास करार झाल्याची खबर पाठवून किंवा त्यांच्या नांवें लेखी अर्ज करून दावे दाखल करतां येतील. या दोहोंपैकीं कोणत्याहि प्रकारें दावा दाखल केला असला तरी, दाव्यांतील विषय व पक्षकार यांचा निर्देश करायलाच पाहिजे.

२. रजिस्ट्रारकडे अर्ज येऊन पोचला कीं ज्यांचा ज्यांचा त्याच्याशीं संबंध येणार आहे त्या त्या सर्वांना तो तें वृत्त कळवील.

३. सेक्रेटरी-जनरलमार्फत तो तें वृत्त यूनोच्या सभासदांना कळवील, आणि ज्या दुसऱ्या कोणा राष्ट्रांना न्यायालयापुढें हजर होण्याचा हक्क पोंचत असेल त्यांनाहि तो कळवील.

## कलम ४१ वें

१. दाव्याचा निकाल लागेपर्यंत दोन्हीं पक्षांचे अधिकार राखण्यासाठीं कांहीं उपाययोजना करणें आवश्यक आहे असें जर न्यायमंडळाला वाटलें तर तशी तात्पुरती उपाययोजना सुचविण्याचा न्यायालयाला अधिकार असेल.

२. अखेरचा निकाल लागेपर्यंत, तात्पुरता म्हणून जो उपाय सुचविला जाईल तो उभय पक्षकारांना व सुरक्षा-मंडळाला कळविला जाईल.

## कलम ४२ वें

१. उभय पक्षकारांतर्फे त्यांचे मुखत्यार न्यायालयांत हजर रहावे लागतील.

२. न्यायालयांत त्यांना वकिलांची व सल्लागारांची मदत घेतां येईल.

३. दोन्हीं पक्षकारांचे मुखत्यार, वकील व सल्लागार यांना त्यांचें त्यांचें कर्तव्य पूर्ण स्वतंत्रपणें करतां यावें म्हणून न्यायालयांत त्यांना जरूर त्या सवलती व संरक्षण मिळेल.

## कलम ४३ वें

१. कामकाज दोन प्रकारें चालेल. लेखी व तोंडी.

२. एका बाजूची कैफियत, दुसऱ्या बाजूची कैफियत, जरूर तर उत्तरें न्यायालयाला आणि दोन्हीं पक्षांना सादर करणें, तसेंच आपापल्या बाजूची कागदपत्रें व दस्तऐवज हजर करणें हें लेखी कामकाजाचें स्वरूप असेल.

३. हा सर्व पत्रव्यवहार न्यायालयाच्या रजिस्ट्रारमार्फत आणि न्यायालयानें सांगितलेल्या अनुक्रमानें व कालमर्यादेंत झाला पाहिजे.

४. एका पक्षानें हजर केलेल्या कागदपत्रांची अधिकृत नक्कल दुसऱ्या पक्षाला दिली गेली पाहिजे.

५. साक्षीदार, तज्ज्ञ, मुखत्यार, सल्लागार व वकील यांचीं म्हणणीं न्यायमंडळानें ऐकून घेणें हें तोंडी कामकाजाचें स्वरूप राहील.

## कलम ४४ वें

१. पक्षकारांचे मुखत्यार, सल्लागार व वकील यांच्याखेरीज इतरांवर बजवावयाच्या नोटिसा त्यांच्यावर बजावल्या जाण्यासाठीं ज्या राष्ट्राच्या मुलुखांत नोटिस बजावली जावयाची त्या त्या राष्ट्राच्या सरकारशींच न्यायालय परस्पर पत्रव्यवहार करील.

२. तसेंच एखाद्या ठिकाणीं जाऊन प्रत्यक्ष पुरावा मिळविण्याची गरज उत्पन्न झाली तरीहि हाच प्रकार केला जाईल.

## कलम ४५ वें

दावा ऐकण्याचें काम न्यायमंडळाच्या अध्यक्षांच्या नियंत्रणाखालीं चालेल, आणि जर अध्यक्षस्थान स्वीकारणें त्यांना अशक्य झालें तर उपाध्यक्षाच्या नियंत्रणाखालीं चालेल. ते दोघेहि अध्यक्षस्थान स्वीकारण्यास असमर्थ असले तर सर्वांत जुना न्यायाधीश अध्यक्षस्थानीं बसेल.

## कलम ४६ वें

न्यायालयांतील सुनावणीचें काम खुलेपणानें चालेल. पण न्यायमंडळानें तसें ठरविल्यास किंवा उभय पक्षकारांनीं तशी मागणी केल्यास प्रेक्षकांना मज्जाव केला जाईल.

### कलम ४७ वें

१. प्रत्येक सुनावणीच्या वेळीं टिपणें घेतलीं जातील आणि त्यांवर रजिस्ट्रार व अध्यक्ष हे दोघेहि सह्या करतील.

२. हीच टिपणें अधिकृत मानलीं जातील.

### कलम ४८ वें

दाव्याचें काम कसें चालावें हें न्यायालय ठरवील. प्रत्येक पक्षकारानें आपली बाजू कोणत्या स्वरूपांत मांडावी व आपल्या बाजूचें समर्थन किती वेळांत संपवावें तें सांगेल. त्याचप्रमाणें पुरावा घेण्याबाबतच्या सर्व कामांची व्यवस्था करील.

### कलम ४९ वें

न्यायालयाला वाटलें तर प्रत्यक्ष सुनावणी सुरू होण्यापूर्वींहि, दोन्हीं पक्षांच्या मुखत्यारांना त्यांच्याजवळचीं कागदपत्रें हजर करायला किंवा कांहीं स्पष्टीकरण करायला तें सांगेल. कोणी नकार दिला तर त्याचीहि नोंद ठेविली जाईल.

### कलम ५० वें

न्यायमंडळाला वाटेल तेव्हां आणि तें निवड करील त्या व्यक्तीकडे, संस्थेकडे, ब्यूरोकडे, कमिशनकडे, किंवा दुसऱ्या एखाद्या संघटनेकडे चौकशी करण्याचें अगर तज्ज्ञ या नात्यानें सल्ला देण्याचें काम तें सोंपवूं शकेल.

### कलम ५१ वें

कलम नं. ३० मध्यें न्यायालयानें करावयाच्या कामकाजाच्या ज्या नियमांचा उल्लेख केलेला आहे, त्या नियमांतील अटींनुसार, दाव्याच्या सुनावणीच्या वेळीं साक्षीदारांना व तज्ज्ञांना दाव्याशीं सुसंबद्ध असे प्रश्न विचारतां येतील.

### कलम ५२ वें

न्यायमंडळानें सांगितलेल्या मुदतींत त्याच्याकडे पुरावा येऊन पोचला कीं मग एखादा पक्ष जर कोणता आणखी तोंडी किंवा लेखी पुरावा सादर करूं पाहील तर दुसऱ्या पक्षानें संमति दिल्याखेरीज तो स्वीकारला जाणार नाहीं.

### कलम ५३ वें

१. जेव्हां जेव्हां न्यायालयापुढील दाव्यांतला एक पक्षकार न्यायालयांत हजर राहाणार नाहीं किंवा आपली बाजू लढविणार नाहीं, तेव्हां तेव्हां

'आमच्या बाजूनें निकाल द्या' अशीं दुसरा पक्षकार न्यायालयाला विनंति करूं शकेल.

२. पण तसें करण्यापूर्वी, आपल्या अधिकारक्षेत्रांतला तो विषय आहे, आणि त्या दुसऱ्या पक्षकाराची बाजू न्याय्य आहे याबाबत न्यायालयानें आपली खात्री करून घेतली पाहिजे.

### कलम ५४ वें

१. दोन्हीं पक्षांच्या मुखत्यारांनीं, सल्लागारांनी व वकीलांनी त्यांची त्यांची बाजू मांडून झाली म्हणजे सुनावणी पुरी झाली असें अध्यक्ष जाहीर करतील.

२. नंतर निर्णयाचा विचार करण्यासाठी न्यायाधीश त्यांच्या स्थानावरून उठून जातील.

३. न्यायाधीश मंडळींतील चर्चा खासगीरित्या व गुप्तपणें चालेल.

### कलम ५५ वें

१. सर्व प्रश्न न्यायाधीशांच्या बहुमतानें ठरतील.

२. न्यायाधीशांचीं मतें समसमान वांटलीं गेल्यास अध्यक्ष, किंवा त्यांच्या ऐवजीं तें काम पहाणारे न्यायाधीश आपलें निर्णायक मत देतील.

### कलम ५६ वें

१. निकाल देतांना तो तसा कां देण्यांत आला त्याचीं कारणें दिलीं जातील.

२. तो निर्णय देण्याच्या कामांत ज्यांनीं भाग घेतला त्या न्यायाधीशांचीं नांवेंहि त्या निकालपत्रांत लिहिलेलीं असतील.

### कलम ५७ वें

दिला गेलेला निर्णय जर सर्व न्यायाधीशांच्या एकमतानें ठरला नसला किंवा त्यांतल्या कोणत्या भागाला तेवढी जर सर्वांची मान्यता नसली तर कोणाहि न्यायाधीशाला आपलें निराळें मत वाचून दाखवितां येईल.

### कलम ५८ वें

निकालपत्रावर अध्यक्षाची आणि रजिस्ट्रारची सही असेल. दोन्हीं पक्षांच्या मुखत्यारांना पुरेशी आगाऊ सूचना देऊन खुल्या न्यायालयांत तो निर्णय वाचून दाखविला जाईल.

## कलम ५९ वें

दाव्यांतील दोन्हीं पक्षकारांशिवाय आणि त्या विशिष्ट वादाखेरीज इतर कोणावरहि या न्यायालयाचा निर्णय बंधनकारक ठरणार नाहीं.

## कलम ६० वें

हा निर्णय अखेरचा असून त्यावर अपील नाही. निर्णयाच्या अर्थाबद्दल किंवा त्याच्या साक्षीबद्दल मतभेद उत्पन्न झाल्यास कोणाहि पक्षानें विनंति केल्यास न्यायालय तो अर्थ विषद करील.

## कलम ६१ वें

१. जेव्हां असा एखादा कांहीं नवा पुरावा आढळून येईल की ज्यामुळें निकालावर निश्चित परिणाम होईल, तेव्हां या न्यायालयाच्या निवाड्याचा फेरविचार होण्यासाठीं अर्ज करतां येईल. अर्थात् हा पुरावा न्यायमंडळाला आणि फेरतपासणींचा अर्ज करणाऱ्या पक्षकाराला अज्ञात होता पण त्यांचें अज्ञान निष्काळजीपणामुळें नव्हतें हें गृहीत धरलेलें असेल.

२. 'जो नवीन पुरावा सांपडला आहे त्यामुळें दाव्याचा फेरविचार करण्याची आवश्यकता उत्पन्न होते' असा न्यायालयानें निर्णय दिल्यावर आणि त्या कारणास्तव तपासणी अर्ज दाखल केल्यावर तें काम फिरून सुरू होईल.

३. तथापि, असें फेरतपासणीचें काम सुरू करण्यापूर्वीं, 'यापुढें दिल्या जाणाऱ्या निर्णयांचा अंमल आम्हीं करूंच' अशी पक्षकारांकडून न्यायालय हमी मागेल.

४. कोणताहि नवा पुरावा सांपडल्यापासून जास्तींत जास्त सहा महिन्यांच्या आंत हा फेरतपासणी अर्ज केला गेला पाहिजे.

५. एकदां निर्णय दिला गेल्यावर दहा वर्षे उलटल्यानंतर फेरतपासणी अर्ज करतांच येणार नाहीं.

## कलम ६२ वें

१. न्यायालयापुढें असलेल्या एखाद्या दाव्यामध्यें आपला कायदेशीर हितसंबंध गुंतलेला आहे आणि त्या दाव्याच्या निर्णयामुळें त्यावर बरावाईट परिणाम होण्यासारखा आहे असें जर एखाद्या राष्ट्राच्या सरकारला वाटलें तर त्या दाव्यांत भाग घेण्याची परवानगी मिळण्यासाठीं तें राष्ट्र न्यायालयाला विनंति करूं शकेल.

२. अशा तऱ्हेची विनंति मान्य करावयाची कीं नाहीं तें न्यायालय ठरवील.

### कलम ६३ वें

१. ज्यावेळीं एखाद्या दाव्याचें कोणत्या एखाद्या कराराच्या अर्थाचा प्रश्न येतो आणि दोन्हीं बाजूंच्या पक्षकार राष्ट्रांखेरीज इतर राष्ट्रांचाहि त्या कराराशी संबंध असतो, तेव्हां, त्या इतर राष्ट्रांनाहि रजिस्ट्रारनीं ताबडतोब तसें कळविलें पाहिजे.

२. अशा तऱ्हेनें सूचना मिळालेलें राष्ट्र दाव्याच्या कामकाजांत भाग घेऊं शकेल. पण अशा रीतीनें भाग घेण्याचें राष्ट्रानें ठरविलें तर न्यायालयानें दिलेला निर्णय मान्य करण्याचेंहि त्या राष्ट्रावर बंधन राहील.

### कलम ६४ वें

न्यायालयानें निराळ्या प्रकारची सूचना केली नाहीं तर न्यायालयांत वाद घेऊन येणाऱ्या दोन्हीं पक्षांनीं आपापला खर्च सोसावा.

## प्रकरण ४

# सल्ल्याच्या स्वरूपाचीं मतें

### कलम ६५ वें

१. एखाद्या कायद्याच्या प्रश्नावर या न्यायालयाचें मत मागविण्यासाठीं त्याला विनंति करण्याचा यूनोच्या सनदेनुसार जिला अधिकार प्राप्त झालेला आहे अशा एखाद्या संस्थेनें तशी विनंति केल्यास, हें न्यायालय सल्ल्याच्या स्वरूपाचें त्या प्रश्नाबाबत मत व्यक्त करील.

२. ज्या कोणत्या कायदेशीर प्रश्नाबाबत असें मत विचारलें जाईल तो संपूर्ण प्रश्न, आणि त्या प्रश्नावर उजेड पाडण्यासारखीं कागदपत्रेंहि लेखी विनंतीच्या स्वरूपांत न्यायालयापुढें ठेवावीं लागतील. आणि त्या कायद्यांत नक्की काय म्हटलेलें आहे व त्यांतील कोणत्या बाबतींत न्यायालयाचें मत पाहिजे आहे याचा स्पष्ट निर्देश करावा लागेल.

### कलम ६६ वें

१. नंतर अशा तऱ्हेची न्यायालयाला विनंति करण्यांत आली आहे असें न्यायालयाचे रजिस्ट्रार, या न्यायालयांना हजर राहाण्याचा अधिकार असलेल्या, सर्व राष्ट्रांना ताबडतोब लिहून कळवितील.

२. तसेंच जें राष्ट्र किंवा जी आंतरराष्ट्रीय संस्था या प्रश्नाबाबत कांहीं विशेष माहिती देऊं शकेल असें न्यायालयाला, आणि त्याची बैठक

चालू नसेल तर अध्यक्षांना, वाटेल त्या राष्ट्राला अगर त्या संस्थेला एक खास संदेश रजिस्ट्रार पाठवितील आणि 'अमूक इतक्या मुदतींत तुम्हीं लेखी स्वरूपांत माहिती पाठविलीत तर स्वीकारली जाईल, किंवा अमूक एका दिवशी भरणाऱ्या खुल्या बैठकींत तोंडी सांगितलीत तर ऐकून घेतली जाईल,' असें त्यास कळवितील.

३. कोणत्या एखाद्या राष्ट्राला (या कलमांतील परिच्छेद २ मध्यें निर्देश केलेला) पाठविलेला हा खास संदेश पोंचलाच नाहीं तर तें राष्ट्र लेखी निवेदन सादर करण्याची किंवा तोंडी आपलें म्हणणें सांगण्याची इच्छा व्यक्त करील. तसें घडल्यास काय करावयाचें तें न्यायालय ठरवील.

४. अशा तऱ्हेनें निरनिराळ्या राष्ट्रांनीं आपापलीं लेखी निवेदनें सादर केल्यावर किंवा तोंडी बाजू मांडल्यावर, इतर राष्ट्रांच्या किंवा संस्थांच्या निवेदनाबाबत ठराविक मुदतींत मत व्यक्त करण्याची न्यायालय त्या राष्ट्रांना अगर संस्थांना परवानगी देईल. त्या परवानगीनुसार रजिस्ट्रार त्या सर्व राष्ट्रांकडे अगर संस्थांकडे एकमेकांच्या निवेदनांची माहिती पाठवितील.

### कलम ६७ वें

त्यानंतर, यूनोचे सेक्रेटरी-जनरल व यूनोच्या सर्व सभासद राष्ट्रांचे प्रतिनिधी आणि ज्यांचा संबंध असेल तीं राष्ट्रें व त्या संस्था यांना आगाऊ कळवून, खुल्या न्यायालयांत न्यायमंडळ आपलें सल्ल्याच्या स्वरूपाचें मत बोलून दाखवील.

### कलम ६८ वें

अशा तऱ्हेनें आपलें सल्ल्याच्या स्वरूपाचें मत व्यक्त करतांना, या कायद्यांतील ज्या तरतूदींमुळें त्यांना ज्या कांहीं वादग्रस्त प्रश्नांबद्दल ज्या मर्यादेपर्यंत मत व्यक्त करण्याचा अधिकार मिळालेला आहे त्या तरतुदींचाहि आधार घेईल.

## प्रकरण ५

## दुरुस्ती

### कलम ६९ वें

यूनोच्या सनदेमध्यें कांहीं दुरुस्ती करावयाची असल्यास ती करण्यासाठीं त्या सनदेमध्यें जी कार्यपद्धति नोंदून ठेवलेली आहे त्याच पद्धतीप्रमाणें या

कायद्यांतहि दुरुस्त्या करता येतील. मात्र तसें करतांना जे यूनोचे सभासद नाहीत पण या न्यायालयाच्या निर्मितीच्या कायद्यांशीं ज्यांचा संबंध आहे त्या राष्ट्रांनाहि या दुरुस्तीच्या कामांत भाग घेतां यावा यासाठीं सुरक्षा-मंडळाच्या शिफारशीवरून आमसभा जी कोणती व्यवस्था करील तीहि अंमलात आणावी लागेल.

## कलम ७० वे

या न्यायालयासंबंधाच्या कायद्यांत कोणत्या दुरुस्त्या होणें या न्यायालयाला आवश्यक वाटेल त्याचा कलम नं. ६९ अन्वयें विचार होण्यासाठीं सेक्रेटरी-जनरलकडे तें लेखी लिहून कळवील.

# विषय सूची

